गृहजीवनमाला, पुष्प ४ थें.

‘ गांधीजींचें ’

# स्त्रियांशीं हितगुज

( प्रसिद्ध लेखांमधून आणि भाषणांमधून निवडलेलीं रत्नें )


संग्राहक व अनुवादक,

मु. गो. देशपांडे, एम्. ए., बी. टी.

भाऊ धर्माधिकारी



— मोठ एजंट —

कॉन्टिनेंटल बुक सर्व्हिस,

६२६, श[illegible]

दुसरी आवृत्ति

किंमत २॥ रुपये. ]

[ सप्टेंबर १९४६

आजच्या भारतीय महिलांचा सीतातुल्य
आदर्श व महात्मा गांधीसारख्या विभू-
तींना पत्नीधर्मानें स्त्रीजीवनांतील
सारी उदात्तता पटविणाऱ्या
साध्वी
कै. सौ. कस्तुरबा यांच्या
पवित्र स्मृतीस.

—अनुवादक

# गांधीजी आणि स्त्रीजीवन

प्रिय भगिनी,

गांधीजींच्या स्त्रीजीवनविषयक लेखांचा जो अनुवाद आम्ही केला आहे तो तुमच्यापुढे ठेवताना एका अत्यंत आवश्यक अशा गोष्टीची मराठी वाचकांना व विशेषत भगिनीवर्गाला भासत असलेली नड आम्ही आमच्या शक्तीप्रमाणे भागविली आहे असे वाटते. कारण महाराष्ट्रामध्ये आज स्त्रीजीवनावर पुष्कळ वाङ्मय उपलब्ध होत असले तरी त्यात गांधीजींच्या विचाराची प्रगल्भता, अनुभवाची सखोलता आणि जीवनविषयक विकास कल्पनेची उदात्तता कोठे प्रत्ययाला येते? स्त्रीविषयक वाङ्मय निःसंशय अधिक प्रमाणात निपजत आहे, पण या सर्व वाङमयाला प्राणभूत होऊन राहणारे, स्त्रीजीवनाचे साफल्य कशात आहे याविषयीच विवेचन फारसें आढळत नाही. काही तुटक प्रश्नांची चर्चा, स्त्रियांची वेगवेगळया क्षेत्रांतील घडणारी कुचंबणा व त्यांच्यावर घडणारे अन्याय याविषयीं पुष्कळशी जागृति महाराष्ट्रीय समाजात झालेली आहे, परंतु, स्त्रीचें जीवनांतील स्थान कोणतें तिचे कार्य काय, स्त्रीची महती कोणती, या मलभूत प्रश्नावर जितके निष्ठापूर्वक विचार मराठी वाचकांपुढे आले पाहिजेत तितके अद्यापिहि आढळून येत नाहीत. म्हणून हा अनुवाद आपल्या हाती देताना, यातील वेगवेगळया लेखातून गांधीजींचा जो स्त्रीजीवनाविषयीचा महनीय आदर व्यक्त करणारा दृष्टिकोन प्रतीत होत आहे त्याचे एक ओझरतं दर्शन आपल्याला खचित आवडेल अशी श्रद्धा आहे.

गांधीजींचा हा स्त्रीविषयक दृष्टिकोन अनेक कारणामुळे भारतीय महिलांना बहुमोल वाटणार आहे. गांधीजी हे पुढाऱ्यातदेखील एक परिने असामान्य आहेत. जगातील कोणत्याहि राजकीय पुढाऱ्याला जीवनाच्या इतर विकासशाखांच्या बाबतीत इतके सूक्ष्मपणे पाहता आलेले नाही. विशेषत स्त्रीजीवनावर तर गांधीजींच्या इतका खोल विचार दुसऱ्या कोणत्याहि थोर व जगन्मान्य

पुढाऱ्यानी माडलेला नाही. शिवाय गाधीजीच्या जीवनातूनच ही स्त्रीविषयक उदात्त कल्पना निर्माण झाली आहे, आणि आतापर्यंतच्या सार्वजनिक आयुष्यक्रमात त्याचा इतक्या विविध प्रकारच्या, इतक्या भिन्न प्रातीय, भिन्नवयी, भिन्न मनोवृत्तीच्या, भिन्न व्यवसायाच्या स्त्रियाशी निकट परिचय घडला आहे की, त्याचे हिंदी महिलाना उद्देशून प्रगट झालले सारे विचार हे एखाद्या अनुभवी पडिताचे किंवा तर्ककर्कश शास्त्रज्ञाचे किंवा धोरणी मुत्सद्याचे न वाटता ते विशाल अशा भारतवर्षीय कुटुबातील एका अनुभवी व उत्कटप्रेमी बधूचेच उद्गार वाटतात.

याचाच अर्थ ते एकागी नाहीत. त्याच्यात सर्वागीण जीवनाचा विचार केलेला दिसतो. आततायी राजकीय पुढारी मानवी मूलभूत प्रेरणादेखील न जुमानता आपल्या भोवताली पेटणाऱ्या आगीचीच फक्त जाणीव ठेवतो. तो फक्त नड जाणतो. तो नित्यधर्म पाहात नाही. तसे गाधीजींच्या बाबतीत घडलेले नाही. त्यानी स्त्रीजीवनाचा विचार स्त्री-पुरुषाच्या परस्पराच्या जीवनाची उद्दिष्टे कोणती व त्याचे स्वरूप काय याचे आपल्या मनाशी नीट आकलन करून घेऊन केला आहे, व मगच स्त्रीविषयक प्रत्येक प्रश्नाची उत्तरे ठरविली आहेत. अर्थातच या उत्तरांत अधिक सुसूत्रता, अधिक भरीवपणा आला असल्यास नवल नाही. चित्रकाराला ज्याप्रमाणे आधी आपल्या मनाशी भावी चित्राची स्पष्ट कल्पना असली पाहिजे व मगच प्रत्येक कुचला फिरविला गेला पाहिजे; तद्वत् स्त्रीजीवनाविषयीचे मूलभूत स्वरूप व स्त्रियाची भूमिका ही ठरल्याशिवाय त्याच्या तात्कालिक काही प्रश्नावर तात्पुरती उपाय योजना अती इष्ट व हितकर ठरत नाही.

गांधीजीची महिलाविषयीची ही दृष्टि आणखीहि एका कारणामुळे निर्माण झालेली आहे. ते कारण म्हणजे मनुष्य समर्थ आहे असा वाटत असणारा सपूर्ण विश्वास होय. मनुष्य हा काही निव्वळ स्थिति-किंकर नाही परिस्थिति जशी बदलेल तसे माणसाने स्वतःला बदलले पाहिजे हे जसे खरे आहे, तसेच मनुष्यहि आपल्या वर्तणुकीत स्वतःच्या इच्छा-शक्तीच्या जोरावर बदल करू शकतो असा त्याचा अनुभवसिद्ध निर्वाळा आहे. याबाबत हल्लीच्या उपलब्ध शास्त्रीय माहितीवरून असे दिसते की,

कांही मानसशास्त्रज्ञ निराशावादी बनले आहेत. मनुष्याच्या मूलभूत प्रेरणा कधीही बदलणार नाहीत, व अर्थातच त्यामुळे युद्धप्रवृत्ति, स्वार्थीपणा, अहंकार, लालसा, यामुळे घडणारे पृथ्वीवरील अनर्थ अटळ होत अशा निराशावादी सिद्धांताला ते जाऊन पोंचतात. ही स्थितिकिंकर बनण्याचीच एक रीत होय. परंतु, मनुष्यस्वभाव खात्रीने बदलू शकतो, तसा तो आजपर्यंत बदलत आला आहे, आणि ज्या प्रेरणा आपण मूलभूत समजतो त्या मूलभूत असल्या तरीहि कह्यात न राहणाऱ्या आहेत असेही नाही व संस्कारक्षम नाहीत असेहि नाही या विचाराचेहि पुष्कळ शास्त्रज्ञ आहेत. त्यासाठी मात्र नवी समाजरचना व नवी मूल्ये अस्तित्वात आली पाहिजेत. * या दुसऱ्या प्रगतिपर तत्त्वज्ञानाचे आपल्या जीवनात प्रत्यक्ष यशस्वी प्रयोग करून दाखविणाऱ्या महात्मा गांधींनी जर शांतता हीच अधिक वीरोचित होय हे बाळकडू अंगी भिनवून घेऊन, त्याप्रमाणे स्त्रियांनाच पुरुषापेक्षा श्रेष्ठ ठरविले असले तर त्यात नवल ते काय ?

## गांधीजींची स्त्रीविषयक भूमिका

गांधीजींच्या स्त्रीविषयक कल्पनेचे हे, पर्णत्रिदळ आहे. ते स्त्री अधिक बलशाली ( The stronger sex ) आहे असे आग्रहपूर्वक सांगतात. त्याचप्रमाणे ती एक स्वतंत्र, स्वयंसिद्ध आणि स्वशक्तिमान अशी व्यक्ति आहे, अर्थातच ती पुरुषाच्याबरोबरीने कार्य करणारी, समानदर्जाची स्वामिनी आहे. आणि ती अहिंसामूर्ती आहे, त्यागमूर्ति आहे.

या त्रिविध भूमिकेचे अधिक स्पष्ट विवेचन अवश्य आहे.

स्त्रियांना पुरुषापेक्षा अधिक नाजूक मानणाऱ्या कितीतरी शब्दप्रयोगाचा आपल्याला परिचय आहे. इंग्रजीमध्ये त्यांना Fair sex, किंवा Gentler sex असे आजपर्यंत संबोधण्यात आले आहे. ही स्त्रीविषयक कल्पना म्हणजे त्यांच्या दास्यत्वाचाच एक प्रकार होय. स्त्रियांच्या संरक्षणाची आणि सन्मानाची सारी जबाबदारी या भूमिकेमुळे जुन्या जमान्यात शूर सरदाराच्या

* Dewey: Human Nature and Conduct : ch. Changing Human Nature. P. 114 onward.

अंगांवर पडायची! या कमकुवत कल्पनेविरुद्ध झगडण्यामध्ये बर्नार्ड शॉ सारख्या विचारवंतांनी पुष्कळ भाग घेतला असून स्त्री हीच उलट अधिक वास्तववादी आणि प्रभावी आहे असें वेगवेगळ्या नाट्यकृतीतून बिंबविण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्याहि एका दृष्टीने जे आज प्रत्ययाला येत आहे, ते स्त्री ही अबला नसून अतिप्रभावी अशी सबला आहे हेंच सिद्ध करीत आहे. आपण जर मानवसमाजाच्या रानटी अवस्थेपासून त्याचा आजचा प्रगतिपथ पाहिला, तर काय दिसून येते? पूर्वीच्या रानटी माणसाने आपले विशिष्ट गुण सोडून दिले व तो हळूहळू स्त्रीत्वाचे गुण आत्मसात् करीत चालला आहे. ही इतिहासाची शिकवणूक आहे * म्हणून अधिक बलशाली कोण? स्त्रिया की पुरुष—या प्रश्नाचे वरवरचे उत्तर जरी पुरुष असे वाटले तरी थोड्या खोल विचारांती असे आढळून येईल की पाशवी-शारीरिक ताकदीच्या बाबतीत पुरुष हे पुष्कळ बलवान असले तरी संयम, सहनशक्ति, चिकाटी, त्याग, कष्टाळूपणा, प्रेम इत्यादि बाबतीत त्यांचा क्रम स्त्रियांच्या खालीच लागणार. गांधीजी ज्या वेळी स्त्रियांना अधिक बलशाली म्हणतात त्या वेळी त्यांच्या विधानाचा आपण या गुणांच्या दृष्टीने विचार केला पाहिजे.

स्त्रीपुरुषांची समानता ही त्यांनी आग्रहाने सांगितलेली दुसरी गोष्ट. या समानतेचा अर्थ मात्र आपण नीट ध्यानी घेतला पाहिजे समानता म्हणजे सारखेपणा नव्हे. स्त्री ही पुरुषापेक्षा कमी दर्जाची, कमी बुद्धिमत्तेची, कमी महत्त्वाची असल्या अडाणी समजुतींचा गांधीजी कसोशीनें निरास करीत असले तरी स्त्रीपुरुषांत भिन्नता नाही असे मात्र ते कधीहि सांगत नाहीत. उलट काही लोकांची जी दिशाभूल झालेली आहे ती योग्य नव्हे हेंच मुद्दाम त्यांनी महिलांना विनविलं आहे. "स्त्री म्हणजे केवळ अपूर्ण पुरुष" (Woman is simply undeveloped man) किंवा स्त्रिया या पुरुषांच्या बरोबरीने प्रत्येक बाबतीत पुढाकार घेणारच, त्यांच्यात व पुरुषांत कसलेहि भेद नाहीत; जे शारीरिक भेद आहेत ते फारसे महत्त्वाचे नव्हेत,

* Havelock Ellis : 'Essays in Wartime' ch. Feminism and Masculinism.

आणि म्हणून स्त्री ही पुरुषाबरोबर खांद्यास खांदा लावून प्रत्येक कार्यक्षेत्रात उभी राहू शकेल ( असा जर आपला समज असेल ) तर तो अनेक दृष्टीनीं गैरसमज आहे. स्त्रीपुरुषाची अशी सर्व बाजूनीं बरोबरी होऊ शकेल या हट्टाग्रहाला बळी पडल्यामुळे जर काही आततायी स्त्रियानीं माता होण्याचे झिडकारलें तर तेवढ्याने काही त्या पुरुषी होत नाहीत. मातृत्वाची कामगिरी अंगावर घेणे किंवा न घेणे एवढ्यावरच कांहीं हे स्त्रीपुरुषाच्या अवयवातील व मनोवृत्तीतील भेद अवलंबून नाहीत. जरी मातृत्व झिडकारल तरीदेखील पुरुष होणें हे स्त्रीला अशक्य आहे. आणखी असें पहा, की स्त्रियानीं पुरुषासारखे बनण्याची हाव धरणे यात त्याची समानता राहिली कोठे? ती तर त्याची सर्वात मोठी मानसिक गुलामगिरी झाली. त्यानीं पुरुषाच्या कार्यक्षेत्रात स्पर्धा करणे हे अनैसर्गिक आहे तसेच ते कमीपणाचेहि आहे. स्त्री ही पुरुषाच्या दर्जाची आहे, ती पुरुषाच्याबरोबरीने प्रत्येक कार्यात ती भाग घेते म्हणून नसून तिची अशी काही क्षेत्रं आहेत की जी पुरुषाला अशक्य आहेत; जी तिच्या जीवनाला सफलता आणतात, जी तिच्या सर्वांगीण उन्नतीला पोषक ठरतात; जी तिचे स्वतंत्र अस्तित्व एकदम पटवितात त्यावरून होय. स्त्री ही स्वतंत्र अस्तित्व असणारी आहे. ती अनुकरण करणारी गुलाम नव्हे. ती स्वयंसिद्ध आहे आणि स्वशक्तिमान् आहे. ती पुरुषावर विसंबून राहणारी नाही. आणि अशा या दोन स्वतंत्र घटकामुळेच स्त्रीपुरुषाना परस्परावलंबित्व येत असून त्यातूनच त्यांची समानता सिद्ध होते. स्त्रीपुरुष परस्परपूरक आहेत. एकावाचून दुसऱ्याचे अस्तित्वच असंभवनीय आहे. दोघांच्या भूमिका अशा परस्परावलंबी असल्याकारणाने ते समान आहेत. म्हणून काही विकृत रीतींनी स्त्रियानीं आपली समानता पुरुषाना पटविण्याचा प्रयत्न करणे हितावह नाही. पुरुषाना, जरी त्यानीं कितीहि इच्छा केली तरी, जसे स्त्री होता येणार नाही तसेच स्त्रियानांहि पुरुष बनता येणार नाही, व तशी हीनपणाची भावना त्यानीं कधीहि मनाशी धरू नये.

या भूमिकेतील तिसरी बाजू म्हणजे स्त्री ही त्यागमूर्ति होय. स्त्री जितका त्याग करू शकते, अगदी सहज मनोधर्म म्हणून करू शकते तितका सहजासहजी पुरुषाच्या हातून होत नाही. स्त्रिया या अहिंसेच्या खऱ्या पाईक

होत. गांधीजींना म्हटले आहे की, स्त्रीसैनिकांच्या विषयी ते पूर्ण निर्धास्त राहू शकतात उद्याच्या जगात प्रभावशाली ठरणाऱ्या स्त्रियाच असणार हें यावरून निर्विवाद होय. त्यांच्या अंगी जो त्याग आहे, जी प्रीतिभावना आहे, जे अपत्यवात्सल्य आहे त्यातून युद्धासारख्या घोर आपत्तीनादेखील पुष्कळ प्रतिकार निर्माण होईल. मात्र स्त्रीने आपली ताकद ओळखली पाहिजे.

आतापर्यंतच्या या त्रिविध भूमिकेच जे ओझरतें अवलोकन आपण केले त्यावरून व गांधीजींचा जीवितविषयक जो दृष्टिकोन पाहिला त्यावरून त्यांची स्त्रीजीवनविषयक वेगवेगळ्या प्रश्नावरील उत्तरें हीं सुसूत्र आहेत असेच आढळून येईल. किंबहुना त्यांची ही उत्तरे वरील विवेचनाशिवाय तुटक वाटण्याचाही संभव आहे. कारण, अनेक प्रसंगी, आजपर्यंतच्या तीस वर्षांत त्यांनी वेळोवेळी लिहिलेल्या वा बोललेल्या विचाराचा हा संग्रह आहे. अर्थातच या संबंध संग्रहात जी विचारसूत्रता निर्माण होईल ती गांधीजींची स्त्रीविषयक भूमिका व स्वतःचा जीवितविषयक दृष्टिकोन ही दोन्हीही आधीच ठरली असल्याशिवाय होणारी नव्हती, म्हणून हे विवेचन आवश्यक होते.

स्त्रीजीवनातील ज्या अनेक प्रश्नावर गांधीजींनी आपले विचार प्रकट केले आहेत त्या प्रश्नांपैकी काहींची क्रांतिकारकता तितकी आज राहिलेली नाही. आजच्या भारतीय जीवनात आता पडदा, बालविवाह, विधवाविवाह, सती, देशकार्यातील स्त्रियांचा भाग, वगैरे प्रश्नावरील गांधीजींची उत्तरे पूर्णबिंबून गेली आहेत; किंवा निदान ती सर्वमान्य तरी होऊन राहिली आहेत. आता कोणी स्त्रियांच्या स्वातंत्र्याविरुद्ध उठेल व मनुस्मृतीची आठवण करून देऊ म्हणेल तर ते निव्वळ सनातनीपणाचेच नव्हे तर मूढपणाचेहि होईल. म्हणून ज्या प्रश्नांविषयींची गांधीजींची मते आपणाला किंचित् आग्रही वाटण्याचा संभव आहे असे प्रश्न मुख्यतः दोन किंवा तीनच उरतात. ते म्हणजे संततिनियमन, स्त्रियांचे आर्थिक स्वातंत्र्य व विवाह हे होत.

संततिनियमन या शब्दप्रयोगापेक्षा गांधीजींना संततिसंयम हा शब्दप्रयोग अधिक चांगला वाटेल. कारण खरे नियमन हे संयमावाचून अशक्य आहे; आणि जेथें संयम असेल तेथे आपोआपच नियमन नांदू लागते. संतति-

नियमनाचे पुरस्कर्ते असे गृहीत धरून चालतात की, काम हा अजिक्य आहे; मानवीजीवितांतील–किंबहुना साऱ्या प्राणिमात्रांतील जीवनतत्त्व म्हणजे कामप्रेरणाच होय; प्रत्यक्षाप्रत्यक्ष आपण त्याच प्रेरणेने आपले सारे व्यवहार करीत असतो; आणि जर आपण ती मूलभूत प्रेरणा दडपली तर अनर्थकारी असे परिणाम आपल्याला भोगावयास लागतील; त्यामुळे समाजाचा ऱ्हास होईल. अर्थातच जर आपण नैसर्गिक प्रेरणाच्या अनुरोधाने जगणे आवश्यक ठरते तर मग संततिनियमनाशिवाय गत्यंतरच उरत नाहीं।

हे सर्व म्हणणे पुष्कळ अंशी खरे आहे; पण सर्वांशी नव्हे. आधी आपण अशी खात्री बाळगली पाहिजे की आपण आपल्या प्रेरणा, कांही फार कह्यात ठेवू शकतो, त्या दडपून टाकणे हे जसें अनिष्ट तसेंच त्यांना वळण लावणे, सुप्रवृत्त करू शकणे हेंहि प्रयत्नसाध्य आहे हे आपण जाणले पाहिजे. कामविषयक तृष्णा हीच मानवाची एकमेव तृष्णा नव्हे. अर्थातच अनैसर्गिकपणे न वागतादेखील जर आपण सुजाण रीतींनी वागू लागलो तर आदर्श संयमाला पोंचणे कठीण नाहीं. त्यासाठीं मात्र आपणास नुसते संयमाचेंच कृतिशून्य व्रत आचरणे जड जाईल व त्यांत विशेष स्वारस्यहि राहणार नाहीं, म्हणून कांही हेतुसिद्धी मनाशी धरावी. आपण कामसंयम कां करीत आहोत ? एकमेकांच्या जीवनांत अधिक समरस होण्यासाठीं. एकमेकांच्या आत्मिक आंतरांत अधिष्ठित होण्यासाठीं. एकमेक सोज्वळ प्रीतीचा स्वर्गीय आनंद घेण्यासाठी. अशा तऱ्हेचे जर एखादें विधायक तत्त्व संयमापोटीं असेल तर तो संयम शक्यच नव्हे तर अत्यंत सुपरिणामी ठरतो. * संततिनियमन करून जी जीवनतत्त्वाची शोषणा केली जाते व आयुष्याला एकतऱ्हेची लालसाप्रियता जडते ती या संयमशील जीवनांत जाते आणि अधिक तेजस्वीपणाने आपण जगू लागतो; अधिक निकटसान्निध्यात येतो. महात्माजी ज्या वेळीं म्हणतात की, " 'बा'कडे कामवासनेने पाहण्याचे सोडून दिल्यापासूनच मी वैवाहिक जीवनाचा आनंद लुटू लागलो" त्या वेळीं त्या त्यांच्या विधानांत फार खोल अर्थ आहे हे आपल्या ध्यानीं आले पाहिजे.

---

* Ellis : 'Sex in Relation to Society,' Ch. the Problem of Sexual Abstinence.

वैवाहिक जीवनातील हा संयमाचा आदर्श जड असेल म्हणून कांही तो आपण नाहींसा करून त्याऐवजी लालसाप्रियता वाढविणारा, जबाबदारी झुगारून देण्याची दुष्ट सवय लावणारा आणि म्हणूनच एकपरीने स्त्रियांचा दर्जा निव्वळ भोगवस्तु बनवून टाकणारा संततिनियमनाचा आदर्श उच्च ठरवू शकत नाहीं. आदर्शांचा खाली ओढणे आणि आपणच आदर्शाला पोचण्याची कमोशी करणे या दोन्हींपैकीं केव्हांहि दुसरीच गोष्ट मानवी प्रगतीच्या नावाला शोभेल. अर्थातच आपल्याला जे झेपणार नाहीं ते करण्याचे मिथ्याचार अंगावर घेणे हे योग्य नव्हे गांधीजी त्याबद्दल खंती मानत असे सांगत नसून उलट अशा एका देशसेविकेला वाटणाऱ्या खंतीविरुद्धच त्यांनी लिहिले आहे. ( पृ. ४० ) ते मिथ्याचारी बनावयाला सांगत नाहींत. पण, त्याचबरोबर मानवी प्रयत्नांनी आदर्श विवाहाचे नीतिनियम साध्य होतील हे मात्र वारंवार बजावितात.

स्त्रियांना स्वतःला आपली शक्ति कळलेली नसते. त्यांच्या अंगी चैतन्य आहे, त्यांच्या संमतीवाचून पुरुष कांहीं कामेच्छा तृप्त करूं शकत नाहींत हे त्यांनी पूर्ण जाणलें पाहिजे. पत्नी म्हणजे पतीची दासी, त्याच्या सर्व आचार दुराचाराला, त्याच्या सर्वच म्हणण्याला तिने मूकमान्यता दिली पाहिजे या भ्रामकेविरुद्ध अशीच गांधीजींची स्त्रियांना शिकवणूक आहे. म्हणून स्त्रियांना निर्भयपणे संततिनियमनासारख्या लालसाजन्य गोष्टीपासून परावृत्त बनून पुरुषांनादेखील संयमी बनविलें पाहिजे.— आणि शिवाय संयम हा अनैसर्गिक असे जे आपण मानतो तेंहि तितकेसे खरे नाहीं. ज्याच्या अनुभवावरून फ्रॉइडने हे जगत्क्रान्तिकारी लैंगिक विवेचन पुढे मांडले त्याच्याच तेवढ्या अनुभवावरून ते तितकेसे सबळ ठरत नाहीं. कामविषयक जी प्रचंड शक्ति मानवी जीवनात साठविलेली आहे ती दडपल्यास तिचे अनर्थकारी परिणाम घडतात, या फ्रॉइडच्या विधानात सत्यांश आहे. पण आता असे आढळून आलें आहे कीं, फ्रॉइडचें अवलोकन सर्वांगी नाहीं. त्याच्यापुढे जे रोगी आले त्यांच्यावरून ठरविलेला हा निष्कर्ष आहे. तो जितक्या निरोगी लोकांच्या जीवितक्रमावरून बसवावयाला पाहिजे तितका बसविला गेलेला नाहीं. आणि अशा निरोगी लोकांना संयम हा अशक्य नाहीं. उलट निसर्ग संयमीच आहे असे आपल्याला दिसेल. संयमावाचून, शिस्तीवाचून, कोणताच विकास

साधत नाही. स्वैरचाराचे उदाहरण विकासशाली झालें आहे हे अशक्य आहे.

जो संयम आपल्याला अशक्य वाटतो, 'धर्मज' पुत्रप्राप्तीनंतर स्त्रीपुरुष संग घडू नये हा जो आदर्श आपल्याला अप्राप्य वाटतो तो भोवतालची परिस्थिति बदलली म्हणजे तितका अशक्य वाटणार नाही. परिस्थिति जोपर्यंत अनेक दृष्टीने कामोत्तेजक आणि लालसाप्रिय राहते तोपर्यंत हा संयम आपल्याला अवघड वाटतो इतकेच. पण संततिनियमनाची तुरळक आवश्यकता व त्यामुळे होणारा मनुष्याच्या शक्तीचा अपव्यय ही नजरेसमोर धरल्यास गांधीजी हे त्याचे पुरस्कर्ते का बनत नाहीत ते स्पष्ट होईल. *

आर्थिक स्वातंत्र्याच्या बाबतीतील गांधीजींचे विचार जरी रशियन पद्धतीचे नसले तरी त्याचा त्याला विरोध नाही. मात्र या आर्थिक स्वातंत्र्यामुळे कुटुंबपद्धति नष्ट होऊ नये एवढी काळजी घेतली गेली पाहिजे. पूर्वापासूनच स्त्रिया वेगवेगळी कामे करीत आल्या आहेत आणि आजदेखील लाखो कामकरी व शेतकरी स्त्रिया पुरुषाबरोबर कष्टाला बाहेर पडलेल्या आपण पाहात आहोत. आजच्या युद्धकालीन आपद्धर्मात तर स्त्रियांचे रणशौर्यहि पुरुषांना स्फूर्तिदायक होण्याइतके प्रभावी बनते हेहि आपण अनुभवीत आहोत. तेव्हा स्त्रीने गृहिणी बनणे म्हणजे सार्वजनिक आयुष्यातून गडप होणे नव्हे, निव्वळ पतिसेवेलाच स्वतःला वाहून घेणे नव्हे, किंवा कुटुंबपोषणाच्या जबाबदारीतून मुक्त होऊन स्थाइपणे व असहाय्यपणे पती-

* वर जे विवेचन केले आहे त्याला आधारभूत वाटणारी काही पुस्तकें खालीलप्रमाणे होत

(1) Havelock Ellis: 'Sex in Relation to Society
Ch. The Problem of Sexual Abstinence.

(2) C. G. Jung: Modern Man in Search of a Soul.

(3) Christopher Caudwell: Studies in a Dying Culture. Ch. Freud.

(4) John Dewey: Human Nature and Conduct.

वरच सर्वस्वी आपल्या निर्वाहासाठी विसंबून असणेंहि नव्हे. आर्थिक कुच-बणेमुळे स्त्रियांची नीतिमत्ता शाबूत राहिली असेल तर ती बेगडी आहे; नीतिमत्ता राखण्यासाठी काही आर्थिक परावलंबित्व उपयोगी पडणार नाही'

मात्र प्रत्येक स्त्रीनें हे आर्थिक स्वातंत्र्य कोणत्याहि जबर किंमतीला मिळ-विलेंच पाहिजे या विचारसरणींत पुष्कळ अनर्थ दडलेले आहेत. स्त्री-पुरुषांचे व्यवसाय श्रमविभागतत्त्वावर पूर्वापार भिन्न ठरले आहेत, आणि तसे ते असावेत असें आजच्या प्रयोगांवरूनहि दिसून येत आहे. अशा व्यवसायांतील स्त्रियांचे व्यवसाय हे मुख्यतः संगोपन, कमी शरीरबल लागणारे व कमी एकाग्रता लागणारे व्यवसाय अशासारखे आहेत. हे त्यांना साधू शकणारे व्यवसाय कुटुंबपोषणांत पुष्कळ दृष्टांनी आढळून येतात. म्हणून, आर्थिक स्वातंत्र्यांतील ' स्वातंत्र्य ' या शब्दामुळें त्यांनी हुरळून न जातां जरूर त्या वेळी त्यांना अनुरूप असे व्यवसाय निवडण्याला कोणतीच हरकत येणार नाही. या स्वातंत्र्यामुळें त्यांची, पत्नी बनून पुरुषाची स्वामिनी, व माता बनून भविष्यकाळाची जननी होण्याची महत्त्वाची कामगिरी मात्र त्यांनी डावलू नये. आणि त्यांच्या कायदेशीर हक्कांसंबंधीं गांधीजींच्या भूमिकेवरून बोला-वयाचें झाल्यास गांधीजींनी त्यांचे स्वतंत्र अस्तित्व मान्य केलें आहे. अर्थातच ही कायद्याच्या क्षेत्रांतील कुचंबणादेखील नाहीशी होण्याचा काळ फार दूर नाही.

विवाहाच्या संस्कारामागील जी उच्च भूमिका आपल्याला दिसली पाहिजे ती न दिसल्यानें पुष्कळसे विवाह स्त्रीपुरुष दोघांनाहि आणि विशेषतः स्त्रियांना अधिक जाचक होऊन राहाणारे खोडे बनतात. म्हणून ज्या आव-श्यक सुधारणा घडल्या पाहिजेत त्यांपैकी बालविवाह बंद व्हावेत हे सर्व-मान्य झालें आहे; आणखीहि इतर सुधारणा होणें क्रमानुसारी आहे. येथें एवढेंच लक्षांत ठेवण्याची जरूरी आहे की विवाहामुळें पुरुषांना स्त्रियांचे स्वामी बनतां येतें तसेंच स्त्रियांनाहि स्वामिनी बनण्याचा अधिकार आहे. दोघांचे अधिकार समानपणें चालले पाहिजेत.

मात्र कोणताहि विवाह हा आपल्याला मुक्त स्वातंत्र्य देईल या भ्रामक समजुतीला आपण बळी पडतां उपयोगी नाही. आपली स्वातंत्र्याची कल्प-

नाच मोठी विचित्र असते. अनिर्बंधता म्हणजे स्वातंत्र्य असे आपण मानतो. मनुष्याला कसलेहि निर्बंध उपयोगी नाहीत, कसल्याहि सामाजिक कायद्यांनी माणसाचें व्यक्तिस्वातंत्र्य खुटवू नये असे आपल्या सुखविलासी मनाला वाटू लागते. परंतु हा स्वातंत्र्याचा विपर्यास आहे. स्वातंत्र्यातील जे हक्क आपण पाहिजेत म्हणतो ते जबाबदारी अंगावर घेतल्याशिवाय प्राप्त होत नसतात. समाजांतील घटक या नात्याने समाजात वावरावयाचे तर पूर्ण अनिर्बंधत्व अशक्य आहे. हें जसे एकंदरीने खरे तसेच ते विवाहाबद्दलहि खरे आहे. विवाह हा दोन आवश्यकतामधून निर्माण झाला आहे; एक, व्यक्तीच्या प्रचंड शक्तींना विकासमार्ग मिळावा ही, व दुसरी समाजस्थैर्य रहावे यासाठी लागणारी नियमबद्धता ही. अर्थातच या दोहोंचा सुंदर समन्वय साधण्यासाठी विवाहाचें पावित्र्य सतत आपल्या अंत:करणात साठविलेले असावे. या दोन आवश्यकता परस्परविरोधी भासतात; परंतु त्या तशा विरोधीच राहिल्या पाहिजेत असे नाही. जी व्यक्तिप्रेरणा विवाह मागते ती अगदी स्वैर आहे असेंहि नाही व जी सामाजिक नियमबद्धता आड येते असे आपल्याला वाटते तीहि अयोग्य नाही. व्यक्तिप्रेरणा जशी यासाठी निरोगी पाहिजे तशीच सामाजिक नीतिदेखील जीर्ण असू नये; आजच्या युगाला साजेशी पाहिजे.* म्हणजे विवाह सुखावह ठरतील व त्यातून परस्पराच्या हिताप्रमाणे राष्ट्राचेंहि कल्याण होईल. हे न जाणता घटस्फोटाचा सार्वजनिक पुरस्कार करीत राहाणे यात हशील काहींच नाही. अगदी थोडक्यात बोलायचे तर घटस्फोट हा एका विवाहांतील अपयशाचा कबुलीजबाब नसून एकंदरीनें तो विवाहित होण्यांतील अपयशाचा असतो. अशा माणसांना कोणतीहि व्यक्ति गैरच ठरते. विवाह आणि वैवाहिक जीवन यांतील यशावरूनच पुष्कळशी माणसाच्या माणुसकीची परीक्षा होत असते.

---

*Havelock Ellis: 'Essays in War-time' ch. Marriage and Divorce: 'But a healthy impulse bears within it an order and restraint of its own, while a truly moral outward pressure is based, not on the demands of medieval days, but on the demands of our own day. (P. 183)

स्त्रीजीवनासंबंधी आणखी कितीतरी विवेचन शक्य आणि अवश्य आहे. परंतु त्यासाठी, आपणाला गांधीजींच्या लेखांपासून फार वेळ दूर ठेवणें योग्य नव्हे. कारण त्यांच्या विचारसरणीनें सर्व प्रांतांतून वळणे घेतली असून प्रत्येक भागाला आपल्या जीवनामृताने संपन्न केले आहे.

गांधीजींची पुष्कळशी मते ही आपल्याला विलक्षण वाटतात. आपल्या हे क्वचित ध्यानीं येते की त्यांचा जगातील बदलत्या विचार प्रवाहांशी, बदलत्या नीतिस्वरूपांशी फारच निकट परिचय आहे. आधुनिक विचारसरणी-तील योग्यता व अयोग्यता याचा विचार ते निव्वळ गीताधर्मावरून करीत नाहीत. नव्या विचाराबद्दल ते अतिदक्ष आहेत. म्हणून त्यांची उत्तरें हीं भगिनीवर्गानें शास्त्रीय दृष्टीनेदेखील पाहण्याजोगी ठरतील; व हेंच दाखवून देण्याचे काम अनुवादकांच्या भूमिकेवरून करण्यासाठी म्हणून ज्या ज्या ठिकाणीं शक्य त्या त्या ठिकाणीं त्यांच्या मताचा अनुवाद निरनिराळ्या विचारवंतांच्या विधानांच्या आधारे केलेला आहे.

मातृभ्यो नमः

मु. गो. दे.

# स्त्रियांशीं हितगूज

## स्त्रियांची उन्नति : १

( मुंबई भगिनीसमाजापुढें २० फेब्रुवारी १९१८ रोजी केलेलें भाषण )

स्त्रियांच्या उन्नतीबद्दल आपण बोलतों तेव्हां त्याचा अर्थ काय तें समजून घेणें अवश्य आहे. " उन्नति " म्हणतों त्या अर्थी अवनति झाली आहे असें आपण गृहीत धरलेलें असतें. आणि अवनति झाली असेल तर ती कां व कशी झाली याचाहि आपण विचार केला पाहिजे. या प्रश्नावर कसून विचार करणें आपलें पहिलें कर्तव्य आहे. हिंदुस्थानभर प्रवास करीत असतांना मला असें समजून आलें आहे कीं, आजची सर्व चळवळ आमच्या लोकसंख्येच्या फार थोड्या अंशापुरतीच मर्यादित आहे. हा अंश अफाट आकाशांतील इवल्याशा ठिपक्यासारखा आहे. कोट्यवधि स्त्री–पुरुषांना या चळवळींचें यत्किंचितहि ज्ञान नाहीं. या देशांतील थोडे थोडके नव्हे ८५ टक्के लोक आपल्याभोंवतीं जें काहीं चाललें आहे त्याचा यत्किंचितहि संपर्क लागूं न देतां आपलें निरुपद्रवी जीवन घालवीत आहेत. हे स्त्रीपुरुष अडाणी असले तरी आयुष्यांतील आपलें कार्य योग्य रीतीनें पार पाडीत आहेत. दोघांचें शिक्षण सारखेंच आहे, किंबहुना दोघांनाहि

शिक्षण नाहीं. आपल्या कर्तव्याला अनुसरून ते एकमेकांना मदत करीत आहेत. कोणत्याहि दृष्टीनें त्यांचें आयुष्य अपूर्ण असेल तर त्याचें कारण उरलेल्या १५ टक्के लोकांच्या आयुष्यांतील अपूर्णतेमध्यें शोधलें पाहिजे.

जे विचार आज मी मांडणार आहें ते मांडतांना वर उल्लेख केलेले १५ टक्के लोकच फक्त माझ्या नजरेसमोर आहेत. आणि त्यांतसुद्धां स्त्री आणि पुरुष या दोघांनाहि ज्या सर्वसामान्य अडचणी आहेत त्यांची चर्चा येथें करणें अप्रस्तुत होईल असें मला वाटतें. विचारासाठीं आपल्यापुढें मुद्दा आहे तो हा कीं, पुरुषाची जशी उन्नति होत आहे तशीच स्त्रियांची कशी होईल? कायदे आहेत ते बहुधा पुरुषांनीच केलेले आहेत आणि स्वतःच नेमून घेतलेलें हें काम करतांना पुरुष नेहमीच न्यायी आणि विवेकनिष्ठ राहिला आहे असें नाहीं. स्त्रियांच्या उन्नतीचा पुरस्कार करण्याच्या बाबतींत जो प्रयत्न आपण करावयाचा तो, जे त्रिकालाबाधित विशिष्ट दोष स्त्रियांच्या अंगीं पूर्णपणें मुरलेले असे सांगितले आहेत ते काढून टाकण्याच्या दिशेनें बव्हंशीं झाला पाहिजे. हें काम कोण आणि कसें करणार? माझ्या अल्पमतीप्रमाणें हा प्रयत्न करण्यासाठीं आपल्याला सीता, दमयंती आणि द्रौपदी यांच्यासारख्या सच्छिल, निष्ठावंत आणि संयमी स्त्रिया निर्माण केल्या पाहिजेत. त्या जर आपण निर्माण करूं तर प्राचीन काळच्या आदर्श स्त्रियांकडे हिंदुसमाज जितक्या पूज्य भावनेनें पाहतो तितक्याच पूज्य भावनेनें तो या आजच्या स्त्रियांकडेहि पाहील, त्यांच्या शब्दांना शास्त्रवचनाइतकाच अधिकार प्राप्त होईल. स्मृतींमध्यें स्त्रियांच्यावर मधून मधून जे शिंतोडे उडविण्यांत आले आहेत, त्याबद्दल आपल्याला लज्जा वाटूं लागेल आणि लवकरच ते आपण विसरूनहि जाऊं. अशी क्रांति हिंदुधर्मांत पूर्वीं अनेकदां

झाली आहे, पुढेंहि होईल आणि त्यायोगें स्त्रियांविषयींची आपली श्रद्धा स्थिर होईल.

आमच्या स्त्रियांच्या अवनतीचें मूळ कारण काय त्याची आपण आतां चर्चा केली, आणि आजची स्थिति सुधारण्यासाठीं कोणते आदर्श आपण गांठले पाहिजेत याचा विचार केला. हे आदर्श गांठणाऱ्या स्त्रियांची संख्या अर्थातच कमी असणार, म्हणून सर्व साधारण स्त्रियांनीं प्रयत्न केला तर त्यांना काय साधतां येईल त्याचा आपण आतां विचार करूं. आदर्श कार्यकर्त्या स्त्रीचा पहिला प्रयत्न जास्तींत जास्त स्त्रियांच्या मनांत त्यांच्या अवनतीबद्दलची जाणीव उत्पन्न करून देण्याच्या दृष्टीनें झाला पाहिजे. वाङ्मयविषयक शिक्षण देऊनच फक्त हें शक्य होईल असें मानणारा मी नाहीं. त्या आधारावर काम करावयाचें म्हणजे आपला उद्देश साध्य होण्याच्या काळाला कांहीं मर्यादाच राहाणार नाहीं. इतका दीर्घकाळ थांबण्याचें कांहीं कारण नाहीं असा मला पदोपदी अनुभव येत आहे. प्रारंभाला कोणतेंहि वाङ्मयीन शिक्षण न देतां आमच्या स्त्रियांना त्यांची आजची खेद-कारक वस्तुस्थिति पटवून देतां येईल. स्त्री ही जोडीदारीण आहे. तिची बुद्धीची कुवतहि पुरुषांइतकीच आहे. पुरुष करीत असलेल्या उद्योगाच्या अत्यंत बारीक सारीक तपशिलांतसुद्धां भाग घेण्याचा तिला अधिकार आहे. पुरुषांइतकाच स्वातंत्र्याचा आणि मोकळे-पणाचा तिला हक्क आहे. पुरुष जसा आपल्या व्यवसायाच्या क्षेत्रांत सर्वोच्च स्थान भोगतो तसाच स्त्रीलाहि तिच्या क्षेत्रांत सर्वोच्च स्थान घेण्याचा हक्क आहे. अशी वस्तुस्थिति नैसर्गिक असली पाहिजे. लिहितां वाचतां आलें म्हणूनच तें स्थान त्यांना मिळालें असें होतां कामा नये. परंतु केवळ दुष्ट रूढीच्या जोरावर अडाणी आणि कवडी किंमतीच्या माणसांचीसुद्धां सत्ता आज स्त्रियांवर चालत

आहे. सत्ता गाजविण्याची त्यांची लायकीहि नसते. ती सत्ता त्यांच्या हातीं असतां कामा नये. आपल्या स्त्रियांची ही अशी स्थिति आहे म्हणून आपल्या पुष्कळशा चळवळी अर्धवटच रहातात; आपल्या पुष्कळशा कामाचें योग्य तें चीज होत नाहीं. आपल्या व्यापारांत पुरेसें भांडवल न गुंतवितां विळा मोडून खिळा करणाऱ्या व्यापाऱ्यासारखी आमची गत आहे.

तथापि, लिहिणें—वाचणें- हिशेब या तिहींचें ज्ञान नसतांनाहि पुष्कळ चांगलें व उपयुक्त काम करतां येत असलें तरी, अशा प्रकारच्या ज्ञानाशिवाय नेहमींच आपलें चालू शकेल असें नाही हें मात्र मी मानतोंच. त्या ज्ञानाच्या योगानें आपली बुद्धि वाढते, तीक्ष्ण होते आणि सत्कार्य करण्याची आपली शक्तिहि वाढते. लिहिण्यावाचण्याला मी अवास्तव किंमत दिलेली नाहीं. त्याचें योग्य तें स्थान मिळावें एवढाच माझा प्रयत्न आहे. स्त्रिया निरक्षर आहेत या सबबीवर त्यांचे बरोबरीचे हक्क हिरावून घेणें किंवा त्यांना ते नाकारणें या गोष्टींचें समर्थन पुरुषांना करितां येणार नाहीं हें वेळोवेळीं मी दाखवून दिलें आहे. पण हे निसर्गदत्त अधिकार संभाळण्याची, समजूतदारपणें वापरण्याची आणि त्यांची व्याप्ति वाढविण्याकरितां मेहनत करण्याची शक्ति स्त्रियांमध्यें येण्यासाठीं शिक्षण आवश्यक आहे. शिवाय ज्यांना हें शिक्षण मिळत नाहीं अशा लाखों लोकांना स्वतःचीं ओळख करून घेणेंहि शक्य होत नाहीं. कितीतरी ग्रंथांत सात्विक आनंद सांठविलेला असतो. शिक्षणावांचून त्याला आपल्याला मुकावें लागेल. शिक्षणहीन मनुष्य म्हणजे जवळजवळ पशूच असें म्हटलें तरी ती अतिशयोक्ति नव्हे. म्हणून शिक्षण जसें पुरुषांना तसें स्त्रियांनाहि आवश्यक आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं दोघांच्याहि बाबतींत शिक्षणपद्धति सारखीच असली पाहिजे.

एकतर हल्लींची सरकारी शिक्षणपद्धति चुकीची असून अनेक दृष्टींनीं घातक आहे. स्त्री आणि पुरुष या दोघांनीं तिचा अव्हेरच केला पाहिजे. आणि जरी समजा, आज असणारे दोष त्या पद्धतींत नसले तरी सर्व बाजूनीं विचार करतां, ती स्त्रियांना योग्य आहे असें मी म्हणणार नाहीं. स्त्रीपुरुषांचा दर्जा समान आहे खरा, पण दोघें एकसारखींच नाहीत. तीं परस्परांना पूरक आहेत. म्हणून ही अजोड जोडी आहे. एकाची दुसऱ्याला मदत होते; इतकी कीं एकावांचून दुसऱ्याच्या अस्तित्वाचीसुद्धां कल्पना करतां येत नाहीं. आणि यावरूनच आपोआप निघणारा अनुषंगिक सिद्धांत हा कीं स्त्री-पुरुष या दोघांपैकीं एकाच्याहि दर्जाला धक्का पोंचला तर त्यांत त्या दोघांचाहि सारखाच नाश आहे स्त्रियांच्या शिक्षणाची योजना आंखतांना ही मुख्य गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. विवाहित दंपतीच्या घराबाहेरच्या उद्योगांत पुरुष हा श्रेष्ठ आहे, म्हणून साहजिकच त्याला त्या उद्योगाचें अधिक ज्ञान असावें हें इष्टच आहे. उलट गृहजीवन हें सर्वस्वी स्त्रियांचेंच क्षेत्र आहे. आणि म्हणून घरगुती बाबतींत, तसेंच मुलांच्या शिक्षण संगोपनाच्या बाबतींत त्यांना अधिक ज्ञान असावें हें उचित आहे. याचा अर्थ ज्ञानाचे हवाबंद दोन कप्पेच करावे किंवा ज्ञानाच्या कांहीं शाखा या दोघांपैकीं एकाला बंद असाव्यात, असा नाहीं. परंतु या मूलभूत तत्त्वाची विवेकपूर्ण जाणीव ठेवून जर त्यावर शिक्षणक्रम आंखले नाहींत, तर स्त्री-पुरुषांचा जीवनविकास पूर्णपणें करणें शक्य होणार नाहीं.

आमच्या स्त्रियांना इंग्रजी शिक्षणाची आवश्यकता आहे किंवा नाहीं याबद्दल थोडें बोलतों. आपल्या रोजच्या व्यवहारांत, स्त्रियांना काय किंवा पुरुषांना काय, इंग्रजी शिक्षण घेतलेंच पाहिजे अशी कांहीं गरज नाहीं असें माझें मत झालें आहे. आपल्या चरितार्था-

साठीं आणि आपल्या राजकीय चळवळींत सक्रिय भाग घेण्यासाठीं इंग्रजी येणें आवश्यक आहे हें खरें पण स्त्रियांनीं पोटासाठीं काम करावें किंवा व्यापारधंद्यांत पडावें असें मला वाटत नाहीं. ज्या कांहीं थोड्या स्त्रियांना इंग्रजीची जरूर किंवा इच्छा असेल त्यांना पुरुषा-साठीं असलेल्या शाळांत जाऊन ती पूर्ण करून घेतां येईल. पण, स्त्रियांकरितां काढलेल्या शाळांत इंग्रजी शिक्षण सुरू करण्यानें आमची असहायता मात्र वाढेल. लोक म्हणतात कीं, इंग्रजी वाङ्मयाचें समृद्ध भांडार स्त्री व पुरुष या दोघानाहि खुलें असले पाहिजे. या विचार-सरणींत बराच गैरसमज आहे असें मी नम्रपणें सुचवितों. पुरुषानाच तेवढें तें भांडार खुलें ठेवावें आणि स्त्रियांना मात्र बंद करावें असें कोणीच म्हणत नाहीं. साऱ्या जगाच्या वाङ्मयाचा अभ्यास कर-ण्याची तुम्हांला गोडी असेल तर त्याबाबतींत तुम्हांला अडथळा करण्याची कोणाचीच छाती नाहीं परंतु एखाद्या विशिष्ट समाजाच्या गरजा लक्षांत घेऊन जेव्हां शिक्षणक्रम आंखावयाचे असतात, तेव्हां कांहीं थोड्या वाङ्मयभक्तांच्याच तेवढ्या गरजा पुरवून भागणार नाहीं. आज इंग्रजीच्या अभ्यासासाठीं आमचे स्त्री-पुरुष जितका वेळ देतात त्याहून कमी वेळ त्याकडे द्या. असें सांगण्यांत इंग्रजीपासून त्यांना जो आनंद मिळण्याचा संभव आहे, तो काढून घ्यावा असा माझा हेतु नाहीं. माझें म्हणणें इतकेंच कीं, आजच्यापेक्षां अधिक स्वाभाविक पद्धति जर अंमलांत आणली तर तेवढाच आनंद थोड्या खर्चांत आणि थोडक्या श्रमांनीं कोणालाहि मिळवतां येईल. अमो-लिक सौन्दर्य-रत्नांनीं ही वसुंधरा भरलेली आहे; पण हीं सगळीं रत्नें कांहीं इंग्रजी भाषेच्या कोंदणांतच बसवलेलीं नाहींत. तितक्याच उत्कृष्ट कृती आपल्यामध्यें आहेत असें इतर भाषाभगिनीहि योग्य अशा अभिमानानें सांगू शकतील. हें सगळें रत्नभांडार आपल्या सर्व-

साधारण माणसांना मोकळें केलें पाहिजे. आमच्यांतील विद्वानांनीं आमच्याच भाषांतून त्यांचे अनुवाद आमच्याकरितां करण्याचें अंगावर घेतलें तरच तें शक्य आहे. वरीलप्रमाणें शिक्षणक्रमाचा नुसता आराखडा तयार केला म्हणजे कांहीं आपल्या समाजांतील बालविवाहाचें विष निघालें अथवा आपल्या स्त्रियांना बरोबरीचे हक्क दिले असें ठरत नाहीं. लग्नानंतर डोळ्यांपुढून जवळ जवळ नाहींशाच होणाऱ्या आपल्या मुलींच्याविषयीं आतां आपण थोडा विचार करूं. त्या कांहीं परत शाळेंत जाण्याचा संभव नसतो. एकदां आपल्या मुलीचें लग्न अगदीं लहानपणींच उरकून टाकण्याचें पाप केल्यानंतर जरी मागाहून आपण केलेल्या कृतीचें पापस्वरूप आयांना कळलें तरी त्यांना कांहीं आपल्या मुलींना शिक्षण देतां येत नाहीं, किंवा त्यांचें शुष्क आयुष्य आनंदमय करतां येत नाही; कोंवळ्या मुलीशीं लग्न करणारा मनुष्य तें कांहीं तिच्या हिताच्या बुद्धीनें करीत नसून निव्वळ इंद्रियलालसेनें करतो. या मुलीना त्राता कोण? या प्रश्नाचें जर योग्य उत्तर सापडलें तर स्त्रियाचा प्रश्नहि त्यामुळें सुटेल. उत्तर कठिण आहे हें खरें, पण संभवनीय असें तें एकच उत्तर आहे; आणि तें हें कीं तिच्या नवऱ्याशिवाय दुसरें कोणीहि तिचा कैवार घेणार नाहीं. पण आपल्या नवऱ्याला ताळ्यावर आणणें त्या कोंवळ्या पोरीला जमेल अशी कल्पना करणेंच चुकीचें आहे. म्हणून हें कठीण कार्य आज तूर्त तरी पुरुषांकडेच सोपविलें पाहिजे. शक्य तर मी लग्न झालेल्या लहान मुलींची मोजदाद करून त्यांच्या नवऱ्याना जाऊन भेटेन आणि एवढ्याशा पोरीशी स्वतःच्या भवितव्याची सांगड घालून देण्यांत ते केवढा भयंकर प्रमाद करीत आहेत हें त्यांना पटवून देण्याचा प्रयत्न करीन, आणि त्यांना खडसून बजावीन कीं जर तुम्ही आपल्या बायकांना शिक्षण देऊन मुलें होण्याच्या दृष्टीनेंच

नव्हे तर त्या मुलांचें योग्य रीतीनें संगोपन करण्याच्या दृष्टीनेंसुद्धां त्यांना लायक न बनवाल आणि त्या लायक होईपर्यंत पूर्णपणें ब्रह्मचर्याचें पालन न कराल तर आणि तोंवर या पापाचें परिमार्जन होणार नाहीं.

अशा रीतीनें भगिनी-समाजाच्या सदस्यांपुढें कितीतरी सुपीक क्षेत्रें पडलेलीं आहेत. त्यांत त्यांना आपली सर्व शक्ति कामीं आणतां येईल. कामाचें क्षेत्र इतकें विशाल आहे कीं, निश्चयाचें सर्व बळ जर या कामी लावलें तर स्वराज्याच्या नांवाचा उल्लेखसुद्धां न करतां त्या कार्याची फार मोठी सेवा करतां येईल. सुधारणेच्या बाकीच्या चळवळी तूर्त तशाच राहिल्या तरी हरकत नाहीं. छापखाने नव्हते, आणि व्याख्यानाचें क्षेत्रसुद्धां जेव्हां मर्यादित होतें, आजच्याप्रमाणें एका दिवसांत एक हजार मैलांऐवजी चोवीस मैलसुद्धां प्रवास करणें ज्या वेळीं कठीण होतें, त्या वेळी आपल्या ध्येयांचा प्रसार करण्याचें एकच दार उघडें होतें, आणि तें म्हणजे स्वतःचा आचार. आणि आचारामध्यें सामर्थ्यहि मोठें होतें. आज आपण वायुगतीनें इकडे तिकडे जातों येतों, व्याख्यानें देतो, वर्तमानपत्रांत लेख लिहितों, आणि तरीहि आपण आपल्या ध्येयापासून कितीतरी दूर आहोंत! सर्वत्र निराशेचा सूर भरून राहिला आहे. माझें मत म्हणाल तर पूर्वीप्रमाणेंच आपल्या प्रत्यक्ष आचाराचाच प्रभाव भाषणांपेक्षां अगर लेखांपेक्षां जनतेवर खात्रीनें अधिक पडेल. आपल्या समाजाला माझी अशी आग्रहाची विनंति आहे कीं समाजाच्या सदस्यांनीं आपण जें कांहीं करूं तें शांतपणें आणि पुढें पुढें न करता होईल याची काळजी घ्यावी.

# स्त्रीची कामगिरी कोणती ? : २

एका अत्यंत सुशिक्षित भगिनीकडून आलेल्या पत्रांतून पुढील मजकूर घेतला आहे:—

" अहिंसा आणि सत्याग्रह यांच्या द्वारा आत्म्याची थोरवी आपण जगाला दाखवून दिली आहे. मनुष्यामधील अधम वृत्तीला कसे जिंकावें या प्रश्नाचा निकाल या दोन शब्दांनी प्रकट होणाऱ्या तत्त्वांनीच लागतो.

आपण आम्हा स्त्रियांचा प्रश्न सोडवावा अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. स्त्रियांचा प्रश्न अशी वस्तूच नाहीं, असें राजाजी म्हणतात. राजकीय अर्थानें कदाचित् नसेल. व्यावसायिक अर्थानेसुद्धां तो कठीण प्रश्न होऊ नये अशी व्यवस्था कायदा करून कदाचित् करता येईल, म्हणजेच, सर्व व्यवसाय स्त्रियांना आणि पुरुषांना दोघांनाहि सारखेच उघडे रहावेत असें करतां येईल. पण तेवढ्यानें आम्ही स्त्रिया आहोत आणि म्हणून पुरुषांपासून गुणांनी भिन्न आहोत ही वस्तुस्थिति कांही बदलणार नाही. आमच्यामधील हीन वृत्तींना जिंकण्याकरिता सत्य–अहिंसेव्यतिरिक्त आम्हांला आणखी कांही तत्त्वाची जरूर आहे. पुरुषांप्रमाणेच स्त्रियांची प्रकृतिहि एकाहून एक चांगल्या गोष्टी प्राप्त करून घेण्याची धडपड करीत असते. पण आपली आक्रमक प्रवृत्ति, लालसा, दुसऱ्याला दुःख देण्याची पाशवी प्रेरणा वगैरे नाहींशा करण्याकरितां ज्याप्रमाणे अहिंसा आणि ब्रम्हचर्य यांची पुरुषाला जरूर आहे, त्याप्रमाणें स्त्रियांमध्ये जे पुरुषांपेक्षां वेगळे गुण आहेत आणि जे निसर्गतःच स्त्रियांमध्यें असतात असे सर्वसाधारणपणे म्हणतात त्या हीन गुणांपासून मुक्त होण्याची शक्ति तिच्यात येण्याकरिता स्त्रीच्या बाबतीतहि तत्त्वाची गरज आहे. तिच्या जातीचे स्वाभाविक गुण; ती स्त्री म्हणून केलें जाणारें तिचे संगोपन–शिक्षण, आणि ती स्त्री म्हणून जी परिस्थिति तिच्याभोंवतीं निर्माण केली जाते ती

परिस्थिति–या सर्व गोष्टी तिच्याविरुद्ध असतात. काम करीत असतांना या गोष्टी नेहमी तिच्या मार्गात आडव्या येऊन तिला अडथळा करतात आणि मग 'किती केल तरी ती स्त्रीच' हे ठराविक ठशाचे उद्गार लोकांना काढायला संधि मिळते. यालाच मी स्त्रीपणाचा आमच्या गळ्याभोवती पडलेला फास असे म्हणते. जर आमच्याजवळ बरोबर लागू पडणारी गुरुकिल्ली असेल, स्वतःला सुधारण्याची पद्धति अवगत असेल, तर सहानुभूति आणि कोमलपणा यासारखे आमचे नैसर्गिक गुण आमच्या मार्गात धोंड होण्याऐवजी आम्हाला मदतरूप होतील. पुरुषाच्या बाबतीत आपण जो उपाय सुचविला आहे त्याप्रमाणेच ही आमची सुधारणा आमच्या अंतरातूनच झाली पाहिजे.

मी वर स्त्रीचा स्वभाव, संगोपन आणि परिस्थिति यांविषयी उल्लेख केला. माझे म्हणणे स्पष्ट करण्याकरिता मी एक उदाहरण देते.

स्त्रियांनी मृदु, कोमलहृदयी, सहानुभूतियुक्त असावे असा निसर्गाचा हेतु आहे. कारण त्यांना मुलांचे पालनपोषण करावयाचे असते. या गुणाचा तिच्यावर नकळत बराच प्रभाव असतो. त्यामुळे जेव्हा कांही करण्याचा प्रसंग येतो तेव्हा ती अतिशय भावनावश होते. पुरुषाबरोबर हिंडता फिरताना तिच्या हातून मोठ्या चुका घडतात. होऊ नये अशा वेळी ती मनाने हळवी होते. तिचा स्वभाव विलक्षण आहे, ती सहज फुशारते, आणि पुष्कळ वेळा वेडपटपणे वागते.

( येथे लेखिकेने आपले व आपल्या मैत्रिणीचे अशी दोन उदाहरणे दिलीं आहेत. )

मला वाटते अधिक उदाहरणे देऊन माझा मुद्दा स्पष्ट करण्याची आवश्यकता नाही. आपल्याला सर्व तऱ्हेच्या स्त्रियांचा खूप अनुभव आलेला आहे. स्त्रियांना ठिकाणावर ठेवणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या तत्त्वाचा त्यांच्यात अभाव आहे असे मी म्हणते ते कितपत बरोबर आहे हे आपल्याला कळेल.

आपण मला 'हरिजन' वाचण्याचा सल्ला दिला. पण अंतरात्म्याविषयी त्यांत आपण कांही दिशादर्शन केल्याचे आतांपर्यंत माझ्या आढळात आलेले नाही. कांतणे व राष्ट्रीय स्वातंत्र्याकरिता झगडणें ही त्या संबंधांच्य

शिक्षणाची कांही अंगें आहेत एवढेच. त्यानें सारा प्रश्न सुटेलसें वाटत नाही. कारण मी कातणाऱ्या आणि कॉंग्रेसकार्य करण्याचा प्रयत्न करणाऱ्या स्त्रिया पाहिल्या आहेत पण त्या स्त्रीजातीच्या असल्यामुळेच त्याच्या हातून-सुद्धा तशा घोडचुका होत असलेल्या माझ्या पहाण्यांत आहेत.

स्त्रीने पुरुषासारखे व्हावे अशी माझी इच्छा नाही. पण आपण पुरुषाना त्याच्या स्वभावातील हीनतेवर अहिंसेचा तोडगा शिकविला आहे, त्याचप्रमाणे आमचा वेडपटपणा नाहीसा करील अशा प्रकारची शिकवण आपण आम्हाला द्या. आमच्या गुणाचा जास्तीत जास्त चांगला उपयोग कसा करून घ्यावा, आमच्यातील प्रतिकूल गोष्टींना अनुकूल करो करून घ्यावे हे कृपा करून आम्हाला सागा..."

सत्याग्रहाचा शोध लागल्यापासून माझी स्त्रीजातीची सेवा निश्चितपणें सुरू झाली असा मी अभिमान बाळगीत होतों. पण या पत्रलेखिकेचें तर असें मत आहे कीं पुरुषाहून स्त्रीला वेगळ्या रीतीनें वागविलें पाहिजे. तसें असेल तर, कोणाहि ' पुरुषा 'ला त्यांचा प्रश्न बरोबर सोडवितां येईल असें मला वाटत नाहीं. त्यानें कितीहि प्रयत्न केला तरी त्याला अपयशच येणार, कारण निसर्गानें त्याला स्त्री-पेक्षां वेगळ्याच प्रकारचा बनविला आहे. कांटा कुठें खुपतो तें ज्याचें त्यालाच कळणार. म्हणून आपल्याला कशाची गरज आहे हें शेवटीं स्त्रीलाच अधिकृतपणें ठरवावें लागेल. माझें स्वतःचें मत असें आहे कीं, मुळांत ज्याप्रमाणें स्त्री आणि पुरुष हे एक आहेत त्याचप्रमाणें त्यांचा प्रश्नहि तत्त्वतः एकच असला पाहिजे. दोघांमधील आत्मा एकच आहे. दोघांचेंहि जीवन एकच आहे, दोघांनाहि एकाच प्रकारच्या भावना असतात. एकजण दुसऱ्याचा पूरक आहे. दोघेंहि परस्परांच्या प्रत्यक्ष मदतीवांचून जगणें शक्य नाहीं.

पण कसें कोण जाणें, अत्यंत प्राचीन काळापासून पुरुषानें स्त्रीवर आपलें वर्चस्व स्थापिलें आहे, आणि त्यामुळें स्त्रीमध्यें स्वतःविषयीं

न्यूनतेची भावना वाढली आहे. स्त्री पुरुषापेक्षां कमी प्रतीची या पुरुषाच्या स्वार्थी शिकवणुकीला खरें समजून ती त्यावर विश्वास ठेवीत आली आहे, पण पुरुषांमधील सुज्ञांनीं मात्र तिचा समान दर्जा मान्य केला आहे.

तरी कांहीं मर्यादेच्या पुढें त्यांचे पंथ वेगळे होतात यांत शंका नाहीं. मुळांत जरी दोघें एक असलीं तरी शरीराच्या दृष्टीनें त्या दोघांत अत्यंत महत्वाचा भेद असतो हेंहि तितकेंच खरें आहे. म्हणून दोघांचीं कामें वेगवेगळीं असली पाहिजेत. बहुसंख्य स्त्रिया नेहमींच मातृत्वाचें कर्तव्य पत्करतील; तें पार पाडण्यासाठीं त्यांच्यांत असे गुण असले पाहिजेत कीं जे पुरुषांमध्यें असण्याची कांहीं गरज नाहीं ती थंड प्रकृतीची असते; तो क्रियावान् असतो. ती घराची स्वभावसिद्ध स्वामिनी असते. तो मिळवून आणतो, ती तें संभाळते आणि वाटून देते. ती सर्वांची काळजी वहाणारी आहे. मानव-वंशाच्या अर्भकांचें संगोपन करण्याची कला हा तिचाच एकमेव विशेष अधिकार आहे. तिनें काळजी घेतली नाहीं तर मनुष्यजात नष्ट होईल.

आपलें घर सोडून त्या घराच्या रक्षणासाठीं स्त्रीला खांद्यावर बंदूक घेऊन पडण्यास सांगावें किंवा प्रवृत्त करावें हे स्त्री व पुरुष दोघानाहि कमीपणा आणणारें आहे. जंगलीपणाकडे तें परत वळणें आहे, आमच्या नाशाचा तो आरंभ आहे. पुरुष ज्या घोड्यावर बसला आहे त्या घोड्यावर बसण्याचा प्रयत्न स्त्री करील तर ती आपणहि खाली येईल, त्यालाहि खालीं आणील. आपल्या सोबतिणीनें तिचा विशिष्ट व्यवसाय सोडून द्यावा असा तिला मोह पाडण्याचें किंवा तिच्यावर सक्ती करण्याचें पाप पुरुषाच्या माथ्यावर राहील. घरावर बाहेरून हल्ला झाला असतां त्याचा बचाव करण्यामध्यें जितकें शौर्य आहे तितकेंच शौर्य तें घर सुस्थितींत ठेवण्यामध्येंहि आहे.

लाखों शेतकऱ्यांचें त्यांच्या नैसर्गिक परिस्थितींत मी निरीक्षण केलें तेव्हां, आणि रोज या लहानशा सेवाग्रामांत मी त्यांना पहातों तेव्हां, कार्यक्षेत्राची नैसर्गिकरीत्या झालेली विभागणी ठळकपणें माझ्या लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. स्त्रिया लोहारीचें किंवा सुतारीचें काम करीत नाहींत. पण पुरुष आणि स्त्रिया शेतांवर काम करतात, आणि त्यांतलें शक्तीचें काम असेल तें पुरुष करतात. स्त्रिया घर संभाळतात, त्याची व्यवस्था ठेवतात. कुटुंबाच्या तुटपुंज्या उत्पन्नांत त्या भर टाकतात, पण पुरुष हाच मुख्य मिळविता रहातो.

कार्यक्षेत्रांमध्यें विभागणी होते हें मान्य केल्यानंतर मनुष्य म्हणूनजे सर्वसामान्य गुण आणि जी संस्कृति असणें आवश्यक आहे ते गुण व ती संस्कृति स्त्री व पुरुष या दोघांनाहि जवळ जवळ एकच आहेत.

हा मोठा प्रश्न सोडविण्यांत माझा जर काहीं हिस्सा असेल तर तो हा कीं व्यक्ती असोत किंवा राष्ट्रें असोत, त्यांच्या जीवनाच्या प्रत्येक अंगामध्यें सत्य व अहिंसा हीं दाखल झाली पाहिजेत हें मी पुढें मांडलें आहे. या कामीं स्त्री ही निर्विवादपणें पुढारीपण घेईल, आणि अशा रीतीनें मानवी उत्क्रांतीच्या कार्यांत तिला आपलें स्थान सांपडलें म्हणजे तिची स्वतःविषयींची न्यूनतेची भावना नाहींशी होईल, ही आशा मी उराशीं बाळगून आहें. हें जर तिला यशस्वीपणें करतां आलें तर प्रत्येक गोष्टीची दिशा आणि व्यवस्था ठरविविण्याला कामप्रेरणाच कारणीभूत असते या आधुनिक शिकवणुकीवर विश्वास ठेवण्याचें ती निश्चयपूर्वक नाकारील. मला वाटतें, माझी ही मांडणी थोडीशी ओबडधोबडच झाली. पण मला काय म्हणावयाचें आहे तें स्पष्ट झालें असावें. युद्धामध्यें आज सक्रिय भाग घेणारीं लाखों माणसें कामपिशाचानेंच झपाटलेलीं आहेत की काय ? आपापल्या शेतांत एकत्र काम करणारे शेतकरी स्त्री-पुरुष कांहीं कामभाव-

-नेनेंच पीडलेले किंवा तिचे गुलाम झालेले नसतात. याचा अर्थ स्त्री-पुरुषांत जन्मजात असणाऱ्या त्या प्रेरणेपासून ते मुक्त आहेत असें मला म्हणावयाचें किंवा सुचवावयाचें आहे असा नाहीं. पण आजच्या कामविषयक वाङ्मयानें ज्यांचीं मनें भरलेली आहेत त्यांच्या जीवनांत जसें त्या भावनेचें वर्चस्व आढळतें तसें वर्चस्व या लोकांच्या जीवनांत खात्रीनें नसतें. जगायचें कसें हा भयानक प्रश्न पुढें आ वासून उभा असतांना असल्या गोष्टींचा विचार करण्यालासुद्धां पुरुषाला किंवा स्त्रीला सवड कुठली ?

स्त्री ही अहिंसेची मूर्ति आहे असें मी वारंवार म्हटलें आहे. अहिंसा म्हणजे अथांग प्रेम. याचाच अर्थ कष्ट सोसण्याची अपार शक्ति. मनुष्याची जन्मदात्री जी स्त्री तिच्यावांचून ही शक्ति मोठ्या प्रमाणात कोण दाखविणार ? आपल्या तान्हुल्याला नऊ महिने पोटात वाहतांना आणि पोसतांना ती ही शक्ति दाखविते आणि होणाऱ्या यातना आनंदानें भोगते. प्रसूतीकाळच्या वेदनांपुढें इतर वेदनांची काय कथा ? पण त्या वेदनासुद्धां ती उत्पत्तीच्या आनंदांत विसरते. आपलें छकुलें दिवसेंदिवस वाढत जावे यासाठीं रोजच्यारोज कोण खस्ता खाते ! तेंच प्रेम तिनें साऱ्या मानवजातीवर करायला लागावें, आपण कधींकाळीं पुरुषाची भोगवस्तु होतों किंवा होऊं शकतों हें तिनें विसरून जावें. मग पुरुषाची माता, जन्मदात्री आणि मूक पुढारी या नात्यानें पुरुषाच्या बरोबरीचें माननीय स्थान तिला प्राप्त होईल. शांतीच्या अमृताकरितां तहानलेल्या भांडखोर जगाला शांतीची कला शिकविणें हें तिचेंच सर्वस्वी काम आहे. सत्याग्रहाचें पुढारीपण तीच घेऊं शकेल, कारण त्याला पुस्तकी विद्वत्तेची जरूर नसते. कष्ट सहन करण्यानें आणि श्रद्धेनें मजबूत बनलेल्या हृदयाची मात्र त्याला गरज असते.

कांहीं वर्षांपूर्वी पुण्याच्या ससून हॉस्पिटलमध्यें मी आजारी असतांना माझी शुश्रुषा करणाऱ्या भल्या परिचारिकेनें एका बाईची मला गोष्ट सांगितली. पोटांत असलेल्या मुलाचे प्राण धोक्यांत येऊं नयेत म्हणून तिनें क्लोरोफॉर्म (गुंगीचें औषध) घेण्याचें साफ नाकारलें. त्यामुळें ऑपरेशन करतांना तिला फार यातना सोसाव्या लागल्या. आपल्या तान्हुल्याविषयींचें प्रेम हेंच एकमेव तिला गुंगीचें औषध होतें. त्याला वांचविण्याकरितां वाटेल तितकें दुःख सोसावें लागलें तरी त्याची तिला खातर नव्हती. अशा पुष्कळ शूर स्त्रिया आपल्यामध्यें असतात हें माहीत असणाऱ्या स्त्रियांनीं आपल्या स्त्रीत्वाचा तिरस्कार करूं नये किंवा आपण पुरुषाच्या जन्माला कां गेलों नाहीं म्हणून खेद मानूं नये. त्या शूर स्त्रीची आठवण झाली कीं अशी योग्यता एक स्त्रीचीच हें कळून येऊन मला तिचा हेवा वाटतो; ती योग्यता तिला स्वतःला मात्र कळली पाहिजे. आपण पुरुष झालों तर किती बरें होईल असें जसें स्त्रीला वाटतें तसें आपण स्त्री व्हावें असें पुरुषाला कां नये वाटूं ? पण हें वाटणें व्यर्थ आहे. ज्या स्थितींत आपण जन्माला आलों आहों त्या स्थितींत आनंद मानावा आणि आज निसर्गानें जें कर्तव्य आपल्याकडे सोपविलें तें आपण पार पाडावें.

# स्त्रियांचें स्थान : ३

आतापर्यंत विवाहाच्या मोहाला ज्यांनी यशस्वीपणे तोंड दिले आहे अशा एक बाई लिहितात.—

" काल मलबारी हॉल [ मुंबई ] मध्ये एक स्त्रियांची परिषद झाली त्या परिषदेत पुष्कळ चांगली भाषणें झाली, चांगले ठराव पास झाले. शारदा बिल हा त्या दिवशी परिषदेपुढील मुख्य प्रश्न होता. आपण मुलींचे लग्नाचे वय १८ वर्षे धरता याबद्दल आम्हाला कितीतरी आनंद वाटतो. दुसरा एक महत्त्वाचा ठराव वारसाकायद्यासंबंधी होता. आपण 'नवजीवन' किंवा 'यंग इंडिया' मध्ये याविषयी जर एखादा सणसणीत लेख लिहिलात तर त्याची किती मदत होईल! आपला जन्मजात हक्क व मान मिळविण्याकरीता स्त्रियांना भिक्षा मागायला का लागावी किंवा झगडायला तरी का लागावे? स्त्रीच्याच पोटी जन्माला आलेल्या पुरुषाने मोठ्या दिमाखाने स्त्रीला 'अबला' म्हणावे आणि आम्हाला जे त्याने दिलेच पाहिजे तें 'देतो' म्हणून थोर तोंडाने आश्वासन द्यावे, हे किती विचित्र आणि त्याचबरोबर किती करुणाजनक, हास्यास्पद आहे! 'देतो' म्हणे! कसली ही मूर्खपणाची भाषा? ज्यांच्या हाती पाशवी बळ आहे त्यांनी दांडगाव्याने लोकांकडून जे हिसकून घेतले ते त्यांना परत करण्यात 'थोरपणा' कसला,? 'दाक्षिण्य' तरी कसले? स्त्रिया पुरुषापेक्षा कोणत्या बाबतीत कमी ठरतात? वारसाच्या वाटणीत पुरुषापेक्षा त्यांचा हिस्सा कमी का असावा? तो समसमान का असू नये? दोन दिवसापूर्वी काही मंडळींशी आम्ही या बाबतीत खूप कडाक्याने वाद करीत होतो. एक बाई म्हणाल्या, 'आम्हाला नको बाई कायद्यात बदल व्हायला. आहे त्यात आम्हांला समाधान आहे. विचार केला तर, कुळाचं

नांव आणि परपरा चालविणाऱ्या मुलांकडेच मोठा हिस्सा जावा हे न्याया-चच आहे. तोच कुटुंबाचा आधार आहे.' आम्ही विचारलें, 'मग मुलीचं काय?' तेथें असणारा एक धिप्पाड तरुण मध्येच म्हणाला, 'हः, त्याच काय? तिचा 'तो' तिची काळजी घेईल ना?' अस्सं काय? 'तिचा तो'! नेहमी तिचा 'तो'! हा 'तो' म्हणजे पीडा होऊन बसली आहे! 'तो' असण्याचे कारण काय? 'तो' असेलच असे कां धरून चालावें? मुलगी म्हणजे जणू एखादं गांठोडेच आहे, 'तो' येईपर्यंत आईबापांनीं ते आपल्या घरांत कसेबसें संभाळायचे आणि तो आला म्हणजे सुटकेचा एक निःश्वास टाकून थडपणे त्याच्या स्वाधीन करायचे! तुम्ही स्वतः जर मुलगी असता तर तुम्ही नसता का खरोखर खवळून उठलां?"

पुरुष स्त्रियांवर करीत असलेल्या जुलमांबद्दल खवळून जाण्याला मला मुलगीच झालें पाहिजे असें नाहीं. त्या जुलमांच्या यादींत वारसाचा कायदा हा कमींत कमी जुलमाचा मी मानतों. वारसाच्या कायद्यानें जें अनिष्ट सूचित होतें त्याहून अतिशय मोठ्या प्रकारच्या अनिष्टाशीं सारडा बिल झगडत आहे. पण स्त्रीच्या हक्कांच्या बाब-तींत मी पडतें न घेणारा आहें. पुरुषाला जे कायदे नडत नाहींत ते स्त्रियांना नडतां कामा नयेत या मताचा मी आहें. मुलांना आणि मुलींना मी पूर्ण समानतेच्या दृष्टीनें वागवीन. स्त्रिया जसजशा आपलें बळ ओळखूं लागतील—आणि त्यांना शिक्षण मिळत आहे त्या प्रमाणांत तें त्यांनीं ओळखलेंहि पाहिजे—तसतसा त्यांना भोगाव्या लागत असलेल्या उघड उघड वैषम्याचा साहजिकच त्यांना संताप येईल.

पण कायद्याच्या बाबतींतील विषमता काढून टाकणें हा उपाय निव्वळ तात्पुरता होईल. या दोषाचें मूळ लोक समजतात त्यापेक्षां फार खोल रुजलेलें आहे. त्याचें मूळ मनुष्यामध्यें असलेल्या सत्तेच्या व कीर्तीच्या लोभांत आहे, आणि त्याहूनहि खोल म्हणजे स्त्री-पुरुषांच्या परस्परां-

विषयींच्या लालसेंत आहे. मनुष्याला नेहमीं सत्तेची इच्छा असते. मालमत्तेवरील मालकीनें ही सत्ता मिळते. सत्तेवर अधिष्ठित असणारी कीर्ति मेल्यानंतरसुद्धां मिळावी अशी भूक पुरुषाला असते. मालमत्तेचे जर वाढत्या क्रमानें तुकडे तुकडे होत गेले—आणि नव्या पिढींतील साऱ्यांनाच समान हिस्सा द्यावयाचा म्हटलें म्हणजे तसे तुकडे होत जाणारच—तर मग ही भूक भागणार कशी? म्हणून मग सर्वांत वडील मुलाकडे जिंदगीचा मोठा हिस्सा वारसाहक्कानें देणें प्राप्त होतें. स्त्रिया बहुतेक लग्न करतात आणि कायदा जरी त्यांच्याविरुद्ध असला तरी त्या आपल्या नवऱ्याच्या सत्तेंत आणि अधिकारांत भागीदार होतातच. अमक्या जमीनदाराची बायको म्हणूनच ती 'जमीनदारीण,' 'बाईसाहेब' 'राणीसाहेब' होते आणि त्यांत तिला आनंद वाटतो. म्हणून विषमतेच्या वागणुकीच्या बाबतींत तात्त्विक चर्चा करीत असतांना जरी त्यांनीं आमूलाग्र सुधारणा होण्याच्या बाजूनें मत दिलें तरी त्या मताप्रमाणें वागण्याचा प्रसंग येतो तेव्हां या अधिकारापासून दूर होण्याची त्यांची इच्छा नाहीं असेंच आढळून येतें.

म्हणून, कायद्याच्या बाबतींत असलेल्या स्त्रियांच्या सर्व अपात्रता दूर कराव्या या मताचा मी नेहमीं पुरस्कार करीत असलों तरी हिंदुस्थानांतील जाणत्या स्त्रियांनीं मूळ कारणालाच हात घातला पाहिजे असें मी म्हणेन. स्त्री ही त्यागाची आणि सहनशीलतेची मूर्ति आहे, आणि म्हणून सार्वजनिक जीवनांत तिचा प्रवेश झाला तर तें शुद्ध होईल, बेलगामी महत्वाकांक्षेला आणि मालमत्तेच्या संग्रहाला त्यामुळें आळा बसेल. लाखो लोकांच्याजवळ पुढल्या पिढीला द्यायला कवडीहि नसते हें या स्त्रियांनीं समजून असावें. वाडवडिलांची मिळकत आपण मुळींच घेणार नाहीं अशी शिकवण या लोकांपासून कांहीं स्त्रियांनीं तरी घेतली पाहिजे.

आईला किंवा बापाला आपल्या सर्व मुलांना सारखी वांटतां येईल अशी खरी इस्टेट म्हणजे तिचें वा त्याचें शील आणि त्या मुलांच्या शिक्षणाची ते करीत असलेली सोय हीच होय. आईबापांनीं आपले मुलगे व मुली स्वावलंबी कशीं होतील, निढळाच्या घामानें प्रामाणिकपणें आपलें पोट भरण्याला तीं मुलें समर्थ कशीं होतील, हें पहावें. अज्ञान मुलांच्या संगोपनाचा भार आपोआप मग वंशजावर पडेल. श्रीमंतांनीं आपल्या मुलांना वाडवडिलांच्या इस्टेटीचे गुलाम बनविण्याची अश्लाघ्य आकांक्षा ठेवण्याऐवजीं स्वतंत्र कसें व्हावें हें त्यांना शिकविण्याची रास्त आकांक्षा धरली तर त्यांच्या मुलांत आज असणारा नेभळटपणा पुष्कळसा निघून जाईल वाडवडिलांच्या इस्टेटीचे गुलाम होण्यानें त्यांच्यांतील साहसवृत्ति मरते आणि आळस व चैन यांबरोबरच इतर विकार बळावतात. दीर्घकाल सांठत आलेले दोष शोधून काढून नाहींसे करणें हा जागृत स्त्रियांनीं आपला विशेष अधिकार मानावा.

स्त्रीजातीला अपात्र ठरविण्याच्या बाबतींत स्त्रीपुरुषांमधील परस्पराविषयींच्या लालसेचाहि मोठा भाग आहे हें दाखवून द्यायला पाहिजे असें नाहीं. स्त्रीनें पुरुषाला अनेक प्रकारें नकळत सूक्ष्म मार्गांनीं फसविलें आहे. तसेंच आपल्यावर वर्चस्व मिळविण्याच्या स्त्रीच्या प्रयत्नांत मोडता घालण्याची तितक्याच नकळत पण व्यर्थ धडपड पुरुषानें केली आहे. या दोन्हींचा परिणाम काय झाला? प्रगति खुंटली. या दृष्टीनें पाहिलें असतां हा एक अत्यंत गंभीर प्रश्न वाटतो. भारतमातेच्या जाणत्या मुलांनींच तो सोडला पाहिजे.

आपण पाश्चात्य चालीरीतींची नक्कल करतां कामा नये. त्या चालीरीती तिकडच्या परिस्थितीला अनुकूल असतील कदाचित्. हिंदी प्रकृतीला आणि हिंदी परिस्थितीला अनुरूप अशाच पद्धति

येथें लागू केल्या पाहिजेत. स्वतःला कह्यांत ठेवणाऱ्या, शुद्ध करणाऱ्या, स्थिरता देणाऱ्या आपल्या खंबीर हातांनीं त्यांनीं आमच्या संस्कृतींत जें उत्कृष्ट आहे त्याचें रक्षण केलें पाहिजे आणि जें हिणकस, अधोगतीला नेणारें असेल तें न कचरतां झिडकारलें पाहिजे. सीता, द्रौपदी, सावित्री आणि दमयंती यांसारख्या स्त्रियांचें हें काम आहे, पुरुषी थाटाच्या किंवा नखरा करणाऱ्या स्त्रियांचें नव्हे.

---

# स्मृतिग्रंथांत स्त्रिया : ४

बेझवाडा येथें प्रसिद्ध होणाऱ्या ' इंडिअन स्वराज्य ' या पत्राचा एक अंक एका पत्रलेखकानें माझ्याकडे पाठविला आहे. त्यांत स्मृतींमध्यें 'स्त्रियांचें स्थान' या विषयावर एक लेख आला आहे. त्यांतून कांहीं उतारे मी कांहींहि बदल न करतां येथें उतरून घेतले आहेत:—

शीलहीन, कामी वृत्तीचा, किंवा सद्गुणरहित जरी पति असला तरी साध्वी स्त्रीने पतीची देवाप्रमाणे पूजा करावी.

( मनु ५—१५४ )

स्त्रियांनी आपल्या पतीच्या वचनानुसार चालावे.

( याज्ञवल्क्य १—१८ )

स्त्रीकरिता वेगळा यज्ञ, व्रत किंवा उपोषण नाहीं. पतीच्या सेवेनेंच स्त्रीला स्वर्गात मान मिळतो. ( मनु ५—१५५ )

पति जिवत असतां जी स्त्री उपोषण किंवा व्रतें करते, ती आपल्या पतीचे आयुष्य कमी करते. अशी स्त्री नरकाला जाते. ज्या स्त्रीला तीर्थानुष्ठान करावयाचे असेल तिने आपल्या पतीचे पाय अथवा सर्वांग धुवावे आणि ते पाणी प्यावे; त्यायोगे तिला अत्युच्च स्थान प्राप्त होते. ( अत्री १३६—१३७ )

स्त्रीला पतीच्या लोकांहून तिसरा उच्च लोक नाहीं. जी स्त्री आपल्या पतीला असंतुष्ट करते ती मृत्यूनंतर तिसऱ्या लोकाला जाऊं शकत नाहीं. म्हणून तिने आपल्या पतीला कधींहि दुखवूं नये.

( वशिष्ठ २१—१४ )

जी स्त्री आपल्या माहेरच्या माणसांच्या गुणांचा गर्व करून पतीची आज्ञा उल्लघन करते तिला तिला लोकसमुदायापुढे कुत्र्यांकडून राजानें खाववावें. ( मनु ८—३७१ )

पतीची अवज्ञा करणाऱ्या स्त्रीने वाढलेले अन्न कोणीहि खाऊ नये. अशा स्त्रीला विषयासक्त म्हणावे. ( आंगिरस् ६९ )

दुर्व्यसनी, मद्यपी अथवा व्याधीनें पीडलेल्या पतीची स्त्रीनें जर अवज्ञा केली तर त्या स्त्रीची मूल्यवान् वस्त्रे भूषणे काढून घेऊन तिला दूर ठेवावी. ( मनु १०—७८ )

स्त्रीला मानवजातीची माता मानणाऱ्या आणि आपल्याइतकेंच स्वातंत्र्य तिला असलें पाहिजे अशी इच्छा हृदयाशीं बाळगणाऱ्या पुरुषांच्या अंतःकरणात ज्या वचनांविषयीं यत्किंचितहि आदर उत्पन्न होत नाहीं अशीं वचनें स्मृतिग्रंथांत असावीं याबद्दल वाईट वाटतें, आणि सनातनी मताच्या मंडळींच्या वतीनें प्रसिद्ध होणाऱ्या वृत्त-पत्रांनें अशीं वचनें जणूं तीं धर्माचें अंगच असें समजून प्रसिद्ध करा-वींत याचें तर विशेष दुःख होतें. अर्थात् स्मृतींमध्यें अशीं दुसरी कित्येक वचनें आहेत कीं तीं स्त्रीला तिचे योग्य स्थान देतात आणि तिला अत्यंत पूज्य मानतात. ज्या स्मृतींमध्यें एके ठिकाणी एक वचन तर दुसऱ्या ठिकाणीं बरोबर त्याच्या विरुद्ध नीतिभाव-नेला धक्का देणारें वचन आहे, अशा स्मृतींच्या बाबतींत काय करावें असा प्रश्न उद्भवतो. मी पूर्वींच पुष्कळ वेळां सुचविलें आहे कीं धर्म-ग्रंथांच्या नांवानें जें कांहीं छापलें जातें तें सर्व परमेश्वराचा किंवा अंतःस्फूर्त शब्द म्हणून ग्राह्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं. पण चांगलें व मूळचें कोणतें हें कांहीं प्रत्येकाला ठरवितां येत नाहीं. याकरितां एक अधिकृत मंडळ असावें, त्या मंडळानें धर्मग्रंथ म्हणून जें कांहीं आहे तें सर्व तपासून पहावें. ज्या वचनांना नैतिक दृष्ट्या कांहीं किंमत नाहीं, किंवा जीं धर्माच्या आणि नीतीच्या मूळ सिद्धां-

ताच्याच विरुद्ध आहेत अशीं वचनें त्यांतून काढून टाकावींत, आणि असे शुद्ध केलेले ग्रंथ हिंदु लोकांच्या मार्गदर्शनाकरितां पुढें ठेवावे. सर्व हिंदु समाज आणि धर्ममार्तंड समजल्या जाणाऱ्या व्यक्ती अशा अधिकृत मंडळाचा अधिकार मान्य करणार नाहींत अशी जरी खात्री वाटत असली तरी हें पवित्र कार्य अंगावर घेण्याला कचरूं नये. कळकळीनें आणि सेवेच्या बुद्धीनें केलेल्या कामाचा अंतीं परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं, आणि ज्यांना अशा तऱ्हेचें साह्य अत्यावश्यक आहे त्यांना त्याची मदत झाल्यावांचून खचित रहाणार नाहीं

# स्त्रिया आणि वर्ण : ५

एक माननीय मित्र लिहितातः—

" 'हरिजन' मध्ये 'वर्ण' या विषयावर आपण नुकताच जो लेख लिहिला त्यावरून आपण दिग्दर्शित केलेला वर्णसिद्धांत फक्त पुरुषवर्गालाच लागू व्हावयाचा असे दिसते. मग स्त्रियांच्या बाबतीत काय ? स्त्रियांचा वर्ण कशाने ठरणार ? कदाचित आपण म्हणाल, तिच्या लग्नापूर्वी पित्याचा जो वर्ण तोच तिचा होईल, लग्नानंतर ती पतीचा वर्ण घेईल. यावरून, स्त्रीने 'लहानपणी बापाच्या, तरुणपणी पतीच्या, आणि पतीच्या मृत्यूनंतर मुलाच्या आधीन रहावे, स्त्रीला स्वातंत्र्य असू नये, या मनूच्या कुप्रसिद्ध आज्ञेलाच आपला पाठिंबा आहे असे समजावयाचे काय ?

ते काहीहि असो, या काळांत वयांत आलेल्या प्रत्येक स्त्रीला मताधिकार आहे, आणि स्वतंत्र व्यवसायांच्या मागे पुरुषाप्रमाणे तीही निश्चितपणे लागलेली आहे, ही आज वस्तुस्थिति आहे. त्यामुळे, स्त्री शाळेत मास्तरीण आहे तर तिचा नवरा सावकारीचा धंदा करतो आहे अशासारखी स्थिति आज सर्वत्र दिसून येत आहे. अशा परिस्थितीत स्त्री कोणत्या वर्णाची म्हणावी ? वर्णाश्रमधर्माप्रमाणे पुरुष सरळ आपल्या वाडवडिलांचा व्यवसाय आणि म्हणून वर्णसुद्धां पत्करील, आणि स्त्री आपल्या वडिलांचा वर्ण स्वीकारील; लग्नानंतर त्या दोघांनी आपापल्या व्यवसायाला खुशाल चिकटून रहावें. या दोघांना झालेली मुले कोणाच्या वर्णाची होतील ? की हा प्रश्न मुलांनीच पुढे स्वतंत्रपणे ठरवावा असे म्हणाल ? तसा तो त्यांच्या मर्जीवर सोपविला तर, आपण जे वर्णधर्माचे स्वरूप वर्णिले आहे त्या धर्माप्रमाणे वर्ण वंशपरंपरा चालावयाचा तो कसा चालेल ? "

माझ्या मतें हा उपस्थित केलेला प्रश्न आज जी परिस्थिति आहे तिच्या दृष्टीनें अप्रस्तुत आहे. माझ्या ज्या लेखाचा उल्लेख पत्रलेखकानें केला आहे त्या लेखांत मी दर्शविल्याप्रमाणें वर्णांचा गोंधळ झाल्यामुळें वास्तविक आज वर्ण अस्तित्वांतच नाहींत. वर्ण-सिध्दांताप्रमाणें समाज आज चालत नाहींसा झाला आहे. हिंदु समाजाची आजची अवस्था म्हणजे अंदाधुंदीची अवस्था म्हणतां येईल; चार वर्ण आज नाममात्र राहिले आहेत. 'वर्णा'च्याच भाषेंत बोलावयाचें झालें तर सर्वांना, मग ती स्त्री असो पुरुष असो, एकच वर्ण लागू आहे—आपण सारे शूद्रच आहोंत.

वर्णधर्माचें पुनरुज्जीवन होईल तेव्हां त्यांत, माझ्या कल्पनेप्रमाणें, मुलगी ही तिच्या भावाप्रमाणें लग्नापूर्वी आपल्या बापाच्या वर्णाची राहील. भिन्न वर्णांमध्यें विवाह फार क्वचित होतील. त्यामुळें, लग्ना-नंतरसुध्दां मुलीचा वर्ण बदलण्याचा संभव राहणार नाहीं. पण जर नवरा भिन्न वर्णाचा असला तर ती लग्नानंतर साहजिकच नवऱ्याच्या वर्णाची होईल आणि आईबापांचा वर्ण सोडून देईल. वर्णधर्माचें पुनरुज्जीवन होईल तेव्हां वर्णसंस्थेंतील चारी वर्णांचा सामाजिक दर्जा सर्वस्वीं समान राहणार असल्यामुळें अशा रीतीनें वर्णाचा बदल केल्यानें कोणाच्याहि मनोभावना दुखावल्या जातील असें समजण्याचें कारण नाहीं.

सरसहा पत्नी ही पतीपासून स्वतंत्रपणें व्यवसाय चालवील अशी माझी कल्पना नाहीं. मुलांचें संगोपन आणि घराचा संभाळ या दोन कामात तिची शक्ति भरपूर उपयोगांत येईल. सुसंघटित समाजांत पोषणाचा भार तिच्यावर पडतां कामाचा नाहीं. पुरुषानें कुटुंबपोष-णाकडे पहावें, स्त्रीनें गृहव्यवस्थेकडे लक्ष द्यावें, आणि अशा रीतीनें दोघांनीं एकमेकांच्या कामाला पूरक व्हावें, हातभार लावावा.

यांत मला स्त्रीच्या हक्कांवर गदा आणल्यासारखें किंवा तिच्या स्वातंत्र्यावर दडपण घातल्यासारखेंहि कांहीं दिवस नाहीं. 'न भजेत्स्त्री स्वतंत्रताम्' ( स्त्रीला स्वातंत्र्य असूं नये ) असें मनूनें म्हटलें आहे असें म्हणतात तें पवित्र वचन मी मानीत नाहीं. त्यावरून एवढेंच फक्त दिसून येतें कीं ज्या काळीं हें वचन अमलांत होतें त्या काळीं स्त्रियांना कदाचित् पारतंत्र्यांत ठेवीत असावेत. पत्नीचें वर्णन आपल्या वाङ्मयांत 'अर्धांगना' 'सहधर्मिणी' या शब्दांनी केलें आहे. पति पत्नीला 'देवी' म्हणून संबोधतो. यावरून ती कमी प्रतीची मानली जात असेल असें दिसत नाहीं. पण दुर्दैवानें अशी एक वेळ आली कीं जेव्हां स्त्रीचे पुष्कळसे हक्क आणि विशेषाधिकार काढून घेण्यांत आले आणि तिला गौणपद प्राप्त झालें. पण त्यामुळें तिच्या वर्णाला कमीपणा येण्याचा कांहींच प्रश्न नव्हता. कारण, 'वर्ण' हा ठराविक हक्क किंवा विशेष अधिकार दर्शवीत नाहीं. तो फक्त कर्तव्यकर्में किंवा आवश्यक बंधनें सांगतो आणि आमच्या कर्तव्यापासून तर आम्हांला कोणीहि ढळवूं शकणार नाहीं. आमचीं आम्हींच ती उडवून लावलीं तर गोष्ट वेगळी. जी स्त्री आपलें कर्तव्यकर्म जाणते व तें बरोबर पार पाडते तिला तिचें प्रतिष्ठित स्थान प्राप्त होतें. ती घरांतील गुलाम न होतां घराची राणी बनते आणि त्यावर आपली सत्ता चालविते.

समाजांतील स्त्रीच्या कामगिरीसंबंधानें मी जी भूमिका मांडली आहे ती जर मान्य करण्यांत आली तर मुलांचा वर्ण कोणता हा प्रश्न अडचणीचा रहाणार नाहीं, हें यानंतर सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण पतीचा वर्ण आणि पत्नीचा वर्ण असा विरोध पुढें राहाणारच नाहीं.

---

# स्त्रिया आणि लष्करशाही : ६

लष्करशाहीला तोंड देण्याच्या कामीं स्त्रियांना कशी मदत देतां येईल हा प्रश्न स्पष्टपणे कित्येक सभामध्ये विचारण्यांत आला. इटलीमध्ये एका खासगी सभेत, इटलीतील स्त्रियाना हिंदुस्थानांतील स्त्रियापासून काय शिकण्यासारखे आहे ते सांगण्याची गांधीजीना विनति करण्यात आली होती.

पॅरिसमध्ये बोलताना गांधीजी म्हणाले:—

आपण दुर्बल जातीच्या आहोंत ही भावना जर स्त्रिया विसरून जातील तर त्यांना युध्दविरोध पुरुषांपेक्षां कितीतरी पटीनें अधिक करतां येईल, याविषयीं मला बिलकुल शंका नाहीं. तुमच्या मोठमोठ्या योध्द्यांच्या आणि सेनापतींच्या बायकांनीं, मुलींनीं आणि मातांनीं लष्करशाहींत कशाहि स्वरूपाचा भाग घ्यायचा नाहीं असें ठरविलें तर ते तुमचे योध्दे आणि मोठे सेनापती काय करूं शकणार आहेत, याचें उत्तर तुमचें तुम्हींच द्या.

लॉसेन येथे ते म्हणाले:—

युरोपच्या स्त्रियांकरितां जो संदेश तुम्ही मागितला तो देण्याचें धैर्य माझ्यांत आहे कीं नाहीं कुणास ठाऊक. युरोपांतील स्त्रियांना जर राग वाटणार नसेल तर त्यांना मी आपलीं पावलें हिंदुस्थानच्या स्त्रियांकडे वळवा असें सांगेन. गेल्या वर्षीं हिंदुस्थानच्या स्त्रिया एक होऊन उठल्या. खरोखर मला विश्वास आहे कीं अहिंसेचा पाठ युरोपला जर अंगीं बाणवून घ्यावयाचा असेल तर तो आपल्या स्त्रियांच्या द्वाराच घेतां येईल. स्त्री ही मला आत्मत्यागाची मूर्तीच वाटते.

पण आपलें स्थान पुरुषाहूनहि अधिक बळकट आहे हें आज दुर्दैवानें तिला कळत नाहीं. टॉल्स्टॉय म्हणत असत, त्याप्रमाणें त्या पुरुषाच्या मोह पाडणाऱ्या प्रभावाखालीं दबलेल्या आहेत. त्यांनीं अहिंसेची शक्ति जर ओळखली तर आपल्याला त्या अबला म्हणूं देणार नाहींत.

इटलीमध्ये एका स्त्रीसमाजापुढे बोलतांना ते म्हणालेः—

अहिंसक युद्धामध्यें ही सुंदरता आहे कीं त्यांत पुरुषाइतकाच स्त्रिया आपला वांटा उचलूं शकतात. हिंसक लढाईत तो अधिकार त्यांना मिळत नाही. आमच्या गेल्या अहिंसक लढाईत स्त्रियांनीं पुरुषापेक्षां जास्त कामगिरी बजाविली आहे. त्याचें कारण साधें आहे. अहिंसक लढाईत पराकाष्ठेचे कष्ट सहन करावे लागतात, आणि स्त्रियांहून अधिक शुद्धतेनें, अधिक उदात्तपणें कष्ट सहन करण्याला दुसरें कोण समर्थ आहे ? हिंदुस्थानांतील स्त्रियांनीं पडदा फाडून टाकला आणि राष्ट्रासाठी काम करायला त्या पुढें आल्या. केवळ घरदार संभाळीत बसण्यापेक्षां देशाला आपल्याकडून अधिक अपेक्षा आहे हें त्यांनीं पाहिलें. त्या बेकायदा मीठ तयार करूं लागल्या; विदेशी कापडाच्या आणि दारूच्या दुकानावर पिकेटिंग करूं लागल्या आणि दुकानदारांना तसेंच गिऱ्हाइकांना दोन्हीपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करूं लागल्या. रात्रीं अपरात्रींसुद्धां मोठ्या धैर्यानें आणि हृदयात दयाभाव बाळगून त्या दारुड्याच्या मागोमाग त्यांच्या खोपट्यांत जात असत. त्या तुरुंगांत गेल्या आणि पुरुषांनीं खाल्ल्या नाहींत अशा लाठ्या त्यांनी खाल्ल्या. पश्चिमेकडील स्त्रियांना पशू होण्यांत पुरुषांशीं स्पर्धा करावयाची असेल तर हिंदुस्थानांतील स्त्रियांकडून त्यांना कांहीं शिकण्याजोगें नाहीं. लोकांना मारण्यासाठीं आपल्या नवऱ्यांना आणि मुलांना पाठविण्यांत आणि त्यांच्या शौर्याचें कौतुक करण्यांत त्यांनीं आनंद मानण्याचें सोडलें पाहिजे. म. दे.

# स्त्रिया आणि त्यांचें कार्य : ७

प्रश्नः—आपण म्हणता, "स्त्रीला घर सोडून देऊन त्या घराच्या रक्षणाकरिता खांद्यावर बंदूक घेऊन बाहेर पड असे सांगण्यात यावे किंवा तिला तसे करण्याला प्रवृत्त करावे हे स्त्रीला आणि पुरुषाला दोघानाहि कमीपणा आणणारे आहे, जंगलीपणाकडे ते परत वळणे आहे, आमच्या नाशाचा तो आरंभ आहे." मग शेते, वाड्या, कारखाने इ. मध्ये काम करणाऱ्या लाखों स्त्रियांविषयी आपण काय म्हणाल? त्याना घरदार सोडून भाकरी मिळविण्यासाठी सक्तीने बाहेर पडावे लागते. आपण काय कारखानदारी पद्धति नष्ट करून पाषाणयुगाकडे परत जावे म्हणता? ते जंगलीपणाकडे परत वळणे नव्हे काय? आपल्या नाशाचा तो आरंभ नव्हे काय? स्त्रियाना सक्तीने काम करायला लावण्याचे पातक ज्या युगात घडणार नाही असे कोणते नवे युग आपल्या दृष्टीपुढे आहे?

उत्तर—जर लाखों स्त्रियाना आपलें घरदार सक्तीनें सोडावें लागून पोटाकरितां मजुरी करावी लागत असेल तर तें अयोग्य आहे; पण बंदूक खांद्यावर टाकण्याइतकें मात्र तें अयोग्य नाहीं. मजुरी करण्यांत मूलतः कांहींच जंगलीपणा नाहीं. स्त्रिया आपलीं घरेंदारें संभाळून आपल्या शेतांत आपणहून कामें करीत आहेत यांत मला कसलाच जंगलीपणा वाटत नाहीं. माझ्या कल्पनेंतील नव्या युगांत प्रत्येकजण आपल्या कुवतीप्रमाणें काम करील, आणि त्या कामाबद्दल योग्य तितका मोबदला त्याला मिळेल. नव्या युगांत स्त्रिया फावल्या वेळांत कामें करतील. त्यांचें प्रधान कार्य घर संभाळणें हें राहील.

नव्या युगांत बंदुकीला कायमचें स्थान मिळेल असें मी मानीत नाहीं. तिचा वापर हळू हळु मर्यादित केला जाईल आणि तोहि पुरुषांपुरताच. बंदूक आहे तोंवर तें एक आवश्यक पाप समजून तिला खपवून घेतलें जाईल. पण त्या पापाचा स्त्रीला मात्र मी जाणूनबुजून विटाळ होऊं देणार नाहीं.

---

# अयोग्य प्रकारचें नारी-पूजन : ८

गुजराथ साहित्य परिषदेच्या नोव्हेंबर १९३६ च्या अधिवेशनांत गांधीजींनी विषयनियामक समितीपुढील आपल्या भाषणांत ज्या एका विषयाचा उल्लेख केला तो विषय 'ज्योतिसंघ' नावाच्या गुजराथेतील एका स्त्रीसंस्थेंतील कांही सन्मान्य महिलांनी गांधीजींना एक पत्र पाठविलें होतें त्यांमधून त्यांना मिळाला. त्या पत्राबरोबरच संघानें पास केलेला एक महत्त्वाचा ठरावहि त्या महिलांनी पाठविला होता. आजकाल वाङ्मयांतून स्त्रियांना ज्या तऱ्हेनें रंगविण्याची प्रवृत्ति सुरू झाली आहे त्या प्रवृत्तीचा त्या ठरावांत निषेध केला होता. त्यांच्या या निषेधांत गांधीजींना बरेंच तथ्य वाटलें. ते म्हणाले—

"या महिलांनीं जो आरोप केला आहे त्या आरोपांतील सार हें आहे कीं, आजकालचे लेखक स्त्रियांचें अत्यंत खोटें चित्र रेखाटीत असतात. तुम्ही लेखक लोक ज्या किळसवाण्या भावनावशतेनें त्यांना रंगवितां, हीन रीतीनें तुम्ही त्यांच्या शरीराकृतीचें पाल्हाळिक वर्णन करीत बसतां, त्यांचा त्यांना संताप येतो. त्यांच्या शरीराच्या बाह्य रूपांत, पुरुषांच्या कामुक दृष्टीला तृप्त करण्याच्या त्यांच्या कुवतींत का त्यांचें सारें सौंदर्य, त्यांचें खरें बळ आहे ? 'स्त्रिया म्हणजे गरीब, नित्य ताबेदारींत राहाणाऱ्या घरच्या मोलकरणी, नवरा हेंच त्यांचें दैवत, असेंच आमचें वर्णन जगाच्या अंतापर्यंत केलें जावें का,' अशी या पत्रलेखिकांची पृच्छा आहे. त्या जशा आहेत तसेंच त्यांना कां रेखाटूं नये ? त्या म्हणतात कीं,

'आम्ही स्वर्गांगनाहि नाहीं, किंवा केवळ विकारांचीं आणि भावनांचींच भेंडोळींहि नाहींत. पुरुष ज्या प्रकारचे मानवी प्राणी आहेत त्याच प्रकारचे आम्हीसुध्दां मानवी प्राणीच आहोंत आणि त्यांना जशी स्वतंत्र होण्याची तळमळ असते तशीच आम्हालाहि असते."

स्त्रिया आणि त्यांच्या भावना यांची मला बरीच ओळख आहे. दक्षिण आफ्रिकेंत असतांना अशी एक वेळ आली होती कीं, तेव्हां अनेक स्त्रियांमध्येंच माझें वास्तव्य होतें. कारण त्यांचे नवरे तुरुंगांत गेले होते. त्या स्त्रिया साठएक होत्या आणि त्या सर्व मुलींचा आणि बायकांचा मी बाप बनलों होतों, भाऊ बनलों होतों. मी खात्रीपूर्वक तुम्हांला सांगूं शकतों कीं माझ्या पांखरेखालीं त्यांचें शरीरबळ आणि आत्मबळ दोन्हीं वाढलीं. इतकीं कीं त्या आपण होऊन शेवटीं तुरुंगाकडे धांवल्या.

आमचें वाङ्मय स्त्रियांविषयींच्या फाजील पूजक वृत्तीनेंहि भरलेलें असतें असें मला सांगण्यांत आलें आहे. ही नारीपूजा सर्वथैव चुकीची आहे हें मीं सांगूं इच्छितों. तुमच्यापुढें मी साधी कसोटी ठेवतों. तुम्हीं स्त्रियांविषयीं लिहूं लागतां तेव्हां त्यांच्याकडे पाहण्याची तुमची कोणती दृष्टि असते ? माझी अशी सूचना आहे कीं, कागदाला लेखणी लागण्यापूर्वीं स्त्री ही आपली आई आहे अशी कल्पना करा कीं मग खालीं कोरड्या पडलेल्या पृथ्वीवर आकाशांतून जशी सुंदर पर्जन्यवृष्टि व्हावी तशी तुमच्या लेखणींतून पवित्रतम साहित्याची धारा वाहूं लागेल. स्त्री ही तुमची पत्नी होण्यापूर्वीं तुमची आई होती हें ध्यानीं आणा. स्त्रियांमध्यें अध्यात्मिक तृषा शांत करण्याचें दूरच राहिलें, पण कांहीं लेखक त्यांच्या विकारांनाच उत्तेजित करतात. इतके कीं बिचाऱ्या अज्ञानी बायकांना, कादंबरींत वर्णन केल्याप्रमाणें तंतोतंत आपला विचार कसा ठेवावा याचा विचारच

पडतो, आणि त्यांतच त्या आपला वेळ गमावितात. स्त्रियांच्या अवयवांचें अगदीं बारीक सारीक वर्णन हें साहित्याचें आवश्यक अंग असलें पाहिजे काय? उपनिषदांत, कुराणांत किंवा बायबलमध्यें तसें कांहीं तुम्हांला आढळलें आहे काय? आणि तरीसुद्धां बायबलावांचून इंग्रजी भाषा शून्यवत् होईल हें तुम्हांला माहीत आहे ना? तीन-चतुर्थांश बायबल आणि एक चतुर्थांश शेक्सपियर, असें इंग्रजी वाङ्मयाचें वर्णन आहे. कुराण नसतें तर अरबी भाषेची आठवणहि कुणाला राहिली नसती. आणि तुळशीदास नाहीं अशा हिंदीची कल्पना तरी करा! आजच्या वाङ्मयांत स्त्रियांविषयीं जें दिसून येतें तें त्यांत तुम्हांला दिसतें काय?

'हरिजन' २१-११-१९३६.

---

# अश्लील जाहिराती : १

आक्षेपार्ह पुस्तकाची जाहिरात असलेल्या एका सुप्रसिद्ध मासिकांतील कांहीं भाग एका भगिनीने कापून पाठविला आहे. ती लिहिते:—

" ... मासिकाची पाने चाळत असताना सोबत पाठविलेला भाग माझ्या पाहाण्यात आला. आपल्याकडे हे मासिक येते की नाही मला माहीत नाहीं. आपल्याकडे ते पाठविले तरी ते चाळण्याइतकीसुद्धा फुरसत आपल्याला कधी मिळत असेल असे मला वाटत नाहीं. पूर्वी एकदा मी आपल्याला 'अश्लील जाहिराती' संबंधी बोलले होते. केव्हातरी आपण त्यासंबंधी लिहावे अशी मला किती इच्छा आहे म्हणून सांगू! वरीलप्रमाणे जाहिरात केल्या गेलेल्या पुस्तकासारख्या पुस्तकांनी आज बाजार भरून टाकला आहे हे नितांत सत्य आहे, पण म्हणून काय ... सारख्या मासिकांनी त्यांच्या विक्रीला उत्तेजन द्यावे? अशा गोष्टींनी माझ्या स्त्री—शालीनतेला इतका भयंकर धक्का बसत आहे की आपल्यावाचून दुसऱ्या कोणालाहि मी यासंबंधी लिहू शकत नाहीं. ईश्वराने स्त्रीला हेतुपूर्वक एका स्पष्ट कार्यासाठी जे दिले आहे त्याची विपरीत उपयोगासाठी जाहिरात व्हावी हे किती नीचपणाचें आहे ते शब्दांनी सांगतां येत नाहीं. ... ... या बाबतीत प्रमुख वृत्तपत्रांची व नियतकालिकांची जबाबदारी काय आहे ते आपण लिहावे अशी माझी इच्छा आहे. आपल्या टीकेकरिता एवढेच एक कात्रण मला पाठवितां आले असते असें मात्र मुळीच नाही अशी अनेक कात्रणे मला पाठविता येतील."

वर उल्लेखिलेल्या जाहिरातींतून मी कोणताही भाग उद्धृत करूं इच्छित नाहीं. वाचकांना फक्त एवढेंच सांगतों कीं, ज्या पुस्तकांची

जाहिरात केली आहे त्यांतील सूचक मजकूर शक्य तितक्या अश्लील-पणें त्यांत वर्णन केलेला आहे. जाहिरातीचा मथळा आहे 'स्त्री–शरीराचें लैंगिक सौंदर्य' आणि जाहिरात देणारी फर्म वाचकाला सांगते कीं, हें पुस्तक विकत घेणाराला 'वधूला नवज्ञान' आणि 'कामप्रेरित आलिंगन किंवा आपल्या जोडीदाराला कसें खूष कराल' या नांवाचीं दोन पुस्तकें फुकट दिलीं जातील.

असल्या पुस्तकांची जाहिरात देणाऱ्यांना मी थांबवूं शकेन किंवा संपादकांना अथवा प्रकाशकांना नफा उकळण्याच्या कामापासून परावृत्त करूं शकेन असें जर या भगिनीला वाटत असेल तर ती चुकीची समजूत आहे. आक्षेपार्ह पुस्तकें किंवा त्यांच्या जाहिराती प्रसिद्ध करूं नका म्हणून मीं कितीहि विनवणी केली तरी तिचा कांहीं उपयोग होणार नाहीं. पण मला पत्र लिहिणाऱ्या भगिनीला आणि तिच्यासारख्या इतर स्त्रियाना मात्र मी सांगूं इच्छितों की त्यांनी बाहेरच्या क्षेत्रांत मोकळेपणीं पाऊल टाकावें आणि हें काम हातीं घ्यावें. हें सर्वस्वीं त्यांचेंच काम आहे. पुष्कळ वेळा असें होतें की एखाद्याला 'तूं असाच आहेस किंवा अशीच आहेस' म्हणून लोक नांवें ठेवतात आणि मग कांही काळानंतर त्या माण-साला आपण तसेंच आहों असें वाटावयास लागतें. स्त्रीला 'अबला' म्हणणें म्हणजे तिची बदनामी करणें आहे. स्त्री अबला कशी, मला कळत नाहीं. त्याचा अर्थ तिच्यांत पुरुषांचें किंवा पुरुषाइतकें पाशवी बळ नाहीं असा असेल तर तो आरोप मात्र कबूल करायला हरकत नाहीं. पण मग स्त्रीजाति पुरुषांपेक्षां अधिक थोर ठरते, आणि ती तशी आहेहि. ठोसा लगावण्यांत ती जरी दुबळी असली तरी सहनशीलतेंत ती बलवती आहे. त्यागाची आणि अहिंसेची मूर्ति म्हणून मी स्त्रीचें वर्णन करतों. आपलें शील किंवा आपली अब्रू

बचावण्याकरितां आपण पुरुषावर अवलंबून राहूं नये हें तिनें शिकलें पाहिजे स्त्रीच्या शीलाचें पुरुषानें कधींकाळीं रक्षण केल्याचें एकहि उदाहरण मला ठाऊक नाहीं. सीतेचें शील कांहीं रामानें किंवा द्रौपदीचें पांडवांनीं राखलें नाहीं. केवळ आपल्या पावित्र्याच्या जोरावर त्या दोघींनींहि आपल्या शीलाचें रक्षण केलें. कोणाच्याहि अब्रूला किंवा स्वाभिमानाला त्या माणसाच्या संमतीवांचून कोणीहि धक्का लावूं शकत नाहीं. एखाद्या दुष्ट स्त्रीनें एखाद्या पुरुषाला मादक औषध देऊन आपल्या इच्छेप्रमाणें वागायला लावण्यात त्या पुरुषाची अब्रू किंवा शील जसें नाहींसें होत नाहीं त्याचप्रमाणें एखाद्या नरपशूनें एखाद्या स्त्रीला बेशुद्ध पाडून तिच्यावर बलात्कार केला तरी तिची अब्रू किंवा शील मुळींच नाहींसें होत नाहीं.

पुरुषाच्या सौंदर्याचीं स्तुतिस्तोत्रें गाणारीं पुस्तकें लिहिलेलीं नाहींत हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. पण पुरुषाचे पाशवी विकार जागृत करण्याजोगें साहित्य मात्र नेहमी निघावें हें कां ? पुरुषानें स्त्रीला ज्या पदव्या बहाल केल्या आहेत त्याबरहुकूम राहणें स्त्रीला आवडतें असें तर नसेल ? आपल्या शरीरसौंदर्याचा पुरुषानें स्वतःसाठी वाटेल तसा उपयोग करून घ्यावा हें स्त्रीला आवडत असेल काय ? पुरुषापुढें आपलें शरीर सुंदर दिसावें अशी तिची आवड असते काय ? आणि ती कां ? शिक्षित स्त्रियांनीं स्वतःला हे प्रश्न विचारावेत. या जाहिरातीमुळें आणि साहित्यामुळें जर त्यांचीं अंतःकरणें दुखावत असतील तर त्यांनीं त्या बाबतींत कठोरपणें झगडा सुरू केला पाहिजे, म्हणजे ताबडतोब हे प्रकार थांबतील. आपल्यांत वाईट करण्याची जशी सुप्त शक्ति आहे तशीच चांगलें करण्याचीहि आहे हें स्त्रीनें ओळखावें. स्वतःला किंवा आपल्या जोडीदाराला—मग तो आपला बाप असो, मुलगा असो वा पति असो—जगांत अधिक चांगल्या

रीतीनें जगतां यावें अशी परिस्थिति निर्माण करण्याची तिच्यांत ताकद आहे. मात्र तिनें स्वतःला अबला समजून आपण फक्त पुरुषाच्या क्रीडेचें साधन आहोत असें मानण्याचें सोडून दिलें पाहिजे. राष्ट्रांराष्ट्रांमधील अविचारी युद्धांनीं किंवा त्याहूनहि अविचारी अशा समाजाच्या नीतिविषयक भूमिकेबद्दलच्या लढायांनीं जर समाजाला नष्ट करायचें नसेल तर स्त्रीनें आपली कामगिरी बजाविली पाहिजे; पण कांहीं स्त्रिया जशा मर्दानी पद्धतीनें ती कामगिरी बजाविण्याचा प्रयत्न करीत आहेत तशा प्रकारें मात्र नव्हे तर स्त्रीच्या मार्दवाला अनुसरून. जीवनाचा बहुंशीं विनाहेतु नाश करण्याच्या पुरुषाच्या शक्तीशीं स्पर्धा करून कांहीं ती मानव जातीला अधिक सुखी करणार नाही. प्रमादी पुरुषाला त्याच्या चुकीपासून परावृत्त करणें हा स्त्रीचाच अधिकार आहे. तो तिनें गाजवावा. या चुकीमुळे ओढवणाऱ्या त्याच्या विनाशांत तिचाहि विनाश आहे. ही गलिच्छ जाहिरात फक्त वारा कोणत्या दिशेने वाहात आहे तें दाखविणाऱ्या काडीसारखी आहे. हा निर्लज्जपणें स्त्रीचा फायदा घेणें आहे.

'हरिजन' १४–११–१९३६.

## पडदा फाडून टाका १०

जेव्हां जेव्हां मी बंगालमध्यें, बिहारमध्यें किंवा संयुक्त प्रांतांत गेलों तेव्हां तेव्हां तेथें पडद्याची चाल इतर प्रांतांपेक्षां जास्त कडक रीतीनें पाळली जात असलेली मला दिसून आली. पण दरभंगा येथें, बरीच रात्र झाली असतांना, गोंगाट-गोंधळ करणारा अनावर जनसमुदाय नसलेल्या शांत वातावरणांत जेव्हां एका सभेंत मी बोललों, तेव्हां माझ्या पुढच्यांत पुरुष बसलेले मला दिसले, पण माझ्या पाठीमागें पडद्याआड स्त्रिया होत्या. त्या तेथें आहेत हें जेव्हां मला दुसऱ्यांनीं सांगितलें तेव्हां कळलें. एका अनाथालयाची कोनशिला बसविण्याचा हा समारंभ होता, पण मला पडद्याआड असलेल्या स्त्रियांना उद्देशून बोलण्याकरितां निमंत्रण होतें. पडद्याआड किती माणसें होतीं कुणास ठाऊक. ज्या पडद्याआड हा माझा श्रोतृसमाज बसला होता त्या पडद्याकडे पाहून मला खेद वाटला. त्याच्या योगानें मला तीव्र वेदना झाल्या. भयंकर अपमान वाटला. पडदा पहिल्या प्रथम जेव्हां अस्तित्वांत आला त्या काळीं त्याचा उपयोग काय असेल तो असो, पण आज तो सर्वस्वीं निरुपयोगी झाला आहे. त्याच्या योगानें देशाचें भयंकर नुकसान होत आहे. या रानटी चालीला चिकटून राहून पुरुष हिंदुस्थानच्या स्त्रियांवर जो अन्याय करीत आहेत त्याचा विचार माझ्या डोक्यांत घोळूं लागला. गेलीं शंभर वर्षें आम्हांला जें शिक्षण मिळत आहे त्याचा आमच्यावर कांहीं प्रभाव झालेला दिसत नाहीं. कारण मीं पाहिलें कीं सुशिक्षितांच्या घरांत-

सुद्धां पडदा राहिलेला आहे. याचें कारण शिक्षित पुरुषांचा त्या चालीवर विश्वास आहे असें नाहीं तर या जंगली चालीचा प्रतिकार करून एका फटकाऱ्यासरशी ती काढून टाकण्याचें धैर्य त्यांच्यांत नाहीं. हजारों स्त्रियांच्या शेंकडों सभांत मला बोलायला मिळालें आहे. या सभांना आलेल्या स्त्रियांपुढें परिणामकारक रीतीनें कांहीं बोलणेंहि तेथील गोंगाटामुळें आणि कलकलाटामुळें अशक्य होतें. पण जोंवर स्त्रियांना घरकुलांत आणि पिंजऱ्यांत घातल्यामुळें कोंडून ठेवलें आहे तोंवर याहून काय चांगलें निष्पन्न होणार आहे ? त्यामुळें एका मोठ्या खोलींत आपण पुष्कळजणी जमलों आहोंत एवढेंच त्यांना दिसतें आणि कोणाचें तरी भाषण ऐकावयाचें आहे असें एकदम त्यांना सांगितलें जातें, तेव्हां आपण काय करावें किंवा वक्त्याकडे कसें लक्ष द्यावें हें त्यांना समजतच नाहीं. आणि एकदाची शांति प्रस्थापित झाली तरी पुष्कळ नित्याच्या विषयांवर त्यांचें लक्ष वेधून घेणें कठीण होतें. कारण त्यांना त्या विषयांची कांहीं ओळखच असत नाहीं. त्यांना स्वातंत्र्याची शुद्ध हवा कधीं घेऊंच दिलेली असत नाहीं. हें थोडें अतिशयोक्तिपूर्ण चित्र आहे हें मी जाणतों. ज्यांच्यापुढें बोलण्याची संधी मला मिळते त्या हजारों भगिनींच्या उच्च संस्कृतीची मला जाणीव आहे. पुरुष जितके उंच जाऊं शकतात तितकें उंच चढण्याची त्यांचीहि शक्ति आहे हेंहि मला माहीत आहे, आणि त्यांना बाहेर पडण्याचे प्रसंग मिळतात हेंहि मी जाणतों, पण सुशिक्षित वर्गाची प्रतिष्ठा वाढण्याजोगी कांहीं ही गोष्ट म्हणतां येणार नाहीं. प्रश्न असा आहे कीं याच्यापुढें ते कां गेले नाहींत? पुरुषांना जितकी स्वतंत्रता आहे तितकी आपल्या स्त्रियांना कां मिळूं नये? बाहेर फिरायला जाणें आणि उघडी स्वच्छ हवा घेणें त्यांना कां शक्य असूं नये ?

पातिव्रत्य ही कृत्रिम रीतीनें वाढण्याजोगी वस्तु नाहीं. तें वरून

लादतां येत नाहीं. तें कांहीं पडद्याची भिंत सभोंवार उभी करून रक्षण करण्याजोगें नाहीं, तें आंतूनच वाढलें पाहिजे आणि आकस्मिकपणें येणाऱ्या मोहाला पुरून उरण्याची शक्ति त्याच्यांत असेल तरच त्याला कांहीं किंमत आहे. सीतेच्या पातिव्रत्याप्रमाणें तें न वांकणारें असलें पाहिजे. पुरुषांची नजर ज्या पातिव्रत्याला सहन होत नाहीं तें अगदींच दुबळें असलें पाहिजे. स्त्रियांना ज्याप्रमाणें पुरुषांवर विश्वास टाकणें भाग पडतें त्याचप्रमाणें पुरुषांना जर खरे पुरुष व्हायचें असेल तर त्यांना आपल्या बायकांवर विश्वास टाकतां आला पाहिजे. अर्धें अंग पूर्णपणें किंवा कांहीं अंशीं निकामी झालेलें आहे असें आपण राहूं नये. राम स्वतः जसा मोकळा आणि स्वतंत्र होता तशीच सीता नसती तर रामाचें अस्तित्वच राहिलें नसतें. पण जोरकस स्वतंत्र वृत्तींच्या बाबतींत द्रौपदीचें उदाहरण कदाचित् अधिक योग्य आहे. सीता म्हणजे मूर्तिमान् सौजन्य—नाजूक फूल होती. द्रौपदी प्रचंड सडेसोट ओक वृक्षाप्रमाणें होती. एवढा मोठा शक्तिशाली भीम, पण ती त्याला आपल्या करड्या इच्छाशक्तीपुढें वांकवीत असे. भीम हा प्रत्येकाला भयानक वाटायचा, पण द्रौपदीपुढ तो गरीब गाईसारखा होई. पांच पांडवांपैकीं एकाकडून सुद्धां तिला रक्षणाची अपेक्षा नसे. हिंदुस्थानच्या स्त्रीत्वाची निरंकुश वाढ होण्याच्या बाबतींत अडथळा आणण्याचा प्रयत्न करून आपण मोकळ्या व स्वतंत्र वृत्तीच्या पुरुषांच्या वाढींत अडथळा आणीत आहों. आपण आपल्या स्त्रियांच्या आणि 'अस्पृश्यां' च्या बाबतींत जें कांहीं करीत आहों तें हजारों पटीनें आपल्याच डोक्यावर येऊन आपटत आहे. त्याचें कारण अंशतः आमची स्वतःचीच दुर्बलता, अनिश्चितपणा, संकुचितता आणि असहाय्यता हें आहे. म्हणून एक प्रचंड प्रयत्न करून आपण पडदा फाडून टाकून फेंकून देऊं या.

---

## विद्यार्थिनींना : ११

.... शाळा–कॉलेजांतून बाहेर पडल्या कीं पुष्कळशा मुली सार्वजनिक कार्यांतून गडप होतात. प्रत्येक तरुण मुलगी, प्रत्येक हिंदी तरुणी लग्न करून संसार थाटण्याकरितांच कांहीं जन्मास आलेली नाहीं. एका पुरुषाचीच सेवा करीत राहाण्याचें न पत्करतां लोकसेवेला ज्यांनीं आपल्याला वाहून घेतलें आहे अशा पुष्कळ मुली आज मी दाखवूं शकेन. हिंदु मुलींनीं याच्या पूर्वींच सती पार्वती किंवा सीता यांचा कित्ता गिरवायला किंबहुना त्यांच्याहून अधिक उज्ज्वल व्हायला पाहिजे होतें.

पार्वतीनें काय केलें तुम्हांला माहीत आहे ? नवरा मिळाविण्यासाठीं तिनें पैसा खर्च केला नाहीं किंवा स्वतःला विकूंहि दिलें नाहीं. त्यामुळें तिला सप्तसतींपैकीं एक सती मानून हिंदु लोक आज तिची पूजा करीत आहेत. ती कां ? एखाद्या शिक्षण–संस्थेंत तिनें डिग्रीच्या परीक्षा दिल्या म्हणून नव्हे, तर तिच्या तपस्येमुळें !

इकडे हुंड्याची तिरस्करणीय चाल असल्याचें मला कळलें. त्यामुळें तरुण स्त्रियांना योग्य जोडीदार मिळणें अतिशय कठीण होत आहे. तुमच्यापैकीं कांहीं मुली प्रौढ आहेत; त्यांनीं अशा प्रकारच्या चालींना धुडकावून लावावें. या दुष्ट चालीरीतीचा जर तुम्हीं प्रतिकार करावयाचें ठरविलें तर तुमच्यापैकीं कांहींनीं आजन्म किंवा आणखी कांहीं वर्षें कुमारिका राहाण्याचें ठरवून या कामाला हात घातला

पाहिजे. मग जेव्हां तुमची लग्नाची वेळ येईल, आणि आयुष्यांत आपल्याला जोडीदार पाहिजे असें तुम्हांला वाटूं लागेल त्या वेळीं धन, कीर्ति किंवा रूप असणाऱ्या पुरुषाच्या मागें लागून व्याकुळ न होतां उत्कृष्ट शील घडविणारे अद्वितीय गुण ज्याच्यांत आहेत असा पुरुष शोधावा. सती पार्वतीनेंसुद्धां तसेंच केलें. नारदांनीं पार्वतीपुढें शिवाचें वर्णन करून काय सांगितलें तुम्हांला माहीत आहे ? 'तो अत्यंत दरिद्री आहे, अंगाला त्यानें राख फासली आहे, सौंदर्याचा अंशहि त्याच्यांत नाहीं, आणि तो ब्रह्मचारी आहे' इ. तेव्हां पार्वती म्हणाली, 'होय, तोच पति मला हवा.' तुम्ही पार्वतीप्रमाणें कांहीं-तरी तपश्चर्या करण्याला तयार झाला नाहींत तर असे अनेक शिव निर्माण होण्याचीहि आशा नाहीं. पार्वतीनें हजारों वर्षें तपश्चर्या केली. आपण दुर्बळ मानवप्राणी तितकी जरी करूं शकलों नाहीं, तरी आयुष्यभर तरी निदान आपल्याला ती करतां येईल.

या अटी तुम्हीं मान्य केल्यात तर बाहुली बनून आपलें व्यक्तित्व तुम्ही गमावूं देणार नाहीं आणि पार्वती, दमयंती, सीता आणि सावित्री यांच्याप्रमाणें सती होण्याचें ध्येय आपल्यापुढें ठेवाल.

ईश्वर अशी आकांक्षा तुमच्यांत प्रज्वलित करो, आणि तशी प्रेरणा तुम्हांला झाली तर ती सफल करण्याला तुम्हांला मदत करो.



# विवाहित अवस्था : १२

देशाची सेवा अधिक चांगल्या रीतीनें करतां यावी म्हणून ब्रह्मचारीच राहाण्याची एका चांगल्या कार्यकर्त्या बाईची इच्छा होती. पण आपल्याला हवा तसा जोडीदार मिळतांच त्यांनीं नुकतेंच लग्न केलें. पण असें करण्यांत आपण कांहींतरी चूक केली, आपल्या उच्च ध्येयापासून आपण चळलों असें त्यांना वाटत आहे. हा भ्रम त्यांच्या मनांतून नाहींसा व्हावा असा मीं प्रयत्न केला. सेवाव्रत घेऊन मुलींनीं अविवाहित राहावें हें उत्तम यांत शंका नाहीं. पण लाखांत एखादीलाच तें शक्य होतें, अशी वस्तुस्थिति आहे. विवाह ही एक जीवनांतील स्वाभाविक अवस्था आहे. त्यात कोणत्याहि प्रकारें कमीपणा मानणें चुकीचें आहे. अमक्या गोष्टीनें अधःपतन झालें असें एकदां आपल्या मनानें घेतलें कीं कितीहि प्रयत्न केला तरी उन्नति होणें कठिण जातें. विवाह हा एक पवित्र संस्कार आहे; आणि म्हणून वैवाहिक अवस्थेंत संयमी राहिलें पाहिजे हा आदर्श आहे. हिंदुधर्मांत विवाह हा चार आश्रमांपैकीं एक आश्रम आहे. वास्तविक बाकीचे तिन्ही आश्रम त्याच्यावरच आधारलेले आहेत. पण आजच्या काळांत दुर्दैवानें विवाह म्हणजे निव्वळ शरीरसंबंध अशीच भावना झाली आहे. बाकीचे तीन आश्रम लोपून गेले आहेत.

म्हणून विवाहाकडे तुच्छतेनें न पहातां त्याचें योग्य स्थान त्याला द्यावें व तो संस्कार आहे तर संस्काराचेंच स्वरूप त्याला द्यावें हें

या बाईचें व त्यांच्याच विचारांच्या इतर भगिनींचें कर्तव्य आहे. आवश्यक संयम जर त्या पाळतील तर आपल्यामध्यें सेवेचें बळ उत्तरोत्तर वाढत आहे असें त्यांना आढळून येईल. सेवेची इच्छा असणारी स्त्री स्वाभाविकपणें आपल्याच वृत्तीचा जोडीदार निवडील. त्या दोघांनीं मिळून केलेल्या सेवेनें देशाला लाभच होईल.

सर्वसाधारणपणें आमच्या मुलींना मातृत्वाचीं कर्तव्यें शिकविलीं जात नाहींत ही शोचनीय गोष्ट आहे. पण वैवाहिक जीवन हें जर एक धार्मिक कर्तव्य आहे तर मातृत्वहि तसेंच असलें पाहिजे. आदर्श माता बनणें सोपें नाही. मुलांना जन्म देणें हें काम जबाबदारीची संपूर्ण जाणीव ठेवूनच अगोदर अंगावर घेतलें पाहिजे. गर्भधारणा झाल्या क्षणापासून मूल जन्माला येईपर्यंत आपलें कर्तव्य कोणतें हें मातेला समजलें पाहिजे. आणि जी स्त्री बुद्धिमान, निरोगी, चांगल्या प्रकारें वाढविलेली मुलें राष्ट्राला देते ती निःसंशय सेवाच करते. हीं मुलें जेव्हां मोठीं होतील तेव्हां तीहि सेवेला सज्ज रहातील. खरी गोष्ट अशी आहे कीं ज्या स्त्रियांचें हृदय सेवेच्या जिवंत भावनेनें भरलेलें आहे त्यांचें जीवनांत कोणतेंहि स्थान असो त्या सेवाच करीत राहातील. सेवेला बाध येईल असें जीवनांत त्या कधींच पत्करणार नाहींत.

—

# विवाहपद्धति नष्ट करा ! : १३

माझ्या ओळखीच्या एका पत्रलेखकानें एक मुद्दा उपस्थित केला आहे. तो फक्त तात्त्विक चर्चेकरितां म्हणूनच उपस्थित केला आहे असें मी धरून चालतों. कारण त्यानें जीं मतें मांडलीं आहेत तीं त्याचीं स्वतःचीं मतें नव्हत हे मला माहित आहे. तो विचारतोः—

आजचे नीतिनियम अनैसर्गिक नाहीत का? ते जर नैसर्गिक असते तर सर्व काळी सर्व स्थळीं त्याचे स्वरूप सारखेच असते, पण प्रत्येक मानव-वंशाचे व त्यातील जातीचे स्वतःचे असे लग्नाच्या बाबतीत विशिष्ट नियम दिसून येतात आणि ते आचरण्याच्या बाबतींत माणसे पशूहूनहि हीन बनलेली आहेत. कारण जे रोग पशूमध्ये कधीहि आढळत नाहीत ते माणसांत सर्रास आढळतात. भ्रूणहत्या, गर्भपात, बालविवाह या गोष्टी पशु-योनीमध्ये घडणे असंभवनीय आहे. पण विवाहाला एक धर्मसंस्कार मानणाऱ्या समाजात मात्र हे कलंक अस्तित्वात आहेत. ज्याना आपण नीतिनियम म्हणून उचलून धरतो त्यापासून इतके दुष्परिणाम घडून येत आहेत की त्यांना कांही अतच नाही. आणि हिंदु विधवाची ती दैन्यावस्था! काय कारण आहे तिचे? आजचे विवाहाविषयींचे कायदेच नाहीत का तिच्या मुळाशी? निसर्गा-कडे परत फिरून माणसानी पशुसृष्टीतील पद्धति का स्वीकारू नये?—"

पश्चिमेकडील अनिर्बंध प्रेमसंबंधाचे पुरस्कर्ते वर थोडक्यांत मांड-लेल्या युक्तिवादाचाच आश्रय करतात कीं त्यांच्याजवळ आणखी कांहीं भरीव कारणें आहेत हें मला माहीत नाहीं. विवाहबंधनाला रानटीपणा समजण्याची प्रवृत्ति मात्र निखालस पाश्चात्य आहे. वरील

युक्तिवाददेखील तिकडचीच उसनवारी असेल तर त्याला उत्तर देणें मुळींच कठीण नाहीं.

मनुष्य आणि पशु यांची तुलना पहाणें चुकीचें आहे. या तुलनेमुळेंच सगळा युक्तिवाद रद्द ठरतो. कारण माणसाला उपजतच नैतिक प्रेरणा आहेत. त्याच्या नीतिविषयक संस्था आहेत. म्हणून तो पशूपेक्षां उच्च आहे. एकाच्या बाबतींत लागू होणारा निसर्गाचा नियम दुसऱ्याच्या बाबतींतील नियमांहून अगदीं भिन्न आहे. मनुष्याला बुद्धि आहे, सारासार विचार आहे आणि स्वेच्छाकर्तृत्व—मग तें कसें कां असेना—आहे. पशूंमध्यें हें कांहींच नाहीं. पशू कांहीं त्या बाबतींत निर्णय घेऊं शकत नाहींत. सद्गुण—दुर्गुण, बरें वाईट यांतील भेद त्याला कळत नाहीं. माणसाला स्वयंनिर्णय करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें हे भेद कळतात आणि जेव्हां तो आपल्या उच्च स्वभावधर्माप्रमाणें चालतो तेव्हां पशूहून तो किती तरी श्रेष्ठ असा दिसून येतो. पण आपल्या हीन स्वभावधर्माप्रमाणें जेव्हां तो चालतो तेव्हां पशूहूनहि तो नीच बनूं शकतो. पृथ्वीच्या पाठीवरील अत्यंत रानटी मानलेल्या जातींतसुद्धां स्त्री-पुरुषसंबंधाच्या बाबतींत कांहीं बंधनें त्यांनीं स्वतःवर घालून घेतलेलीं आहेत. बंधन असणें हेंच मुळीं रानटीपणाचें, असें म्हटलें म्हणजे मग सर्व निर्बंधांपासून मोकळीक, हाच धर्म समजला जाईल. या अनिर्बंध कायद्याप्रमाणें सर्व माणसें वागूं लागलीं तर औटघटकेंतच भयंकर घोटाळा माजेल. मनुष्यप्राणी स्वभावतःच पशूपेक्षां अधिक विकारवश होणारा असल्यामुळें निर्बंध नाहींसे होतांक्षणींच मोकाट सुटलेले उन्मादकारी विकार जगभर थैमान घालून मानवसमाजाचा नाश करून टाकतील. मनुष्यामध्यें संयमाची आणि त्यागाची शक्ति आहे, पशूंमध्यें ती नाहीं. म्हणूनच मनुष्य हा पशूंपेक्षां श्रेष्ठ आहे. आज कांहीं रोग सार्वत्रिक झाले आहेत, याचें कारण

विवाहविषयक नियमांचें उल्लंघन हेंच होय. वैवाहिक बंधनांत येणारा संयम कडकपणें पाळीत असतांनासुद्धां पत्रलेखकानें दर्शविलेला रोग झालेला एक तरी मनुष्य उदाहरणादाखल मला दाखवून द्यावा. भ्रूणहत्या, बालविवाह, आणि इतर असेच प्रकार विवाहविषयक नियम मोडल्यानेंच घडून येतात. कारण विवाहविषयक नियमांत घालून दिलें आहे कीं, पुरुष अथवा स्त्री वयांत आली, त्याची वा तिची प्रकृति निरोगी असली, संयमाची तिच्यांत ताकत असली आणि संततीची त्याला वा तिला इच्छा असली, तरच त्यानें आपली जोडीदारीण व तिनें आपला जोडीदार निवडावा. हा नियम जे कडकपणें पाळतात व विवाहबंधनाचे धर्मसंस्कार जे मानतात त्यांना दुःखीकष्टी होण्याचा कधीं प्रसंगच येत नाही. विवाहाला धार्मिक संस्कार म्हणून मानल्यानंतर जें मीलन होतें तें दोन शरीरांचें होत नाहीं. दोन आत्म्यांचें होतें आणि दोहोंपैकीं कोणीहि एक मृत झालें तरी तें मीलन सुटत नाहीं. जेथें असें आत्म्याचें खरेंखुरें मीलन होतें तेथें विधवेच्या अगर विधुराच्या पुनर्विवाहाचा विचारच करवत नाहीं. तो गैर आहे—चुकीचा आहे. विवाहाच्या खऱ्या नियमाला जेथें धाब्यावर बसविण्यांत येतें तेथें विवाह हे विवाहच नसतात. आजकाल आपल्यांत असे खरे विवाह फारच कमी होत असतील तर त्याचा दोष विवाहसंस्थेवर नसून आज तिचें जें स्वरूप आहे त्यावर आहे. तें स्वरूप सुधारलें पाहिजे.

पत्रलेखकाचें म्हणणें आहे कीं विवाह हें कांहीं नैतिक किंवा धार्मिक बंधन नव्हे. ती एक रूढि आहे. आणि तीहि अशी कीं, नीतीला व धर्माला विरोधी आहे. म्हणून ती नष्ट केली पाहिजे. मी नम्रपणें सांगूं इच्छितों कीं विवाह हें एक कुंपण आहे. तें धर्माचें रक्षण करतें. तें कुंपण मोडून टाकिलें कीं, धर्माच्या चिंधड्याच होतील.

संयम हा धर्माचा पाया आहे. आणि विवाह म्हणजे संयम नव्हे तर दुसरें काय? ज्या मनुष्याला संयम ठाऊक नाहीं त्याला आत्म-साक्षात्काराची आशा नाहीं. एखाद्या नास्तिकाला किंवा जडवाद्याला संयमाची आवश्यकता पटवून देणें कठिण असेल हें मी कबूल करतों. पण जें जें पार्थिव तें विनाशी आहे व जें चैतन्यमय तें अविनाशी आहे, हें ज्याला समजलें त्याला आपोआपच उमजतें कीं, यम-नियमावांचून आत्मसाक्षात्कार होणें अशक्य आहे. शरीर हें विकारांचें क्रीडांगण होईल किंवा आत्मसाक्षात्काराचें मंदिरहि होईल. जर मंदिर व्हावयाचें असेल तर स्वैराचाराला मुळींच थारा नाहीं. प्रत्येक क्षणीं आत्म्याचा शरीरावर ताबा असलाच पाहिजे.

विवाहबंध शिथिल असेल, संयमाचा कायदा जेथें पाळला जात नसेल, तेथें स्त्री ही कलहाचें मूळ होईल. जंगली पशूइतकीं माणसें जर बेफाट बनलीं तर तीं थेट विनाशाच्या पंथाला लागतील. माझी अशी पक्की खात्री आहे कीं जे जे दुराचार चालू आहेत अशी पत्र-लेखकाची तक्रार आहे ते सर्व विवाहपद्धति नाहींशी करून निपटून टाकतां येणार नाहींत. विवाहविषयक नियमाचें यथायोग्य ज्ञान करून घेऊन त्याचें पालन करण्यानेंच ते नाहींसे होतील.

कांहीं जातींमध्यें अगदीं जवळच्या नातलगाशीं लग्न करण्याची परवानगी आहे, तर दुसऱ्या जातींत त्याला मनाई आहे. कांहीं जातींत बहुपत्नीत्वाला मनाई आहे, तर कांहींत त्याला मनाई नाहीं हें मी कबूल करतों. सर्व जातींनीं एकाच स्वरूपाचा नीतिनियम ठरवावा हें जरी इष्ट असलें तरी या भिन्नतेमुळें सर्व संयमच काढून टाकणें कांहीं आव-श्यक ठरत नाहीं. अनुभवानें जसजसे आपण शहाणे होत जाऊं तस-तसा आपल्या नैतिक आचारांतसुद्धां एकसारखेपणा येत जाईल. आज-देखील जगाची धर्मबुद्धि एकपत्नीव्रतालाच अत्युच्च आदर्श म्हणून

उचलून धरते, आणि कोणताहि धर्म बहुपत्नीत्व आवश्यक असें ठरवीत नाहीं. देशकालानुसार आचारांत जरी ढिलेपणा आला तरी आदर्श अबाधितच राहतो.

विधवांच्या पुनर्विवाहासंबंधीं माझें मत मीं पुनः प्रदर्शित करण्याचें कांहीं कारण नाहीं. विधवा बालांचा विवाह इष्ट आहे; एवढेंच नव्हे तर ज्या पालकांच्या मुली विधवा असून लहान वयाच्या आहेत त्यांनीं त्यांचा पुनर्विवाह करून देणें हें कर्तव्यच ठरतें.

---

## लग्नाचा सौदा : १४

कांहीं महिन्यांपूर्वी 'स्टेट्स्मन' या इंग्रजी पत्रानें हिंदुस्थानभर अनेक जातींमध्यें हुंड्याची जी चाल आहे, त्याविषयींची चर्चा सुरू केली होती व त्यावर त्यांनीं लेखहि लिहिले होते. 'यंग इंडिया' मध्यें मी या दुष्ट चालीविषयीं पुष्कळ वेळां लिहीत असें. 'स्टेट्स्मन' मधील जीं कात्रणें माझ्याकडे आलीं आहेत त्यांवरून त्या वेळीं या-संबंधीं ज्या क्रूरपणाच्या गोष्टी समजल्या होत्या त्यांची आतां मला आठवण होत आहे. ही चाल निर्दयपणाची तर खरीच; पण मला माहीत आहे त्यावरून शेंकडों लोकांत कांहीं ती शिरलेली नाहीं, मध्यमवर्गापुरतीच ती मर्यादित आहे, आणि मध्यमवर्ग म्हणजे हिंदु-स्थानच्या लोकसमुद्रांतील बिंदुमात्र आहे. जेव्हां जेव्हां आपण दुष्ट चालीरीतीविषयीं बोलतों तेव्हां आपण नेहमीं मध्यमवर्गाविषयीं बोलत असतों. खेडोपाडीं राहणाऱ्या अनेक लोकांत त्याच्या त्यांच्या चालीरीती आणि दुःखें असतातच, पण त्यांचें आम्हांला फार थोडें ज्ञान असतें.

तथापि हुंड्याची चाल या देशांतील थोड्याच लोकांत आहे. म्हणून तिच्याकडे दुर्लक्ष करून भागेल असें मात्र नाहीं. ही चाल नाहींशी झाली पाहिजे. मुलांमुलींच्या आईबापांनीं पैशाची देवघेव करून ठरविण्याची लग्न ही वस्तु आहे ही समजूत बंद झाली पाहिजे. या पद्धतीचा जातीशीं निकट संबंध आहे. जोंवर वर-वधूंची

पसंती एका विशिष्ट जातींतील शेंदोनशें तरुण-तरुणींपुरतीच मर्यादित होते तोंवर या चालीविरुद्ध कितीहि ओरड केली तरी ती कायम राहाणारच. तरुण-तरुणींना किंवा त्यांच्या पालकांना जातिबंधनें तोडावींच लागलीं म्हणजे ही दुष्ट चाल नष्ट होईल. शिवाय, लग्नाची वयोमर्यादाहि वाढवावी लागेल. आणि जरूर तर, म्हणजे योग्य जोडीदार न मिळाला तर, मुलींना आजन्म कुमारिका राहाण्याचें धारिष्ट करावें लागेल. या सर्वांचा अर्थ हा कीं राष्ट्राच्या तरुण वर्गाच्या मनोवृत्तींत क्रांति होईल, अशा तऱ्हेचें शिक्षण त्यांना द्यावें लागेल. दुर्दैवानें आजच्या शिक्षणपद्धतीचा आमच्या भोंवतालच्या परिस्थितीशीं कांहींहि संबंध नसतो. त्यामुळें राष्ट्रांतील अल्पसंख्य मुलांमुलींना जें शिक्षण मिळतें त्याचा यत्किंचितहि परिणाम या भोंवतालच्या परिस्थितीवर होत नाहीं. म्हणून ही दुष्ट चाल नाहींशी करण्याकरितां जे कांहीं उपाय करावे लागतील ते केले पाहिजेत हें खरें; तरी माझें स्पष्ट मत आहे कीं, जेव्हां देशाच्या झपाट्यानें बदलत जाणाऱ्या परिस्थितीला अनुरूप अशा तऱ्हेचें शिक्षणाचें स्वरूप होईल, तेव्हांच या आणि इतर अशाच दुष्ट चालींशीं झुंजतां येईल. लग्नासारख्या जिव्हाळ्याच्या बाबतींत आपल्या भवितव्यावर परिणाम करणाऱ्या दुष्ट चालींचा प्रतिकार करण्याच्या कामीं कॉलेजांत शिकलेलीं मुलेंमुलीं नाखूष किंवा असमर्थ असलेलीं दिसावींत याला काय म्हणावें ? आपल्याशीं लग्न करण्याला कोणी उभा राहात नाहीं म्हणून शिकलेल्या मुली आत्महत्या करतांना कां दिसाव्यात ? आपल्या नीतिभावनेला प्रतिकूल आणि पूर्णपणें असमर्थनीय अशा चालीला न जुमानण्याचें धाडस करण्याला जर त्यांचें शिक्षण त्यांना समर्थ करीत नसलें तर त्या शिक्षणाची किंमत काय ? याचें उत्तर स्पष्ट आहे. ज्या शिक्षणपद्धतीनें सामाजिक किंवा इतर क्षेत्रांतील

दोषांशीं झगडण्याला मुलांमुलींना बळ येत नाहीं त्या पद्धतींत मुळां-तच कांहीं दोष असला पाहिजे. जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील प्रश्न योग्य रीतीनें सोडविण्याचें सामर्थ्य येण्याकरितां विद्यार्थ्यांत किंवा विद्यार्थिनींत असलेल्या ईश्वरदत्त बुद्धीला जें बाहेर आणतें तेंच शिक्षण. त्याच शिक्षणाला किंमत आहे.

---

# एक नैतिक पेंच— : १५

एक मित्र लिहितात—

" अडीच वर्षांपूर्वी या शहरांत एका सामाजिक घटना घडून आली आणि त्यामुळे शहरात खूप खळबळ माजली होती. एका वैश्य गृहस्थाला सोळा वर्षांची एक मुलगी होती. त्या मुलीचा मामा एकवीस वर्षांचा होता. आणि तो त्याच शहरांतील कॉलेजांत शिकत होता. त्या दोघांचे एकमेकाशी गुप्त प्रेमसबंध जडले. मुलगी गरोदर राहिली म्हणतात. खरी गोष्ट बाहेर आली तेव्हां प्रेमिकानी विष खाऊन आत्महत्या केली. मुलगी तावडतोब मेली. पण मुलगा इस्पितळांत दोन दिवसानतर मेला. या प्रसगानें शहरांत वादाचें वादळ उठले आणि साऱ्यांच्या जिव्हा सळसळू लागल्या. ही गोष्ट इतक्या थराला गेली की, मयत मुलीच्या आईबापांना गांवांत राहणें अशक्य झाले. कालांतराने हे वादळ शमत चालले. पण या प्रसगाची आठवण लोकांच्या मनांत अजून राहिली. आणि जेव्हां जेव्हां तसा एखादा विषय निघतो तेव्हां हा प्रसग ते उकरून काढतात. वादळ ज्या वेळी जोरांत होते आणि त्या दुर्दैवी मृत प्रेमिकांविषयी कोणी एक शब्दहि चांगला काढीत नव्हतें. त्या वेळी मी माझे मत स्पष्टपणे सांगितले होते की, झाल्या परिस्थितीत त्या तरुण मुलामुलीला आपल्या मार्गाने जाण्याची मोकळीक द्यायला हवी होती. हे ऐकतांच सर्वांना झटकाच बसला. पण माझें हें अरण्यरुदनच होते. यासबधी आपले मत काय आहे ? "

पत्रलेखकाचें नांव गांव त्याच्या सांगण्यावरून मी मुद्दामच जाहीर करीत नाहीं. कारण जुना वाद उकरून काढून, जुन्या जखमा त्याला ताज्या कराव्याशा वाटत नाहींत. तसें असलें तरी या नाजूक विषयावर सार्वजनिकरीत्या चर्चा होणें आवश्यक आहे असें मला वाटतें.

माझ्या मतें एका विशिष्ट समाजांत ज्या प्रकारच्या लग्नांना मनाई आहे तशीं लग्नें एकदम किंवा एकाद दुसऱ्या व्यक्तीच्या इच्छेनें मान्य केली जाणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें अशीं लग्नें करूं इच्छिणाऱ्या तरुण मंडळींच्या आचारस्वातंत्र्यावर आपल्या इच्छेचें दडपण आणून तें स्वातंत्र्य बळजबरीनें काढून घेण्याचा समाजाला किंवा त्या त्या व्यक्तींच्या आप्तांना कांहींहि अधिकार नाहीं. पत्रलेखकानें जें उदाहरण दिलें त्यावरून मुलगा आणि मुलगी दोघेंहि वयांत आलेलीं होतीं. त्यांनी खुशाल स्वतःचा विचार स्वतः केला असता. त्यांना जर एकमेकांशीं लग्न करावें असें वाटत होतें तर तें करण्याला बळजबरीनें प्रतिबंध करण्याचा कोणालाहि अधिकार नव्हता. समाजाला फार तर आम्ही या लग्नाला संमति देत नाही ' असें म्हणतां आलें असतें. पण त्यांच्यावर आत्महत्त्या करण्याची पाळी येणें ही जुलुमाची पराकाष्ठा झाली.

विवाहासंबंधाचे निषेध हे सर्वत्र सारखे नाहींत. ते बव्हंशीं सामाजिक रूढीवर अवलंबून असतात. ही रूढि प्रांताप्रांताला आणि जिल्ह्याजिल्ह्याला बदलते. याचा अर्थ तरुणांनीं सर्वच प्रस्थापित सामाजिक रूढी आणि निषेध पायाखालीं तुडवावेत असा नाहीं. तसें करण्याचें ठरविण्यापूर्वी त्यांनीं लोकमत आपल्या बाजूला वळवून घेतलें पाहिजे. दरम्यानच्या काळांत त्यांनीं धीरानें योग्य वेळेची वाट पाहिली पाहिजे, किंवा क्षुब्ध न होतां शांतपणें वाट पहाणें त्यांना शक्य नसलें तर सामाजिक बहिष्काराच्या परिणामांना त्यांनीं तोंड दिलें पाहिजे.

त्याचप्रमाणें प्रस्थापित रूढी न मानणाऱ्यांच्या बाबतींत निर्दयपणाची सावत्रवृत्ति न ठेवणें हें समाजाचेंहि कर्तव्य आहे. पत्रलेखकानें जें उदाहरण दिलें आहे त्यांतलि हकीकत जर बरोबर असेल तर त्या तरुण जोडप्याला शेवटीं आत्महत्या करावयास भाग पाडण्याचा गुन्हा निःसंशय समाजाच्याच माथ्यावर येऊन पडतो.

## गृहस्थाश्रमाच्या प्रवेशद्वारीं : १६

हुदली येथे गाधीसेवासघाच्या वार्षिक समेलनप्रसगी दोन लग्नविधी व दोन उपनयनविधी घडवून आणण्यात आले होते. लग्नविधि किंवा उपनयन-विधि हे प्रसग समारभाचे नसून दीक्षा घेण्याचे असतात. त्यामुळे या दोन्ही विधीमध्ये योग्य ते गाभीर्य आणि मर्यादा पाळण्यांत आल्या होत्या. विधींचे मत्र सस्कृतमध्ये होते तरी त्या प्रत्येकाचा अर्थ वधुवरांना समजावून सांगून त्याच्याकडून ते म्हणूनच घेतले जात होते. विधि आटोपल्यानतर गांधीजींनी खासगीरीत्या वधुवरांना जे चार शब्द सांगितले ते सर्वच दपतीना समजून घेण्याजोगे असल्यामुळे येथे दिले आहेत. गाधीजी त्याना म्हणाले:—

विधी जितक्या प्रमाणांत आपल्यांत कर्तव्याची भावना जागृत करतात तितक्या प्रमाणांतच माझा त्यांवर विश्वास आहे हें तुम्हांला माहीत असेलच. माझा मी विचार करूं लागल्यापासूनच माझ्या मनाची ही प्रवृत्ति आहे. तुम्ही म्हटलेले मंत्र आणि तुम्ही घेतलेल्या प्रतिज्ञा संस्कृतमध्यें होत्या, पण त्यांचा तुम्हांला अर्थ करून सांगितला होता. मूळचे संस्कृत मंत्रच आपण घेतले याचें कारण हें कीं, संस्कृत शब्दांमध्यें एक प्रकारची शक्ति आहे हें मला माहीत आहे आणि त्या शक्तीचा आपल्या मनावर प्रभाव झालेला कोणालाहि आवडेल.

त्या विधीमध्यें वरानें ज्या इच्छा व्यक्त केल्या आहेत त्यांपैकीं एक ही आहे कीं, वधूनें एका चांगल्या सशक्त मुलाची माता व्हावें. यामध्यें गैर असें कांहीं नाहीं. याचा अर्थ प्रजोत्पत्ति करणें आव-

श्यकच आहे असा होत नाहीं. संततीची इच्छा असेल तरच कड-कडीत धर्मभावनेनें विवाह करणें हें आवश्यक आहे, हा त्याचा अर्थ आहे. ज्याला संततीची इच्छा नाहीं त्याला विवाह करण्याची मुळींच गरज नाहीं. विषयवासनेच्या पूर्तीसाठीं केलेलें लग्न हें लग्नच नव्हे. तो व्यभिचार आहे. म्हणून आजच्या विधीचा अर्थ हा आहे कीं, पतिपत्नीना दोघानांहि जर स्पष्टपणें संततीची इच्छा असेल तरच संग करण्याची मुभा आहे. ही सर्व कल्पनाच पवित्र अशी आहे. म्हणून संग करावयाचा तो प्रार्थनापूर्वक केला पाहिजे. तो होण्या-पूर्वी कामवासना आणि सुख हीं वाढविण्याकरितां म्हणून योजलेल्या शृंगारचेष्टा वगैरे नेहमींचे प्रकार असणार नाहींत. जर दुसऱ्या मुलाची इच्छा नसेल तर असा संग आयुष्यांतून एकदांच व्हावा. जे शरीरानें आणि मनानें निरोगी नसतील त्यांना संग करण्याचें कांहीं एक कारण नाहीं आणि जर करतील तर तो व्यभिचार होईल. पाशवी क्षुधेच्या शमनार्थ लग्न करायचें असतें असा जर तुम्हाला पूर्वी पाठ मिळाला असेल तर तो तुम्ही विसरून गेलें पाहिजे. तो भाबडा धर्मभोळेपणा आहे. पवित्र अग्निदेवतेच्या समक्ष हा सर्व विधि होत असतो. तुमच्यामध्यें असणारी सर्व कामवासना तो जाळून भस्म करो.

हल्लीं सर्वत्र माजलेली दुसरी एक गैरसमजूत तुम्हीं तुमच्या मनां-तून काढून टाकली पाहिजे असें माझें सांगणें आहे. असें सांगतात कीं, संयम आणि ब्रह्मचर्य ही अयोग्य आहेत आणि कामवासनेची पूर्ति व लग्न न करतां संबंध ठेवणें या गोष्टी अगदीं स्वाभाविक आहेत. याच्याइतकी घातकी दुसरी कोणतीहि समजूत नाहीं. आदर्शाप्रत पोचणें तुम्हांला कदाचित शक्य होत नसेल, शरीर दुबळें असेल, पण म्हणून आपल्या आदर्शाला खालीं ओढूं नका, अधर्माला धर्म

मानूं नका. तुमचें मन दुबळें होईल त्या वेळीं मी जें सांगतों तें ध्यानीं आणा. या पवित्र आणि गंभीर प्रसंगाच्या आठवणीनें तुमचें मन शांत होईल, संयमी होईल. लग्नाचा उद्देशच मुळीं संयम करणें आणि कामवासनेला ऊर्ध्वगामी करणें हा आहे. यावांचून जर दुसरा कोणताहि हेतु असेल तर लग्नविधीचा संस्कार त्यासाठीं नाहीं; तो फक्त संतति–प्राप्तीकरितांच आहे.

लग्नविधीनें तुम्ही परस्परांचे बरोबरीच्या नात्याचे मित्र म्हणून बांधले गेलां आहां. पतीला जर ‘ स्वामी ’ म्हटलें असेल तर पत्नी ‘ स्वामिनी ’ आहे. एकमेव एकमेकांचे धनी आहेत, मदतनीस आहेत. जीवनांतील जबाबदाऱ्या आणि कर्तव्यकर्में पार पाडण्याकरितां एकमेकांनीं एकमेकाला सहकार्य द्यायचें आहे. तरुणांनों, मला तुम्हांला हें सांगावयाचें आहे कीं, तुम्हांला जर चांगल्या बुद्धीची आणि उमद्या भावनांची देणगी मिळाली असेल तर या तरुण मुलींना त्यांचा संसर्ग लागूं द्या. तुम्ही त्यांचे खरे शिक्षक आणि वाटाडे बना, त्यांना साह्य करा, वाट दाखवा. पण त्यांच्या प्रगतीच्या मार्गांत आडवे पडूं नका, किंवा त्यांना भलतें वळण लावूं नका. तुम्हां उभयतांमध्यें विचार, उच्चार आणि आचार यांची एकतानता होऊन जाऊं दे. परस्परांत तुम्ही एकमेकांपासून कांहींहि लपवून ठेवूं नये. तुमचीं हृदयें एक होऊन जावींत.

ढोंगी होऊं नका. आपल्याला अशक्य अशा गोष्टींच्या मागें व्यर्थ लागून आपल्या प्रकृतीचा नाश करून घेऊं नका. संयमानें कधींहि शक्ति नाहींशी होत नाहीं. शक्तीचा ऱ्हास होतो तो संयमानें होत नसून बाह्य आचारावर दडपण ठेवल्यानें होतो. खरा संयमी मनुष्य रोजच्यारोज अधिकाधिक बळ मिळवितो, अधिकाधिक शांति प्राप्त करून घेतो. आत्मसंयमनामधील अगदीं पहिली

पायरी म्हणजे विचारांचा संयम. तुम्ही आपल्या मर्यादा समजून ध्या. आणि जेवढें करूं शकाल तेवढेंच करा. मी तुमच्यापुढें आदर्श ठेवला आहे, काटकोन दाखविणारा गुण्याच तो आहे असें समजा. काटकोन जमविण्याचा शक्य तेवढा कसून प्रयत्न करा. पण जरी त्यांत तुम्हांला यश आलें नाहीं तरी खेद किंवा लज्जा वाटून घेण्याचें कांहींच कारण नाहीं. उपनयन हा जसा संस्कार आहे, दुसरा जन्म आहे, तसाच लग्न हा संस्कार आहे, नवा जन्म आहे. हें मी तुम्हांला फक्त विशद करून सांगितलें आहे. माझ्या सांगण्यानें घाबरून जाऊं नका किंवा दुर्बल बनूं नका. नेहमीं विचार, उच्चार आणि आचार यांच्यांत संपूर्ण संगति आणण्याचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवा. नेहमीं आपले विचार शुद्ध करण्याकडे लक्ष ठेवा कीं सर्व कांहीं चांगलें होईल. विचाराहून अधिक चांगलें प्रभावी दुसरें कांहीं नाहीं. विचारामागून उच्चार आणि उच्चारामागून आचार येत असतो. जग हें अशा प्रभावशाली विचारामधूनच निर्माण झालें आहे. आणि जेथें विचार सामर्थ्यसंपन्न आणि शुद्ध आहे तेथें परिणामहि सामर्थ्यपूर्ण आणि शुद्ध असणारच. इतःपर तुम्ही उदात्त अशा आदर्शाचें कवच घालून सज्ज व्हावें अशी माझी इच्छा आहे. तसें झालें तर कसलाहि मोह तुम्हांला इजा करणार नाहीं, कसलीहि अशुद्धता तुम्हांला स्पर्श करूं शकणार नाहीं, याची मी तुम्हांला खात्री देतों.

आज जे वेगवेगळे विधी तुम्हांला समजावून दिले ते लक्षांत ठेवा. साधासा वाटणारा ‘ मधुपर्क ’ हा विधि ध्या. सारें जग मधुनें भरलें आहे. इतकें कीं साऱ्या जगानें त्यांतील आपला वांटा उचलल्या-नंतरच तुम्ही आपला वांटा उचलावा. याचाच अर्थ त्यागानें तुम्ही उपभोग घ्यावा ( ‘ तेन त्यक्तेन भुञ्जीथाः ’ )

" पण जर संततीची इच्छा नसेल तर लग्न करूंच नये काय ? " एका वराने विचारलें.

" मुळींच करूं नये. केवळ मैत्री ठेवण्याच्या आदर्श भावनेनें होणाऱ्या लग्नावर माझा मुळींच विश्वास नाहीं. शरीरसंगाच्या हेतूनें नव्हे तर स्त्रियांचें रक्षण व्हावें या उद्देशानें पुरुषांनीं त्यांच्याशीं विवाह केल्याचीं कांहीं उदाहरणें आहेत. पण तीं अगदीं विरळाच. ' निर्मल वैवाहिक जीवन ' या विषयावरील माझें सर्व लिखाण तुम्ही वाचा. व्यासांनीं नियोग* केल्याचें त्यांत सांगितलें आहे. व्यासांचें रूप सुंदर म्हणून त्यांत वर्णिलेलें नाहीं, तें उलट होतें. त्यांचें रूप भयानक होतें, त्यांनीं प्रणयचेष्टा केल्या नाहींत, तर संग करण्यापूर्वीं त्यांनीं आपल्या सर्वांगाला तूप चोपडून घेतलें. त्यांनीं विषयवासनेनें संग केला नाहीं, संततीकरितां केला. मूल व्हावें ही इच्छा संपूर्णपणें स्वाभाविक आहे. एकदां ती इच्छा पूर्ण झाली कीं, मग संग होऊं नये.

पहिल्या मुलाचें मनूनें ' धर्मज ' म्हणजे धर्मभावनेनें निर्माण झालेलें, आणि नतरच्या मुलांचें ' कामज ' म्हणजे वासनेनें जन्माला आलेलीं असें वर्णन केलें आहे. एवढ्यानें थोडक्यांत स्त्रीपुरुषसंबंधाचा कायदा समजून येतो आणि ईश्वर म्हणजे कायदा नव्हे तर दुसरें काय ? ईश्वराची आज्ञा पाळणें म्हणजे कायदा पाळणें. ' धर्मे चार्थेच कामे च नातिचरामि ( धर्म, अर्थ आणि काम या बाबतींत मी मर्यादा ओलंडणार नाहीं. ) ही प्रतिज्ञा तुम्हांला तीन वेळां उच्चारायला सांगितली तें लक्षांत आहे ना ? ईश्वरी नियमाप्रमाणें चालण्याला तयार असणारे बोटांवर मोजण्याइतके जरी स्त्रीपुरुष आप-

* नियोग = केवळ वंशवृद्धि करणाऱ्या संततीकरितां परस्त्री किंवा परपुरुषसंग.

त्यामध्यें निघाले तरी खंद्या सत्यधर्मी स्त्रीपुरुषांची कुलपरंपरा आपल्यामध्यें खात्रीनें निर्माण होईल.

बा ( कस्तुरबा ) कडे कामवासनेनें पाहाण्याचें सोडून दिल्यापासूनच खरोखर मी वैवाहिक जीवनाचा आनंद लुटूं लागलों हें लक्षांत ठेवा. ऐन तारुण्यांत आणि शरीर सुदृढ असतांनाच, लौकिकदृष्ट्या ज्याला वैवाहिक जीवनाचा आनंद म्हणतात तो उपभोगण्याइतका तरुण असतांनाच मीं ब्रह्मचर्याचें व्रत घेतलें. माझ्या डोळ्यांपुढें एकदम प्रकाश पडला आणि मला दिसून आलें कीं, मी आणि आपण सर्वच जण एका पवित्र कार्याकरितां जन्माला आलों आहोंत. माझें लग्न झालें तेव्हां तें मला समजलें नव्हतें. पण जेव्हां मी शुद्धीवर आलों तेव्हां मला वाटलें कीं, ज्या कार्याकरितां माझा जन्म आहे त्या कार्याला लग्नानें पोषण मिळावें इकडे माझें लक्ष असलें पाहिजे. त्या वेळीं खरोखर मला ‘ धर्माची ’ ओळख पटली. तें व्रत घेतल्यानंतरच आमच्या जीवनांत खऱ्या आनंदाचा प्रवेश झाला. बा जरी अशक्त दिसत असली तरी तिचें शरीर सुदृढ आहे म्हणूनच ती सकाळपासून संध्याकाळपर्यंत एकसारखें काम करीत असते. माझ्या विषयवासनेचें जर ती स्थान बनली असती तर तिच्या हातून कधीं तसें काम झालें नसतें. तरी मी उशीरां, म्हणजे कांहीं वर्षें वैवाहिक जीवन काढल्यानंतर जागा झालों. वेळींच जागृत होण्याच्या दृष्टीनें तुम्ही भाग्यवान् आहांत. माझें लग्न झालें तेव्हां आजूबाजूची परिस्थिति अत्यंत अमंगल होती. तुम्हांला ती अत्यंत शुभ, मंगल अशी लाभलेली आहे. तरी माझ्यामध्यें एक गुण असा होता कीं, त्यामुळें मी बचावलों. तो म्हणजे सत्यप्रियता. त्यानें माझें रक्षण केलें, मला वांचविलें. सत्य हें माझ्या जीवनाचा मूळाधार

बनलें आहे. सत्यामधून मागाहून अहिंसा आणि ब्रह्मचर्य निर्माण झालें. म्हणून तुम्हीं कांहींहि केलेंत तरी स्वतःशीं आणि जगाशीं प्रामाणिक राहा. आपले विचार लपवूं नका. त्यांना व्यक्त स्वरूप देणें हें लज्जास्पद वाटत असेल तर त्यांना मनांत देणें हें अधिकच लज्जास्पद आहे.

---

## पतिपत्नी : १८

प्रश्नः—हिंदुधर्मामध्ये पत्नीची पतीवरील निष्ठा व पतीशी एकरूपता हे पत्नीचे परमोच्च ध्येय सांगितलें आहे, मग तो पति राक्षस असो किंवा मूर्तिमत प्रेम असो. पत्नीच्या बाबतीत हेच जर योग्य आचरण असेल तर पतीच्या विरोधाला न जुमानतांदेखील तिला राष्ट्रसेवा करतां येईल काय? का तिने आपला पति जेवढी मर्यादा घालून देईल तेवढयातच सतुष्ट रहावे?

उत्तरः—पत्नीचा माझा आदर्श म्हणजे सीता आणि पतीचा राम. पण सीता ही कांहीं रामाची दासी नव्हती, किंवा दोघेंहि एकमेकांचे दास होतीं असें म्हणा हवें तर. राम सीतेला नेहमीं मानीत असे.

जेथें खरें प्रेम आहे तेथें वरील प्रश्न उद्भवतच नाहीं. पण आज हिंदु कुटुंब म्हणजे एक कोंडेच होऊन बसलें आहे. लग्नाच्या वेळीं पति व पत्नी यांना एकमेकांविषयीं कांहींच माहिती नसते.

रूढीनें बळकट केलेलें लग्नावरील शिक्कामोर्तब आणि विवाहित दंपतीच्या आयुष्याचा संथ प्रवाह यांमुळें बऱ्याचशा हिंदु कुटुंबांत शांति नांदत असते. पण पतीचे अथवा पत्नीचे विचार सामान्य विचारांहून जरा वेगळे झाले कीं तेथें बेसूर स्वर उमटण्याचा धोका आलाच. नवऱ्याला कसली चाडच असत नाहीं. आपल्या जोडीदारिणीचा सल्ला आपण घेतला पाहिजे असें त्याला वाटत नाहीं. तो

तिला आपली मालमत्ता समजतो. आणि गरीब बिचारी बायको नवऱ्याचा हा हक्क बरोबर आहे असा विश्वास धरून पुष्कळ वेळां स्वतःच्या इच्छा दाबून टाकते. त्यांतून बाहेर पडण्याला मार्ग आहे असें मला वाटतें. मिराबाईनें तो दाखविला आहे. आपली बाजू बरोबर आहे हें जेव्हां स्त्रीला माहीत असतें आणि तिचा प्रतिकार जेव्हां उदात्त कारणाकरितां असतो तेव्हां आपल्या मार्गानें जाऊन जें होईल त्याला शौर्यानें तोंड देण्याचा तिला संपूर्ण हक्क असतो.

प्रश्नः—समजा, नवरा मासाहारी आहे. बायको तर मांसाहार हे पाप समजते. तर आपल्या इच्छेप्रमाणे तिला वागता येईल काय? नवऱ्याला मांसाहारापासून किंवा अशाच इतर गोष्टीपासून सर्व प्रेमळ उपायानी परावृत्त करण्याचा प्रयत्न तरी तिने करावा की नाही? की नवऱ्याला मांसाचा स्वयपाक करून घालण्याला,—नव्हे, त्याच्या इच्छेसाठी म्हणून तें खाण्यालासुद्धां, ती बांधलेली आहे? बायकोने आपल्या इच्छेप्रमाणे वागावें असे आपलें म्हणणे असेल तर एकाचा जुलूम व दुसऱ्याची बडखोरी अशा रीतीने एकत्र कुटुब कसे चालणार?

**उत्तरः**—पहिल्या प्रश्नाच्या उत्तरांत कांहीं अंशीं याहि प्रश्नाच उत्तर आलें आहे. नवऱ्याच्या पापकृत्यांत साथीदार होण्याला बायको बांधलेली नाहीं. आणि जेव्हां तिला एखादी गोष्ट चूक आहे असें वाटतें तेव्हां जें बरोबर असेल तें करण्याचें धारिष्ट तिनें केलें पाहिजे. पण नवऱ्याचें काम जसें कुटुंबाकरितां मिळवून आणणें हें आहे तसें बायकोचें काम घरची व्यवस्था पाहाणें व म्हणून स्वयंपाक करणें हें आहे. हें लक्षांत घेतां, पूर्वीं दोघेंहि मांसाहारी असतील तर, कुटुंबांतील माणसासाठीं मांसाचा स्वयंपाक करणें हें तिचें कर्तव्य ठरतें. उलट, शाकाहारी कुटुंबांत फक्त नवराच तेवढा मांसाहारी बनला व तो आपल्या बायकोवर मांसाचे पदार्थ बनविण्याची सक्ती करूं लागला तर आपल्या सद्भावनेला धक्का देईल असें कांहींहि तयार

करून देण्याला बायको मुळींच बांधलेली नाहीं. घरांत शांतता नांदावी ही गोष्ट इष्ट खरी. पण तेवढें एक साधलें कीं सर्व साधलें असें नाहीं. माझ्या मतें विवाहित अवस्था ही इतर कोणत्याहि अवस्थेप्रमाणेंच एक संयमानें बांधलेली अवस्था आहे. जीवन म्हणजे कर्तव्यपालन. ती सत्त्वपरीक्षा आहे. वैवाहिक जीवनाचा हेतु इहपरलोकीं परस्परांच्या कल्याणाची वृद्धि करणें हा आहे. मानवजातीची सेवा व्हावी हासुद्धां त्याचा उद्देश आहे. दोघांपैकीं एकानें जर नियमपालन केलें नाहीं तर हा बंध तोडण्याचा दुसऱ्याला आपोआप हक्क प्राप्त होतो. येथें 'बंध तोडावयाचा' म्हटलें तो नैतिक, शारीरिक नव्हे. काडीमोड करण्याचा येथें प्रश्नच येत नाहीं. नवरा आणि बायको हीं वेगळीं होतात तीं ज्या हेतूनें ती एकत्र झालीं होतीं, तोच हेतु सफल करण्यासाठीं. हिंदुधर्म दोघांनाहि समसमान मानतो. याहून भिन्न प्रकारची प्रथा, केव्हांपासून कोणास ठाऊक, पडत आली आहे खरी. पण तशीं तर कितीतरी अनिष्टें हिंदुधर्मांत शिरलीं आहेत. तथापि, एवढें मात्र मी निश्चित जाणतों कीं, हिंदुधर्मांत व्यक्तीला आत्मसाक्षात्काराकरितां वाटेल तें करण्याची संपूर्ण मोकळीक दिली आहे. कारण केवळ त्याकरितांच प्रत्येक व्यक्ति जन्माला आलेली आहे.

---

# हिंदु पत्नी : १८

एका भावानें आपल्या लग्न झालेल्या बहिणीच्या दुर्दशेचें वर्णन करणारें पत्र लिहिलें आहे त्याचा सारांश:—

एका अज्ञातशीलाच्या माणसाशी काही दिवसांपूर्वी माझ्या बहिणीचे लग्न झाले. हा मनुष्य बाहेरख्याली आहे असे आता कळून आले आहे. किती जरी दुराचार आणि बदफैलीपणा केला तरी तरी त्याला वीट येत नाहीं. त्याला अब्रूची चाड नाही. लग्न झाल्यानंतर थोड्याच दिवसात माझ्या दुर्दैवी बहिणीला आपले हे पतिदेव रोज अधिकाधिकच भ्रष्ट होत चालले आहेत. हे कळून आले. तिने त्याची कानउघाडणी केली. त्या गृहस्थाला ते सहन झाले नाही आणि तिला 'धडा देण्यासाठी' म्हणून अगदी तिच्या समोर तो दुराचार करू लागला. त्याने तिला चाबकाने मारावे, उभे करावे, उपाशी ठेवावे, आणखीहि काही करावे. आपले व्यभिचार तिला बघायला लावण्याकरिता त्यानें तिला खांबाला बांधून ठेवले. माझ्या बहिणीचे हृदय भग्न झाले आहे. तिच्या शोकानी आमचे काळीज फाटून जाते. पण आम्ही काय करणार ? अशा परिस्थितीत तिने व आम्ही काय करावे असा आपला सल्ला आहे ? स्त्री ही सर्वस्वी पुरुषाच्या स्वाधीन ठेविली जावी, तिला काहीच हक्क आणि अधिकार असू नयेत हे हिंदुधर्माचे अत्यंत अश्लील स्वरूप आहे. नवऱ्याला क्रूर, निष्ठुर व्हावेसे वाटले कीं मग त्याच्या दुर्दैवी स्त्रीला कांहीच तरुणोपाय राहात नाही. पुरुषानें वाटेल तशी बाहेरख्याली करावी, त्याच्या विरुद्ध ब्र काढण्याची कोणाची ताकद नाही. पण स्त्रीचें मात्र एकदां लग्न झालें की, ती सर्वस्वी नवऱ्याच्या ताब्यांत गेलीच. अशा हजारों स्त्रिया दुःखानें विव्हळत आहेत, रडत आहेत. जोपर्यंत हिंदुधर्मातील

ही व इतर अशीच पापे धुवून जाऊन तो शुद्ध होत नाहीं तोपर्यंत प्रगतीची आशा वृथाच नाही का ?

पत्रलेखक सुशिक्षित आहे. वर सारांश दिला आहे त्याहिपेक्षां अधिक परिणामकारकपणें त्यानें आपल्या बहिणीचें दुःख वर्णिलें आहे. आपलें सबंध नांव पत्ता त्यानें पाठविला आहे. हिंदुधर्माचा त्यानें केलेला धिःकार अत्यंत रागाच्या भरांत केलेला असल्यामुळें क्षम्य आहे. पण असल्या एकाददुसऱ्या उदाहरणावरून भावनावश होऊन त्यानें तसा सामान्य नियम काढला असल्यामुळें त्याला हिंदुधर्मा-विषयीं तिरस्कार वाटला तरी लाखो हिंदु बायका पूर्ण सुखासमाधानात नांदत आहेत. आपल्या घरच्या त्या सम्राज्ञी आहेत. कोणाहि स्त्रीला हेवा वाटावा असा अधिकार त्या आपल्या पतीवर गाजवीत आहेत. अर्थात् हा अधिकार प्रेमामुळें येतो. पत्रलेखकानें निर्दयपणाची म्हणून उघडकीस आणलेली गोष्ट फक्त हिंदुधर्मातच होणाऱ्या अन्या-याची आहे असें नव्हे तर जगांतील सर्व देशांत आणि भिन्न भिन्न धर्मांच्या लोकांत प्रकट होणाऱ्या मनुष्यस्वभावाच्याच दुष्टाव्याचें तें उदाहरण आहे. काडीमोडीची सोय केल्यानें, स्वतःचे मत चाल-विण्याची जिला शक्ति नाहीं आणि केव्हां केव्हां तर तें चालविण्याची जिला इच्छाहि होत नाहीं अशा गरीबगाय बायकोचें, तिच्या पशुतुल्य नवऱ्यापासून सरक्षण होतेंच असें नाहीं. म्हणून सुधारकांनीं सुधारणा करण्याकरितांच भावनावशता व अतिशयोक्ति टाळावी हें बरें.

तरीपण ज्या प्रसंगाकडे या लेखानें आपलें लक्ष वेधायचें आहे तो प्रसंग हिंदु समाजांत अगदींच नवा आहे असें नाहीं. बायकोला नवऱ्याची फाजील ताबेदारी पत्करावयाला लावण्यांत हिंदु संस्कृतीची चूक झाली आहे. बायकोनें नवऱ्यांत पूर्णपणें विलीन होऊन जावें असा हिंदु संस्कृति आग्रह धरते. त्यामुळें कांहीं वेळा नवरा अधिका-

राचें अतिक्रमण करतो आणि शेवटीं पशु बनतो. अशा जुलुमांवर उपाय कायद्याचा आसरा घेणें हा नसून स्त्रियांना—कुमारिकांना नव्हे तर विवाहित स्त्रियांना—शिक्षण देणें आणि नवऱ्यानें केलेल्या अमानुष वर्तणुकीविरुद्ध लोकमत तयार करणें हा आहे. वरील उदाहरणांत उपाययोजना करावयाची ती अगदीं साधी आहे. तिच्या भावानें व इतर नातलगांनीं "काय करावं?" म्हणून हात जोडून स्वस्थ बसण्याचें व त्या मुलीबरोबर रडत बसण्याचें सोडून देऊन तिचा संभाळ करावा. पापी नवऱ्याची समजूत करणें किंवा त्याच्या संगतींत राहण्याचा प्रयत्न करणें हें तिचें मुळींच कर्तव्य ठरत नाहीं, अशी तिची भावना होण्याजोगें शिक्षण तिला द्यावें. खुद्द नवऱ्याला बायकोबद्दल यत्किंचितहि क्षिति नाहीं हें उघडच दिसत आहे. म्हणून कायदेशीर संबंध न तोडतां नवऱ्याचें घर सोडून तिनें वेगळें राहावें, आणि आपलें लग्नच झालें नाहीं असें तिनें समजावें. अर्थात ज्या हिंदु स्त्रीला काडीमोड करून घेणें शक्य नसतें अशा स्त्रीलासुद्धां दोन कायदेशीर इलाज शक्य आहेत आणि ते म्हणजे रोजच्या मारहाणीबद्दल नवऱ्याला सजा देवविणें आणि आपला त्यानें संभाळ करावा असा आग्रह धरणें. माझा अनुभव मात्र असा आहे कीं हे उपाय सर्वच बाबतींत नसले तरी बहुतेक बाबतींत फोल ठरतात. साध्वी स्त्रीला त्यामुळें कांहीं एक समाधान लाभत नाहीं आणि नवऱ्याची सुधारणा तर अवघड, नव्हे अशक्य होऊन बसते. कांहीं झालें तरी नवऱ्याची सुधारणा करणें हें समाजाचें आणि त्यांतल्या त्यांत प्रत्येक बायकोचें ध्येय असलें पाहिजे. प्रस्तुत बाबतींत मुलीचे आईबाप तिला संभाळण्याला चांगले समर्थ आहेत. पण हें शक्य नसेल तेथें अशा वाईट रीतीनें वागविल्या गेलेल्या स्त्रियांना आश्रय देणाऱ्या संस्था देशांत वाढत आहेतच.

आपल्या नवऱ्याचें जाचक होणारें घर अशा रीतीनें सोडून देणाऱ्या किंवा काडीमोड करून दुःखपरिहार करून घेणें शक्य नसतें तेव्हां नवऱ्यांनींच प्रत्यक्ष टाकून दिलेल्या, तरुण स्त्रियांच्या कामपूर्तीचा प्रश्न अद्याप तसाच राहातो. पण ही गोष्ट कांही पुष्कळांच्या बाबतींत खरोखर नडणारी आहे असें नाहीं. कारण ज्या समाजांत युगानुयुगें काडीमोडीला रूढीचा पाठिंबा नाहीं त्या समाजांत एकाद्या स्त्रीचें लग्न सुखाचें ठरलें नाहीं तरी ती स्त्री पुनर्विवाह करूं इच्छित नाहीं. जेव्हां एखाद्या समाजांतील लोकमताला या विशिष्ट प्रकारच्या दुःखपरिहाराची जरूर भासूं लागेल तेव्हां तो घडून येईल याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. पत्रलेखकाचें म्हणणें मला कळलें आहे त्याप्रमाणें, त्या मुलीला आपली कामलालसा तृप्त करून घेतां येत नाहीं ही तिची तक्रार नाहीं. तक्रार आहे ती नवऱ्याच्या पशुतुल्य, उर्मट आणि अनीतिमय वागणुकीबद्दल. याला मी म्हटल्याप्रमाणें मनाची प्रवृत्ति सुधारणें हाच एक उपाय आहे. असहाय्यतेची भावना ही आपल्या इतर बहुतेक दुःखांप्रमाणें काल्पनिकच आहे. दोषयुक्त कल्पनेनें उत्पन्न केलेलें दुःख घालविण्याला जीवनाकडे पाहाण्याची नवीन दृष्टि, थोडासा स्वतःच्या बुद्धीनें केलेला विचार, पुरेसा आहे. मित्रांनीं आणि नातलगांनीं अशा प्रकरणीं पीडा झालेल्या व्यक्तीला जुलुमाच्या ठिकाणापासून दूर नेऊन होणाऱ्या निव्वळ अभावात्मक परिमाणानें समाधान मानूं नये. समाजसेवेप्रीत्यर्थ तिनें स्वतःला तयार करावें. यासाठीं तिचें मन वळवावें. नवऱ्याच्या शेजेचा अधिकार—आणि तोहि मिळेल कीं नाहीं शंकाच—गमावल्याची भरपूर भरपाई या प्रकारच्या शिक्षणानें होईल.

---

## विसाव्या शतकांतील एक सती ? : १३

मुबईच्या एका वृत्तपत्रांत एक बाई सती गेल्याचे प्रसिद्ध झाले होते. त्याबाबतीत घाटकोपर येथील एका बाईनी गांधीजींचे मत विचारल्यावरून गांधीजींनी पुढील लेख लिहिला आहे—

वर्तमानपत्रांतील मजकूर कदाचित खरा नसावा. ही बाई आजारी पडून किंवा अपघातानें मरण पावली असावी. ही आत्महत्या नसावी. सतीचें वर्णन आपल्या पूर्वजांनीं केलें आहे. आणि आजहि तें तितकेंच खरें आहे. सती ती की जिचें पतीच्या ठिकाणीं सदोदित स्थिर प्रेम आणि भाव आहे, पतीच्या हयातींत आणि नंतरहि जी आपल्या निःस्वार्थ सेवेनें चमकते आणि विचार, उच्चार व आचार यांमध्यें सर्वस्वीं निष्कलंक राहते. पतीच्या निधनानंतरहि स्वतःला जाळून घेणें हें ज्ञातेपणाचें लक्षण नसून आत्म्याच्या स्वरूपाविषयीं गाढ अज्ञान असल्याचें तें द्योतक आहे. आत्मा अमर आहे, अविकारी आहे, व्यापक आहे. स्थूल देह गेला तरी त्याला मरण नाही. एक नश्वर देह टाकून दुसरा, असें करीत करीत अखेर पार्थिव बंध तोडून तो पूर्णपणें मुक्त होतो. असंख्य ऋषिमुनींनीं अनुभव घेऊन या म्हणण्यांतील खरेपणाची खात्री करून घेतली आहे. आणि आजसुद्धां इच्छा असेल तर कोणालाहि त्याचा अनुभव घेतां येईल. अशी वस्तुस्थिति असतांना मग आत्महत्येचें समर्थन कसें बरें करतां येईल ?

दुसरी गोष्ट, खरा विवाह म्हणजे फक्त शरीराचेंच मीलन नव्हे; आत्म्याचें मीलनहि त्यानें सूचित होतें. जर विवाह म्हणजे शरीर-संबंधाहून अधिक कांहीं नसेल तर विधवा झालेल्या स्त्रीचें नवऱ्याच्या एखाद्या तसबिरीनें अगर पुतळ्यानें समाधान व्हावें. पण कांहीं म्हटलें तरी आत्मनाश हा व्यर्थ आहे. त्यामुळें कांहीं मृत मनुष्य जिवंत होऊं शकत नाहीं. उलट जिवंत जगांतून आणखी एकजण नाहींसा मात्र होतो.

विवाहाच्या योगानें आदर्श साधावयाचा आहे तो, शरीरद्वारा आत्मिक मीलनाचा. मनुष्याच्या हृदयांतील जी प्रेमभावना त्याच्या-मुळें साकार होते तिचा हेतु दैवी आहे, म्हणजेच विश्वव्यापी प्रेमाच्या मार्गांतील एक टप्पा गांठावा हाच आहे. म्हणून तर अमर मीरा गातेः—

‘ मेरे तो गिरिधर गोपाल दुसरा न कोई । ’

यावरून हे ओघानेंच येतें कीं, ‘ सती ’ ही विवाहाला कामवि-काराच्या तृप्तीचें साधन मानणार नाहीं तर पतीच्या व्यक्तित्वांत आपलें व्यक्तित्व विलीन करून निःस्वार्थ आणि निरहंकारी सेवेचा आदर्श प्राप्त करून घेण्याचें तें एक साधन म्हणून मानील पतीचा मृत्यु होतांच त्याच्या चितेवर जाऊन बसण्यानें ती कांहीं आपलें सतीत्व दर्शविणार नाहीं, तर सप्तपदी विधीच्या वेळीं ज्या क्षणीं तिनें त्याला आपला शब्द दिला त्या क्षणापासून प्रत्येक श्वासागणीक आपल्या त्यागानें, आत्मसमर्पणानें, संयमनानें पतीच्या, त्याच्या कुटुंबाच्या व देशाच्या सेवेला वाहून घेऊनच ती आपलें सतीत्व सिद्ध करील. खाण्यापिण्याच्या लोभापासून आणि इंद्रियसुखापासून ती दूर राहील.

कुटुंबाच्या घरगुती संकुचित काळज्या आणि स्वार्थ यांची गुलामगिरी ती मुळींच पत्करणार नाहीं. तर आपल्या ज्ञानांत भर टाकण्याच्या दृष्टीनें आणि त्यागाची व संयमाची वृत्ति अधिकाधिक आपल्या अंगीं बाणवून घेऊन सेवेची आपली शक्ति वाढविण्याच्या दृष्टीनें ती प्रत्येक संधीचा उपयोग करून घेईल. आणि पतीशीं पूर्णपणें एकरूप होऊन साऱ्या जगाशीं एकरूप होण्यास शिकेल. अशी सती पतीच्या मृत्युबद्दल कधींहि आक्रोश करणार नाहीं. आपल्या मृत पतीची ध्येयें व सद्गुण आपल्या आचरणांत उतरवून त्यांना सजीव करण्याचा ती आटोकाट प्रयत्न करील आणि अशा रीतीनें त्याला ती अमरपदावर चढवील. ज्याच्याशीं विवाह केला त्याचा आत्मा मृत्यु पावलेला नाहीं, तो जिवंत आहे हें जाणून ती पुनर्विवाहाचा विचारहि मनात आणणार नाहीं.

वाचकांना येथें असें विचारावेंसें वाटेल कीं ज्या 'सती' चें हें चित्र रेखाटलें ती तर विकारातीत व्यक्ति दिसते. तिला संततीची इच्छाच असूं शकणार नाहीं. मग तिनें लग्न तरी कशाला करावें? याला उत्तर–हल्लींच्या हिंदु समाजांत विवाह ही बहुतकरून पसंतीनापसंतीची बाबच नसते. दुसरें म्हणजे आपल्या या पडत्या काळांत शीलरक्षणाची ढाल म्हणून व आत्मसंयमाला मदत या दृष्टीनें विवाह आवश्यक आहे असें मानणारे कांहींजण आहेत. आणि खरोखरच मला स्वतःला अशा कांहीं माणसांचीं उदाहरणें माहीत आहेत कीं, ते लग्नाच्या वेळीं विकारापासून मुक्त नव्हते, पण पुढें पूर्ण ब्रह्मचर्याचा आदर्श त्यांच्यांत बिंबून तो साध्य होण्याकरितां वैवाहिक जीवन हें बलवत्तर साधन झालेलें त्यांना आढळून आलें. हीं उदाहरणें देण्याचें कारण असें कीं, सतीचा जो आदर्श मी रेखाटला तो निव्वळ आदर्श पुढें असावा म्हणून रेखाटला, त्याला कल्पनेच्या जगाखेरीज प्रत्यक्ष

स्थान नाहीं, असें नसून तो आदर्श जीवनांत उतरावयाचा आहे आणि या आपल्या व्यावहारिक जगांतच तो प्रत्यक्षांत आणावयाचा आहे.

परंतु सतीच्या आदर्शाप्रत पोंचण्याची धडपड करणारी सर्वसाधारण स्त्री माताहि होईल, हें मी तात्काळ मान्य करतों. म्हणून वर सांगितलेल्या इतर भिन्नभिन्न गुणांबरोबरच आपलीं मुलें देशाचे खरे सेवक बनतील अशा रीतीनें त्यांचें पालन–पोषण व वाढ करण्याचेंहि ज्ञान तिनें संपादन केलें पाहिजे.

पत्नीबद्दल मी जें कांहीं सांगितलें तें सर्व पतीलाहि तितकेंच लागू आहे. पत्नीनें जशी पतीबद्दल आपली निष्ठा व अव्यभिचारी भक्ति सिद्ध करावयाची आहे तशीच पतीनेंहि पत्नीविषयीं आपली निष्ठा आणि भक्ति सिद्ध करावयाची आहे. एकाच्या बाबतीत न्यायाचा एक कांटा तर दुसऱ्याच्या बाबतीत दुसराच, असें करतां येणार नाहीं. तरीसुद्धां पत्नीच्या चितेवर पति चढल्याचें आपण कधीं ऐकिलें नाहीं. म्हणून, नवरा मरतांच त्याच्या विधवा बायकोनें स्वतःचा नाश करून घेण्याची ही चाल अडाणी धर्मभोळेपणामुळें व पुरुषाच्या अंध अहंभावामुळें निर्माण झालेली आहे असें धरून चालावयास हरकत नाहीं. एके काळीं या रूढीला कांहीं अर्थ होता, असें जरी कोणी सिद्ध केलें तरी आजच्या युगांत ती केवळ रानटीपणाचीच समजली जाईल. स्त्री ही पुरुषाची गुलाम नसून त्याची सोबतीण आहे. तिलाच दुसरीं नांवें 'अर्धांगी' 'सहचारिणी' 'सखी' अशीं आहेत. पुरुषाच्या हक्कांत आणि कर्तव्यांत स्त्रीचा समान वांटा आहे. म्हणून त्यांचीं एकमेकांविषयींचीं व जगाविषयींचीं कर्तव्य एकच व परस्परसहाय्यक असलीं पाहिजेत. म्हणून या भगिनीनें आत्मनाश केला म्हणतात, तो मी व्यर्थ मानतों. हें उदाहरण अनुकरणीय

म्हणून खात्रीनें पुढें मांडतां येणार नाहीं. पण मरण्याच्या बाबतींतील तिचें धैर्य तरी तुम्हांला वाखाणण्याजोगें वाटत नाहीं काय, असें मला कोणी कदाचित् विचारील. 'मुळींच नाहीं' असें माझें प्रांजल उत्तर आहे. पापाचरणी माणसेंहि असें धैर्य दाखवितात हें आपण पहात नाहीं काय? पण म्हणून, कोणी त्यांची वाहवा करण्याचा विचारहि कधीं मनांत आणीत नाहीं. आत्महत्येची अविवेकानें स्तुति करून एखाद्या अज्ञानी भगिनीला नकळत का होईना भलत्या मार्गाला लावण्याचें पातक मी माझ्या माथ्यावर कशाला घेऊं? सतीत्व म्हणजे पावित्र्याची पराकाष्ठा. हे पावित्र्य मरूनच मिळवितां किंवा साधतां येतें असें नाहीं. अखंड प्रयत्नानें, रोजच्या रोज सतत मनाचा होम करूनच तें मिळवितां येईल.

## संमतिवय वाढवा : २०

मिसेस् डोरोथी जिनराजदास यांनीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीपुढें आलेल्या एका बिलाविषयीं एक फिरतें पत्र काढलें आहे. त्या बिलाचा हेतु स्त्रीच्या संमतीचें वय निदान १४ व्या वर्षापर्यंत तरी वाढवावें असा आहे.

मला या बिलाविषयीं कांहीं माहिती नाहीं हें कबूल केलें पाहिजे. पण संमतीचें वय वाढवावें या बाबतींत माझा संपूर्ण पाठिंबा आहे. तें १४ व्या वर्षापर्यंतच नव्हे तर १६ व्या वर्षापर्यंतसुद्धां वाढवावें. म्हणून, सदर बिलांतील मजकुराविषयीं मला कांहीं सांगतां येत नसलें तरी, पुरुषाच्या कामलालसेपासून कोंवळ्या वयाच्या निष्पाप मुलींना वांचविण्याचा ज्या चळवळीचा हेतु आहे अशा कोणत्याहि चळवळीला माझा हार्दिक पाठिंबा आहे असें समजावें. एकदां लग्नाचा विधि झाला म्हटलें कीं अनैतिक व अमानुष कृतीलासुद्धां कायदेशीरपणा येतो, तो तसा येतां कामा नये. १४ व्या वर्षीसुद्धां रतिक्रिया होणें हें निःसंशय अनैतिक व अमानुष आहे असें माझें नम्र मत आहे. जो आचार मुळांतच अनैतिक आहे तो पवित्र आहे असें सिद्ध करण्याकरितां संशयास्पद अशीं संस्कृत वचनें पुढें करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अनेक बालमातांची प्रकृति ढांसळलेली मी प्रत्यक्ष पाहिली आहे. आणि बालविवाहाच्या भयानक दर्शेत सक्तीच्या बाल वैधव्याची भर घातली कीं मानवी दुःखाची सीमा झाली. संमतीचें वय

वाढविण्याच्या दिशेनें झालेल्या समंजस कायद्याला माझी खात्रीनें अनुमति मिळेल. पण आज अस्तित्वांत असलेले कायदेसुद्धां लोकमताच्या पाठिंब्याच्या अभावीं निष्फळ ठरले आहेत, या गोष्टीची मला दुःखदायक जाणीव आहे. या आणि अशाच इतर अनेक दिशांनी करावयाच्या कामांत समाजसुधारकांपुढें फार मोठ्या अडचणी आहेत. हिंदु समाजावर जर कांहीं खराखुरा परिणाम करावयाचा असेल तर दृढ आणि अविश्रांत चळवळ करीत राहाणें अवश्य आहे. हिंदी बालिकांना अकालवृद्धपणापासून व अकालमरणापासून आणि हिंदुधर्माला हाडकुळी दुबळी प्रजा अस्तित्वांत आणण्याच्या जबाबदारींतून सोडविण्याच्या थोर कार्यांत जे गुंतले आहेत त्यांना मी संपूर्ण यश चिंतितों.

## बालविवाहाचा कलंक : २१

मिसेस मार्गारेट ई. कझिन्स या बाईंनीं एका दुःखदायक घटनेची हकीकत माझ्याकडे पाठविली आहे. ही घटना मद्रास येथें नुकतीच घडलेली दिसते, आणि ती एका बालविवाहांतून उद्भवली आहे. ज्यांचा विवाह झाला त्यांतील मुलगी १३ वर्षांची आणि 'नवरा'२६ वर्षांचा आहे. हें जोडपें १३ दिवस एकत्र राहिलें न राहिलें एवढ्यांत मुलगी जळून मेली. पंचांना असें आढळून आलें आहे कीं, नवरा म्हणवून घेणाराच्या असह्य आणि अमानुष आचरणामुळें तिनें आत्महत्या केली. मुलीच्या मरणकाळच्या जबानीवरून दिसून येतें कीं, 'नवऱ्या'नें तिचे कपडे पेटविले. कामातुरांना समजुतदारपणा कुठला, दया कुठली ?

पण ती मुलगी मेली कशी हा गौण मुद्दा आहे. या घटनेंतील निर्विवाद गोष्टी अशा आहेत :

( १ ) मुलीचें लग्न ती निवळ १३ वर्षांची असतांना केलें.

( २ ) ज्या अर्थी 'नवऱ्या'च्या हालचालीचा तिने प्रतिकार केला, त्या अर्थी तिला संगाची इच्छा नव्हती.

( ३ ) 'नवऱ्या'नें क्रूरपणाच्या हालचाली खात्रीपूर्वक केल्या.

( ४ ) आणि ती आतां मरण पावली आहे

एखाद्या जंगली रूढीला धार्मिक समजून मंजुरी देणें हा धर्म नव्हे, अधम आहे. स्मृतींमध्यें परस्पर विरोधी विधानें भरपूर आहेत. या

विधानांतून बुद्धीला पटण्याजोगें एकच अनुमान निघतें तें हें कीं, जीं वचनें सर्वमान्य प्रसिद्ध नीतितत्त्वांना विरोधी आहेत, विशेषतः खुद्द स्मृतींमध्येंच घालून दिलेल्या नैतिक आचाराच्या विरुद्ध आहेत, तीं मागाहून घुसडलेलीं आहेत असें समजून बाजूला ठेवलीं पाहिजेत. एकाच वेळीं आणि एकाच लेखणींतून संयमावर स्फूर्तिप्रद श्लोक आणि मनुष्यांतील जंगलीपणाला उत्तेजन देणारे श्लोक उतरणें शक्य नाहीं. मासिक माळी सुरू होण्याइतकें मुलीचें वय झालें नसेल तर, तिच्याशीं लग्न करूं नये; ज्याला संयमाचें वावडें आहे आणि जो दुष्कर्मांत आकंठ बुडलेला आहे तोच मनुष्य या नियमाला पाप म्हणूं शकेल. मासिक माळी सुरू झाल्यानंतर कांहीं वर्षें मुलीशीं लग्न करणें हें पापमय समजलें पाहिजे, पाळी सुरू होण्यापूर्वी तर लग्नाचा विचारहि मनांत आणतां कामा नये. मुलाला मिसरूड फुटली कीं लगेच तो संतति उत्पन्न करण्याला जसा लायक होत नाहीं, तसेंच मुलीला पाळ्या सुरू झाल्या तरी ती गर्भधारणा करायला लायक बनत नाहीं.

बालविवाहाची ही रूढी नैतिक तसेंच शारीरिक पापकृत्य आहे. कारण तिच्यामुळें आमच्या नैतिक आचाराला धक्का बसतो आणि शारीरिक ऱ्हास होऊं लागतो. अशा रूढींना पाठिंबा देण्यानें आपण ईश्वरापासून तसेंच स्वराज्यापासून दूर जातों. मुलीच्या कोवळ्या वयाचा जो मनुष्य विचार करीत नाहीं तो ईश्वराचा काय करणार? आणि खुरटलेल्या माणसाच्या अंगांत स्वातंत्र्याच्या लढाया मारण्याची किंवा स्वातंत्र्य मिळालें तर तें टिकविण्याची, काय ताकद असणार? स्वराज्याची लढाई म्हणजे केवळ राजकीय जागृति नव्हे तर सामाजिक शैक्षणिक, नैतिक, आर्थिक आणि राजकीय अशी सर्व बाजूंनीं जागृति होय.

संमतीचें वय वाढवावें म्हणून कायदेमंडळांत बिल आणण्यांत येत आहे. कांहीं लोकांना जबाब देण्याला भाग पाडण्याच्या दृष्टीनें तें ठीक आहे. पण सार्वजनिक पापप्रवृत्ति ही कायदे करून नाहींशी करतां येणार नाहीं. लोकमताला सज्ञान करणें हा त्यावरील उपाय आहे. अशा बाबतींत कायदा करण्याच्या मी विरुद्ध नाहीं, पण माझा जोर मात्र लोकमत शिक्षित करण्यावरच जास्त असतो. बालविवाहाच्या विरुद्ध जर लोकमत जागृत असतें तर मद्रास येथें जें घडलें तें घडूं शकलें नसतें. सदर तरुण हा कांहीं अशिक्षित मजूर नव्हता, तो चांगला शिकलेला बुद्धिमान टायपिस्ट होता. जर लोकमत त्या लग्नाच्या विरुद्ध असतें किंवा कोवळ्या वयाच्या मुलीच्या बाबतींत लग्न झाल्यानंतर त्या संबंधाला कायदेशीर करणाऱ्या रतिक्रियेच्या विरुद्ध असतें तर त्या मुलीशीं लग्न करणें किंवा तिला स्पर्श करणें त्याला शक्य झालें नसतें. सर्व साधारणपणें १८ वर्षांच्या खालील मुलींचीं लग्नें मुळींच करूं नयेत.

---

# बालविवाहाचें समर्थन ? : २२

यंग इंडियाचे एक वाचक लिहितातः—

ता. २६ ऑगस्ट १९२६ च्या अंकातील 'बालविवाहाचा कलंक' या लेखात आपण म्हटले आहे कीं, 'मासिक पाळी सुरू होण्याइतके मुलीचे वय झाले नसेल तर तिच्याशी लग्न करू नये, या निर्बंधाला असंयमी आणि दुराचारात बुडलेला मनुष्यच पाप म्हणू शकेल.'

हे वाचून मला दुःख झाले.

आपल्या मताशी ज्यांचीं मतं जुळत नाहीत त्यांच्याबद्दल उदारबुद्धीने आपण का विचार करू शकत नाही हे मला समजत नाही. बालपणी विवाह करावा असे सांगण्यात हिंदुधर्मशास्त्रकाराची सर्वस्वी चूक आहे असे म्हणा हवे तर. पण बालविवाहाचा आग्रह धरणाऱ्यांना दुराचारात बुडलेले म्हणणें अयोग्य आहे असे मला वाटते. वादविवादातील सौजन्याची मर्यादा यात ओलांडली जात आहे असे मला वाटतें. खरोखर बालविवाहाच्या विरुद्ध अशा तऱ्हेचा युक्तिवाद मी प्रथमच ऐकला. माझ्या माहितीप्रमाणे हिंदु सुधारक किंवा खिश्चन मिशनरीसुद्धा असे कधी बोललेले नाहीत. त्यामुळे प्रतिपक्षाशी उदार बुद्धीने वागण्याच्या बाबतीत तरी निदान ज्यांना मी आदर्शरूप समजत होतों त्या महात्मा गांधींच्या लिखाणांत असला युक्तिवाद पाहतांच मला केवढा धक्का बसला असेल याचा विचार करा.

हिंदु धर्मशास्त्रकारांपैकी एकदोघांचा नव्हे तर जवळजवळ सर्वांचाच आपण धिक्कार केला आहे. कारण माझ्या माहितीप्रमाणे प्रत्येक स्मृतिकार मुलींचीं लग्नें बालपणीच करावींत असेच सांगतो. बालविवाहाचा नियम घालून देणारीं वचनें, आपण म्हटलें आहे त्याप्रमाणें, मागाहून कुणी तरी घुसडलीं आहेत

असे मानतां येत नाही. बालविवाहाची रूढी एकाच प्रांतांत अगर एकाच वर्णांत आहे असें नसून ती हिंदुस्थानांत जवळजवळ सरास सुरू आहे. रामायणकालाइतकी ती पुरातनहि आहे.

हिंदुधर्मशास्त्रकारांनी मुलींचें लग्न करावे असा आग्रह धरण्याची जी कारणें मला वाटतात ती मी थोडक्यांत देण्याचा प्रयत्न करतो. सामान्यतः प्रत्येक मुलीला नवरा असणे इष्ट असे त्यांचें मत होते. ही गोष्ट खुद्द मुलीच्या मनाला शांति मिळावी, सुख लाभावे म्हणूनच नव्हे तर एकदर समाजाचेंहि कल्याण साधावे या दृष्टीने आवश्यक आहे. जर प्रत्येक मुलीला नवरा शोधावयाचा तर त्याची निवड स्वतः मुलीने न करता तिच्या आईबापानी करावी. ही निवड खुद्द मुलीच्यावरच सोपविली तर त्याचा परिणाम असा होईल की पुष्कळ मुलींची लग्नेच होणार नाहीत. त्याचे कारण मुलींना लग्न आवडत नाही म्हणून नव्हे तर सर्व मुलींना आपल्याला योग्य असा नवरा शोधणें कठीण आहे म्हणून. शिवाय ते धोक्याचेंहि आहे. कारण त्यामुळें प्रणयचेष्टा करण्याकडे प्रवृत्ति होईल आणि कदाचित् नीतिबधनेंहि शिथिल होतील. वरून चागले दिसणारे तरुण कदाचित् साध्याभोळ्या मुलींचे शील भ्रष्ट करतील. पण ही निवड जर आईबापानीच करावयाची म्हटले तर मुली लहान असतांनाच त्यांची लग्नें केली पाहिजेत. त्या मोठ्या झाल्या तर प्रेमपाशात सांपडतील, आणि आईबापानी शोधलेल्या वराशी लग्न करणे त्याना कदाचित् आवडणार नाही. मुलीचे लग्न लवकर झाले तर ती नवऱ्याशी व सासरच्या मडळीशी एकरूप होऊन जाते. ही एकरूपता अधिक स्वाभाविक, अधिक पूर्ण असते. ज्याचे विचार आणि आचार ठरून गेले आहेत अशा प्रौढ मुलीना नव्या घराशी जुळवून घेणें कांही वेळा कठीण होते.

बालविवाहाला मुख्य विरोध आहे तो हा की, त्यामुळे मुलीचें व तिच्या सततीचें आरोग्य वाईट होते. पण हा काही पटण्याजोगा मुद्दा नाही. कारण हल्लीं हिंदु लोकात लग्नाचे वय वाढत असले तरी एकदर समाज दुर्बळ बनत चालला आहे. पन्नास शभर वर्षांपूर्वीं स्त्रीपुरुष सामान्यतः आजच्यापेक्षां अधिक सुदृढ, निरोगी व दीर्घायुषी होते. पण त्या वेळी बालविवाहच अधिक प्रचलित होता. उशीरा लग्न करणाऱ्या शिक्षित मुलीची अगकाठी कमी शिकलेल्या आणि लवकर लग्न झालेल्या मुलींच्या अंगकाठीपेक्षां सामा-

न्यतः चांगली असते असें कांही नाहीं. या सर्व गोष्टींवरून बालविवाह हा कांहीं लोक समजतात तितका, शारीरिक ऱ्हास करीत नाहीं हेंच सभवनीय दिसतें.

युरोपीय समाजाविषयी व हिंदी समाजाविषयी आपल्याला चांगलें ज्ञान असल्याने एकदर मानाने हिंदी बायका या युरोपीयन बायकांपेक्षां अधिक पतिनिष्ठ असतात किंवा काय; गरीब वर्गामध्ये हिंदी लोकच आपल्या बायकांना युरोपीयन लोकांपेक्षां अधिक प्रेमाने वागवितात किंवा कसे; युरोपीयनांपेक्षां हिंदी लोकांमध्ये अपेशी लग्नें कमी आहेत किंवा काय; युरोपीयन समाजापेक्षां हिंदी समाजांत स्त्रीपुरुषविषयक नीतिमत्ता अधिक आहे किंवा काय, यांबद्दल आपणच सागू शकाल. वर उल्लेखिलेल्या बाबतीत जर हिंदी लग्नें हीं युरोपीयन लग्नांपेक्षा अधिक सुखाची असतील तर मग हिंदी विवाहपद्धतीचे बालविवाह हे जे आवश्यक अंग त्याचा निषेध करता येणार नाही.

मुलींची लग्नें लवकरच झालीं पाहिजेत असा दंडक घालण्यात हिंदुधर्मशास्त्रकाराच्या मनात एकदरीत समाजाच्या ( स्त्री-पुरुष दोघाच्याहि ) खऱ्या कल्याणाव्यतिरिक्त दुसरा कांही विचार असावा हे मला पटत नाही. ज्या अनेक गोष्टींमुळे प्रतिकूल परिस्थितीतहि हिंदु समाजाचे पावित्र्य अबाधित राहिले आहे व त्याची घडी विस्कटली नाही, त्यापैकी मुलींचे बालपणी लग्न करणे ही एक गोष्ट आहे असे मला वाटते. आपल्याला कदाचित् तसे वाटणार नाही. पण म्हणून मुलींची लग्नें बालपणीच झाली पाहिजेत, असा आग्रह धरणारे सर्व हिंदुधर्मशास्त्रकार हे सयमाला पारखे व 'दुराचारांत बुडलेले' होते ही आपली समजूत आपण सोडून द्यावी अशी आम्ही अपेक्षा करणे चुकीचे होईल काय ? आपण दिलेले मद्रासचे उदाहरण चमत्कारिक दिसतें...तेरा वर्षाच्या आंतील मुलींची लग्नें झालेली अशी पुष्कळ उदाहरणें आहेत. पण नवऱ्याच्या निर्दय बलात्काराने आत्महत्त्या करण्यास प्रवृत्त झाल्याचे उदाहरण एकहि आतांपर्यत ऐकले नाही. कदाचित् मद्रासेतील घटनेची कारणे कांही वेगळीं असतील, बालविवाह हे कांही त्या मुलीच्या मृत्यूचें मुख्य कारण नसावे.

' आपल्या सदसद्विवेक बुद्धीला जाचणाऱ्या गोष्टींतील बोचणी कमी करण्यासाठीं सोईस्कर तत्त्वज्ञान तयार करणें अगदीं सोपें असतें ' असें जें एका कवीनें म्हटलें आहे तें सार्थ आहे. यंग इंडियाच्या या वाचकानें तर त्याच्यावरहि ताण केली आहे. नुसतें सोईस्कर तत्त्वज्ञान तयार करून तो थांबला नाहीं, तर वस्तुस्थितीकडे पूर्ण दुर्लक्ष करून निराधार विधानांवर त्यानें आपला युक्तिवाद रचला आहे.

उदार बुद्धि नसल्याविषयींच्या आरोपाकडे मी दुर्लक्ष करतों. कारण इतकेंच की माझी तक्रार धर्मशास्त्रकारांविरुद्ध नाहीं तर मातृपदाची जबाबदारी वाहाण्याला असमर्थ अशा कोंवळ्या वयांतच मुलींचीं लग्नें केलीं पाहिजेत असा आग्रह जे लोक धरूं शकतात त्यांच्यावरच दुराचाराचा आरोप करण्याचें मी धाडस करीत आहें. उदार बुद्धि नाहीं असें केव्हां म्हणतां येईल ? जेव्हां काल्पनिक व्यक्तीवर नव्हे तर एखाद्या जिवंत माणसावर अपवित्र हेतूंचा आणि तोहि विनाकारण आरोप आपण करतों तेव्हां. पण ज्या मूळ स्मृतिकारांनीं आत्मसंयमनाचा उपदेश दिला त्यांनींच मुली लहान असतांना त्यांचा विवाह करावा असा नियम घालून दिला आहे असें म्हणण्याला या लेखकाला कांहीं आधार आहे काय ? उलट त्या ऋषींच्या अंतःकरणांत अपवित्रता किंवा मानवी शरीराच्या विकासासंबंधींच्या मूलभूत गोष्टींबद्दल गाढ अज्ञान असणें शक्यच नाहीं असेंच समजून चालणें हें अधिक उदारपणाचें नव्हे काय ?

आणि समजा, जरी बालविवाहाचा ( ' योग्य काल ' होण्यापूर्वींचा नव्हे, कारण योग्य काळापूर्वींचा विवाह म्हणजे पंचविसावें वर्ष लागण्याच्या बऱ्याच पूर्वींचा विवाह ) नियम घालून देणारीं वचनें अधिकृत अशीं दिसून आलीं तरी आजचा प्रत्यक्ष अनुभव व शास्त्रीय ज्ञान

हें लक्षांत घेतां तीं आपण त्याज्यच मानलीं पाहिजेत. बालविवाह हिंदु समाजांत सर्वत्र चालू आहेत हें विधान बिनचूक आहे असें मला वाटत नाहीं. 'लाखो मुली' पोरवयांतच विवाहित म्हणजे पत्नी म्हणून नांदत आहेत असें दिसून आलें तर ती दुःखाची गोष्ट होईल. 'लाखो मुलींचीं' लग्नें, समजा अकराव्या वर्षीं गर्भाधानविधि होऊन पूर्ण झाली असतीं तर हिंदु समाज केव्हांच नष्ट होऊन गेला असता.

आईबापांनींच आपल्या मुलींच्यासाठीं वराची निवड करावी ही पद्धति जरी पुढें चालू ठेवावयाची असली तरी मुलींचीं लग्नें योग्य कालाच्या पूर्वींच ठरविलीं पाहिजेत आणि गर्भाधानविधीसह तीं पूर्ण झालीं पाहिजेत असें कांहीं नाहीं. आणि जरी ही निवड मुलींनीं करावयाची म्हटली तरी एकमेकांची मनधरणी किंवा प्रणय–चेष्टा याना ऊत येईल हें म्हणणेंहि बरोबर नाहीं. युरोपमध्येंसुद्धां तरुण-तरुणींमधील प्रियाराधन कांहीं सर्वत्र चालू नाहीं; हजारों हिंदु मुलींचीं लग्नें पंधराव्या वर्षाच्या पुढें होतात आणि तरी त्यांचे नवरे आईबापांनींच निवडलेले असतात. मुसलमानांमध्यें मुली प्रौढ असल्या तरी पालकच नेहमी त्यांच्यासाठीं वरांची निवड करतात. नवरा मुलीनीं पसंत करावा कीं पालकांनीं हा प्रश्नच अगदीं वेगळा असून रूढीप्रमाणें त्याचें स्वरूप राहातें. प्रौढपणीं लग्नें झालेल्या मुलींची संतति ही लहानपणीं लग्नें झालेल्या मुलींच्या संततीपेक्षां अशक्त असते या विधानाला पत्रलेखकानें कांहींच आधार दिलेला नाहीं. हिंदु व युरोपीयन या दोन्ही समाजांविषयीं मला जरी अनुभव असला तरी त्यांच्या आचारविचारांची तुलना करीत बसण्याची माझी इच्छा नाहीं. तथापि हिंदु समाजापेक्षां युरोपीयन समाजाचे आचारविचार कमी प्रतीचे आहेत असें जरी वादासाठीं गृहीत धरलें

तरी तो कमीपणा मुली पूर्ण वयांत आल्यानंतर त्यांची लग्नें होत असल्यामुळें उत्पन्न झाला आहे असें त्यावरून स्वाभाविकपणें सिद्ध होईल काय ?

मला पत्र लिहिणारे गृहस्थ समाजांतील एक प्रतिष्ठित गृहस्थ आहेत. आपल्या राष्ट्रांतील ज्या स्त्रीपुरुषांना उत्कृष्ट प्रकारच्या शिक्षणाचा लाभ झाला आहे आणि राष्ट्राचें हित लक्षांत घेऊन जे विचार व आचार करतील अशी आशा आहे, त्यांच्याकडून राष्ट्र अधिक चांगल्या गोष्टींची अपेक्षा राखणारच. आमच्यामध्यें नैतिक सामाजिक, आर्थिक आणि राजकीय बाबतींत अनेक अनाचार चालू आहेत. त्यांचा चिकाटीनें अभ्यास झाला पाहिजे, निरलसपणें संशोधन झालें पाहिजे, ते हळुवारपणें हाताळले पाहिजेत, त्यांच्याविषयीं विधानें करतांना बिनचूकपणा राखला पाहिजे, आपले विचार स्वच्छ, स्पष्ट ठेवले पाहिजेत, तसेंच आपले निर्णय शांतपणें व निःस्पृहपणें केले पाहिजेत. इतक्या उपरहि आपल्यांत दोन ध्रुवांइतकें अंतर पडलें तर पडो बापडें ! पण सत्य काय आहे हें परिश्रमानें शोधून काढून कांही झालें तरी त्या सत्याला जर आपण चिकटून राहिलों नाहीं, तर आपण देशाची, धर्माची आणि राष्ट्रकार्याची हानि करूं यांत तिळमात्र संशय नाहीं.

---

# लहान मुलींची लग्नकहाणी : २३

बंगालहून एक हिंदु महिला लिहिते:—

आपल्या हिंदु समाजांतील लग्न झालेल्या गरीब बिचाऱ्या लहान मुलींच्या वतीने आपण जे बोलत आहां त्याबद्दल आपले कसे आभार मानावे हे मला समजत नाही. मद्रासमधील घटना ही एकच अशी घटना नाही. एक वर्षापूर्वी कलकत्त्यांत असेच एक उदाहरण घडले. ती मुलगी फक्त १० वर्षांची होती. आपल्या नवऱ्याबरोबर दोन रात्र राहिल्यानंतर त्याच्याकडे जाण्याचे तिने साफ नाकारले. पण एके दिवशी त्या माणसाला विडा देण्याच्या निमित्ताने तिच्या आईने तिला पाठविले. त्या बिचाऱ्या मुलीला वाटलें असावे की विडा देऊ आणि चट्‌दिशी निघून येऊ. पण त्या गृहस्थाने दार बंद करून टाकलें, आणि तिला बाहेर पडता येईना. काही वेळाने आतून केविलवाणे कण्हणे ऐकू येऊ लागले. मुलीची आई लगेच खोलीकडे धावली. दार उघडताच काय दिसले ? मुलगी मरून पडली होती "नवऱ्यानें" इतकें बेदमपणे तिच्या डोक्यावर मारले होते !

त्या माणसावर खटला झाला आणि त्याला फाशीची शिक्षा झाली. अशा नमुन्याची किती उदाहरणे आपल्या समाजात घडत असतील कोण जाणे ? वयात येईपर्यंत आपल्या नवऱ्यापासून दूर राहण्याची धडपड करणाऱ्या लहान पोरींची अशी कित्येक उदाहरणे मला स्वतःला माहीत आहेत. त्यांच्या वतीने कोण बोलणार ? आपल्या स्त्रिया निमुटपणे आपली भाराभर दुःखे सहन करतात. कसल्याहि अन्यायाचा प्रतिकार करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी राहिलेले नाही. आणि पुरुष मात्र अमर्याद सत्ता हाती असल्यानें आपल्या सुखापलीकडे कधीच बघत नाहीत. बिचाऱ्या बायकांचे काय होत असेल याची थोडी देखील त्यांना पर्वा नसते.

माझ्या ओळखीच्या एका ब्राम्हण बाईचे लग्न दहाव्या वर्षी झालें. ती नवऱ्याकडे जाईना. तेव्हा नवऱ्याने दुसऱ्या एका मोठ्या वयाच्या स्त्रीशी लग्न केले. ही गरीब बिचारी बाई आतां भर तारुण्यांत आपल्या बापाच्या घरी राहात असते. एका मैत्रिणीकडून मला असे समजते की, खेड्यामध्ये खालच्या वर्गातील लोकात नवरे आपल्या अल्पवयी बायकाना वरचेवर मारतात. कारण त्या नेहमी त्यांच्यापासून दूर दूर राहू पाहातात. रात्री खोलीत त्याना अगदी ढकलून घालवावे लागते.

अशा दुःखिताना आपली कहाणी सांगण्याची जोपर्यंत सधी नाही, धैर्य नाही, तोपर्यंत बालविवाहाच्या राक्षसी रूढीचे समर्थन करणं सोपे आहे.

पत्रलेखिकेनें जें वर्णन येथें दिलें आहे तें वस्तुस्थितीला धरून असो किंवा थोडें अतिशयोक्तीचें असो, त्यांतील तात्पर्य निःसंशय सत्य आहे. त्याच्या आधारासाठी पुरावा शोधावयास जाण्याची गरज नाहीं. माझ्या माहितीचे एक डॉक्टर आहेत. त्यांचा धंदा उत्तम चालला आहे. ते प्रौढ वयाचे विधुर गृहस्थ आहेत. त्यांनी त्यांना मुलगी शोभेल अशा एका मुलीशी लग्न केलें होतें. 'नवरा बायको' म्हणून तीं एकत्र नांदत होती. दुसरें एक उदाहरण एका साठ वर्षे वयाच्या शिक्षणतज्ज्ञाचें आहे. तेहि विधुर होते. त्यांनीं नऊ वर्षांच्या पोरीशीं लग्न केलें. सर्वांना ही गोष्ट माहीत होती. आणि तें निंद्य आहे हेंहि सर्वजण जाणत होते. तरी ते गृहस्थ इन्स्पेक्टरच्या जागेवर तसेच राहिले, आणि बाह्यतः सरकार आणि जनता दोघांच्याहि आदराला पात्र झाले. अशीं अनेक उदाहरणें आठवण करून काढून दाखवितां येतील 'कसल्याहि दुष्कृत्याशीं झुंजण्याकरितां लागणारी प्रतिकारशक्तीच हिंदुस्थानच्या स्त्रियांत राहिलेली नाहीं, असें पत्रलेखिका म्हणते तें बरोबर आहे. अशी स्थिति होण्याला पुरुषच मुख्यतः कारणीभूत आहेत यांत शंका नाहीं. पण सदोदित पुरुषांवर दोष टाकून स्त्रियांना कानांवर हात

ठेवतां येतील काय ? स्त्रियांतील सुविद्य भगिनींनीं सुधारणा घडवून आणण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेणें हें त्यांचें आपल्या जातीसंबंधींचें त्याचप्रमाणें पुरुषांची माता या नात्यानेंहि कर्तव्य ठरत नाही काय ? लग्न झाल्यानंतर नवऱ्यांच्या हातांतील बाहुल्या बनून भावी काळांत खुरट्या होणाऱ्या प्रजेला वाढविण्याच्या कामीं जर त्या अकालींच गुंतणार असतील तर त्या घेत असलेल्या शिक्षणाची किंमत ती काय ? स्त्रियांना मताधिकार मिळावा यासाठीं त्यांनीं खुशाल भांडावें. त्याला कांही वेळ खर्च होत नाहीं, कष्ट पडत नाहींत. वरी आपली निपरुद्रवी करमणूक असते ती ! पण बाळपणींच लग्न झालेल्या मुलींच्यामध्यें आणि बालविधवांमध्यें काम करणाऱ्या शूर महिला आहेत कोठें ? अल्प वयांत मुलींचीं लग्नें होणें असंभवनीय होईपर्यंत, 'आपण सज्ञान झालों नाहीं आणि आपला जोडीदार निवडण्याचा अखेरचा अधिकार आपल्याकडे आला नाहीं तोंवर आपण लग्न करणार नाहीं' असें म्हणण्याचें बळ प्रत्येक मुलींत येईपर्यंत, स्वतः दम न घेणाऱ्या आणि पुरुषांनाहि घेऊं न देणाऱ्या चिकाटीच्या कार्यकर्त्या स्त्रिया आहेत कोठें ?

---

## बाल-विवाहाची भयानकता : २४

बालविवाहप्रतिबंधक कमिटीनें बालविवाहावर एक उपयुक्त व उद्बोधक पत्रक प्रसिद्ध केलें आहे. त्यांतील मुख्य मुख्य भाग मी खालीं देत आहें:—

१९३१ सालच्या हिंदुस्थानच्या खानेसुमारी अहवालांत १५ वर्षांखालील लग्न झालेल्या मुलींचे वयाप्रमाणे गट करून त्या प्रत्येकाची संख्या किती आहे याचे आंकडे दिले आहेतः—

| वयाचा गट | विवाहितांचें शेंकडा प्रमाण. |
|---|---|
| ० ते १ | ८ |
| १ – २ | १२ |
| २ – ३ | २·० |
| ३ – ४ | ४२ |
| ४ – ५ | ६·६ |
| ५ – १० | १९ ३ |
| १० – १५ | ३८·१ |

म्हणजे एक वर्षाखालच्या दर १०० मुलींत जवळ जवळ एक मुलगी लग्न झालेली आहे, आणि तीच भयानक गोष्ट १५ वर्षांखालील वयांच्या इतर गटांतहि घडलेली आहे.

याचा परिणाम म्हणजे कोणाला खरेंसुद्धां वाटणार नाहीं इतकी देशांत वाढलेली बालविधवांची संख्या होय. त्याचे आंकडे—

| वयाचा गट | विधवांची प्रत्यक्ष संख्या |
|---|---|
| ० ते १ | १५१५ |
| १ – २ | १७८५ |
| २ – ३ | ३४८५ |
| ३ – ४ | ९०७६ |
| ४ – ५ | १५०१९ |
| ५ – १० | १०५४८२ |
| १० – १५ | १८५३३९ |

बालविवाहाचे पाप सख्येच्या दृष्टीने कमी आहे आणि ही चाल कांहीं सर्वत्र नाही असे नेहमी म्हटले जाते. पण वरील आकड्यात दिसून येत असलेली बालविधवाची सख्या प्रत्यक्ष आंकड्यांच्या एक शतांश जरी असली तरी, अतःकरणांत दयाबुद्धि असणारी जनता किंवा सरकार या दुर्दशेच्या मूळ कारणाला आळा घातल्यावाचून एक क्षणभरहि राहणार नाहीं. या बाबतीत हेहि लक्षात घेतले पाहिजे की यातील बहुतेक पोरींचे पुन्हां लग्न होणे अशक्य असते.

बालविवाहाचा दुसरा एक परिणाम म्हणजे बाळतपणांतच मृत्यु पावणाऱ्या तरुण आयांची सख्या होय. दर वर्षी बाळतपणांत होणारी २००००० मरणसख्या ही हिंदुस्थानची वर्षाची सरासरी आहे. म्हणजे तासाला २० मरणसख्या पडते, आणि यांपैकी पुष्कळसे मृत्यू विशीच्या आंतल्या मुलींचे असतात. सर जॉन मेगॉ यांच्या मताने एक हजार तरुण आयांतून शभर आया मूल होण्याचे वय सपण्यापूर्वी बाळतपणात मरायच्या हे ठरलेलेच. मूल होऊन किती मरतात या सख्येचा बरोबर आंकडा आमचेकडे नाही. हिंदुस्थानांत ही सख्या दर हजारी अदमासे २४.५ आहे, तर इंग्लडची ४.५ आहे.

शेवटचा मुद्दा असा की बालविवाहाचा वाईट परिणाम आईवरच होतो असे नाही तर मुलांवरहि होतो. म्हणजेच मनुष्यजातीवर होतो. हिंदुस्थानांत उपजलेल्या दर एक हजार मुलांत १८१ मुले मरतात. ही सरासरी सख्या आहे. हिंदुस्थानांत अशीं कांहीं ठिकाणें आहेत कीं तेथील सरासरी बालमृत्यु-

संख्या दर हजारी ४०० पर्यंत जाते. इंग्लंडमधील व जपानमधील बालमृत्यूचें दर हजारी प्रमाण अनुक्रमे ६० व १२४ असे आहे. हिंदुस्थानच्या बालमृत्यूच्या संख्येशी तुलना करता हिंदुस्थान या बाबतीत किती मागासलेला आहे ते उघड दिसून येते. बालविवाहाची दुष्ट चाल थांबवितां येण्याजोगी आहे, आणि समाजाच्या विवेकबुद्धीला या बाबतीत शिक्षण मिळाले नसल्या मुळे ही चाल अनिर्बंधपणे वाढत राहिली आहे हे लक्षांत घेतले म्हणजे या गोष्टीचा भयंकरपणा खरोखर फारच मोठा वाटू लागतो.

सर्वांत वाईट वाटण्याजोगी गोष्ट कोणती असेल तर ती ही की या सर्व बाबतीत प्रगति जरी चालू असली तरी ती अगदी गोगलगाईच्या पावलांनी चालली आहे. उदाहरणार्थ १९२१ साली १ वर्ष वयाखालील लग्न झालेल्या मुलींची संख्या ९०६६ होती, १९३१ मध्ये ती ४४०८२ म्हणजे जवळ जवळ ५ पटींने वाढली, आणि लोकसंख्या मात्र एक दशांशच वाढली. १९२१ मध्ये १ वर्ष वयाखालील विधवांची संख्या ७५९ होती ती १९३१ मध्ये १५१५ झाली. त्यानंतर वरचेवर झालेल्या खानेसुमारीच्या अहवालावरून सुधारणा किती सूक्ष्म प्रमाणांत आहे तें दिसून येते. ही दुःस्थिति सुधारण्याचे उपाय ज्या प्रमाणात वाढत आहेत त्यापेक्षा लोकसंख्या फारच झपाट्याने वाढत आहे. म्हणून या दुःस्थितीचे समूळ उच्चाटन करण्याकरता जोराने कामाला लागले पाहिजे असे सांगणे पूर्वी कधी नव्हते इतके आज अगत्याचे झाले आहे. हिंदुस्थानातील स्त्रियांच्या चळवळीपुढे जनतेची व सरकारची विवेकबुद्धि या बाबतीत जागृत करण्याहून अधिक उच्च किंवा निकडीचे दुसरे कोणतेहि कार्य असू शकत नाही.

वर दिलेले आंकडे पाहून लज्जेनें आपली मान खालीं झाली पाहिजे. पण त्यामुळें कांहीं ही दुःस्थिति सुधारणार नाहीं. बालविवाहाची दुष्ट चाल तरी निदान जितकी शहरांत पसरलेली आहे तितकीच खेड्यांतहि आहे. हें मुख्यत्वेंकरून स्त्रियांचेंच काम आहे. पुरुषांनीं अर्थात् आपला वांटा उचललाच पाहिजे. पण पुरुष जेव्हां पशु बनतो तेव्हां त्याला समजून सांगून तो ऐकेल अशी स्थिति नसते. तुमचे

हे विशेष अधिकार आहेत व तुम्ही पुरुषाशीं संबंध ठेवण्याला नकार देणें तुमचें कर्तव्य आहे ही गोष्ट आयांनांच शिकवली पाहिजे आणि हें शिक्षण त्यांना स्त्रियांवांचून दुसरें कोण देणार ?

....अत्यंत आवश्यक गोष्ट म्हणजे खेड्यांतील बायकांशीं वैयक्तिक संबंध बांधला पाहिजे. जरी कधींकाळीं तसा संबंध बांधला गेला तरी पुढचें काम कांहीं सोपें नाहीं. पण केव्हां ना केव्हांतरी या दिशेनें प्रयत्नाला प्रारंभ तर केला पाहिजे, त्याशिवाय परिणामाची आशा कशी धरतां येईल ? ग्रामसेवक वा सेविका यांच्यांत किती जरी कर्तृत्व असलें तरी त्यांनीं केवळ सामाजिक सुधारणा करण्याच्या हेतूनेंच खेडेगांवांत जाऊं नये. ग्रामजीवनाच्या सर्व क्षेत्रांत त्यांना प्रवेश करावा लागेल. ग्रामसेवा म्हणजे केवळ लिहावाचावयास शिकविणें नव्हे तर माणूस हा एक विचारशील प्राणी आहे हें लक्षांत घेऊन विचारशील प्राण्याला शोभेल अशा खऱ्या जीवनाच्या गरजा काय आहेत हें त्यांना समजून देण्याच्या दृष्टीनें त्यांच्या बुद्धीची द्वारें उघडीं करणारें खरें शिक्षण त्यांना दिलें पाहिजे. हें मी पुन्हां एकदां सांगतों.



# वाहती जखम : २५

लहान मुलींचीं म्हाताऱ्यांशीं लग्नें होतात त्याबाबतींत सोलापूरहून एक माहेश्वरी तरुण गृहस्थ लिहितात:—

आमच्या माहेश्वरी ज्ञातींतील गृहजीवन खरोखर छिन्नभिन्न झाले आहे. दरवर्षी आमच्या ज्ञातीचे शेकडो जख्खड म्हातारे आपली भोगलालसा तृप्त करून घेण्याकरितां वाटेल तसा पैसा ओतून लहान पोरी मिळवितात. याचा परिणाम असा झाला आहे की आमची ज्ञाति झपाट्याने दुराचाराचे आणि नरकाचे कुड बनत चालली आहे. बालविवाह आणि विजोड विवाह ही सर्रास सुरू झाली आहेत. ज्या ज्ञातींतील गृहस्थजीवन इतके बिघडलेले आणि कुजलेले आहे अशा ज्ञातीत देशाला शोभतील असे सुपुत्र जन्माला यावेत अशी अपेक्षा करणे व्यर्थ आहे. वेळीच जर कांहीं उपाय केला नाही तर खरोखर भविष्यकाळ काळाकुट्ट दिसतो.

येथील बारा एक तरुणांनी या दुष्ट प्रवृत्तीला आळा घालण्याकरितां चळवळ सुरू केली आहे. त्यांनी बालविवाहाच्या आणि विजोड विवाहाच्या प्रतिबधासाठी एक सघ काढला आहे. अशा अनिष्ट विवाहाच्या प्रसगी आम्ही सत्याग्रह करण्याचे योजिले आहे. आणि आमची खात्री आहे की तो परिणामकारक झाल्यावांचून राहणार नाही. माहेश्वरी लग्नाच्या बाबतीत कोणते विधी आणि समारभ केले जातात ते आपल्याला माहीतच आहेत. या बाबतींत सर्वोत्कृष्ट प्रकारे शांतियुक्त सत्याग्रह कसा करतां येईल ते आपण कृपा करून सांगाल काय ?

आपल्या मतानें लग्नाच्या वेळी वधूच्या आणि वराच्या वयाची मर्यादा काय असावी ? आणि विजोड विवाहांना प्रतिबध करण्याकरिता सत्याग्रह करायचा तो कोणत्या परिस्थितींत करावा ?

परवांच पंचावन्न आणि साठ वयाच्या दोन म्हाताऱ्यांनीं बारा बारा वर्षे वयाच्या मुलींशीं लग्नें लावलीं. याच खेड्यांत थोड्याच दिवसांत इतकींच अघोर लग्नें होणार आहेत. हीं लग्ने होऊं नयेत यासाठीं आम्ही छापील पत्रके वांटून चळवळीला अगोदरच सुरवात केली आहे. पण आम्हांला वाटते की जरूर आहे ती कांहीं तरी जबरदस्त कृति करण्याची, निव्वळ पोकळ प्रचाराने कांहीं होणार नाही. या सर्व मुद्यांच्या बाबतींत आपले मत काय आहे ते आम्हांला कळेल का ?

अशा प्रकारच्या बाबींत सत्याग्रह ही रास्त वस्तु आहे यांत शंका नाहीं. पण तो करायचा कसा हा निराळा मुद्दा आहे. माझ्या लेखांमधून मी अनेक वेळां सत्याग्रहाच्या मर्यादांविषयीं सविस्तर सांगितलें आहे. सत्याग्रह म्हटला कीं स्वतःच स्वतःला शिस्त लावून घेणें, आत्मसंयमन, आत्मशुद्धि आणि जी व्यक्ति सत्याग्रह करणार तिचा सर्वमान्य सामाजिक दर्जा इतक्या गोष्टी गृहीतच धरल्या जातात. सत्याग्रहीनें दुष्कृत्य आणि दुष्कृत्य करणारा यांमधील फरक कधींहि विसरतां कामा नये. दुष्कृत्य करणाऱ्याविषयीं त्यानें आपल्या मनांत वैरभावाला किंवा अदावतीला थारा देतां कामा नये. त्याचें दुष्कर्म जरी कधी झालें नाहीं तरी त्याच्याविषयीं लागेल अशी भाषाहि त्यानें निष्कारण वापरूं नये. कारण सत्याग्रहीची अशी श्रद्धा असली पाहिजे कीं या जगांत प्रेमानें बदलतां येणार नाहीं इतकें पतित कोणीच नाहीं. सत्याग्रही हा नेहमीं सत्कर्मानें दुष्कर्माला, प्रेमानें क्रोधाला, सत्यानें असत्याला, अहिंसेनें हिंसेला जिंकण्याचा प्रयत्न करील. जगांतून पाप नाहींसें करून त्याला शुद्ध करण्याचा दुसरा मार्ग नाहीं. म्हणून स्वतःला सत्याग्रही म्हणविणारा इसम अगदीं बारकाईनें आणि प्रार्थनायुक्त बुद्धीनें केलेल्या आत्मनिरीक्षणानें आणि आत्मविश्लेषणानें, आपण स्वतः क्रोधाच्या दोषापासून, द्वेषापासून आणि अशाच इतर मानवी दोषांपासून मुक्त आहोंत का, ज्या पापांविरुद्ध

आपण मोहीम सुरू करायला निघालों आहोंत तींच पापें आपल्या-कडून घडण्याचा संभव आहे कीं नाहीं, हें शोधून काढण्याचा नेहमीं प्रयत्न करील. आत्मशुद्धि आणि तपश्चर्या यांतच सत्याग्रहाचा अर्धा विजय आहे. सत्याग्रहीची श्रद्धा असते कीं सत्याच्या आणि प्रेमाच्या मूक व गुप्त क्रियेनें जितके टिकाऊ परिणाम घडतात तितके भाषणांनीं किंवा तशाच इतर गोष्टींनीं घडत नाहींत.

पण जरी सत्याग्रह मूकपणें काम करीत असला तरी सत्याग्रह्या-कडून कांहींना कांहीं क्रिया घडण्याची आवश्यकता असते. उदाह-रणार्थ, सत्याग्रह्यानें प्रथम खोल आणि व्यापक चळवळ करून जें पाप त्याला नाहींसें करावयाचें आहे, त्याच्या विरुद्ध लोकमत संघटित केलें पाहिजे. एखाद्या सामाजिक दुष्ट व्यवहाराविरुद्ध लोकमत जेव्हां पुरेसें जागृत होतें, तेव्हां अगदीं सर्वोच्च म्हणून समजल्या गेलेल्या माणसाचीसुद्धां तो व्यवहार करण्याची किंवा त्याला पाठिंबा देण्याची छाती होत नाहीं. जागृत आणि सुज्ञ लोकमत हें सत्याग्रहाचें अत्यंत शक्तिशाली अस्त्र आहे. सर्व लोकांच्या एकमताला सर्वस्वीं धाब्यावर बसवून जेव्हां एखादा इसम सामाजिक दुष्कर्माला पाठिंबा देतो, तेव्हां सामाजिक बहिष्कार घालण्यास तो पात्र आहे यांचेंच तें निदर्शक आहे. पण सामाजिक बहिष्काराचा हेतु कधींच बहिष्कृ-ताला इजा करण्याचा असूं नये. सामाजिक बहिष्कार म्हणजे अपराधी व्यक्तीशीं समाजानें केलेला संपूर्ण असहकार; याहून कमीहि नाहीं, जास्तहि नाहीं. यांतील कल्पना अशी आहे कीं जो इसम जाणून बुजून समाजाला उडवून लावतो त्याला समाजाकडून सेवा घेण्याचा कांहीं अधिकार राहात नाहीं. प्रत्यक्ष परिणामाच्या दृष्टीनें हें एवढें पुरें व्हावें. अर्थात् विशिष्ट बाबतींत विशिष्ट उपाय सांगतां

येतील, आणि प्रत्येक व्यक्तिगत बाबतीच्या विशिष्ट स्वरुपाला साजेसे, आचार बदलावे लागतील.

पण जरठपणा आलेला असतांनासुद्धां ज्याला इंद्रियलालसा सोडवत नाहीं अशा सुखलोलुप वृद्धाच्या बाबतींत काय उपाय? इंद्रियलालसा ही आंधळी आहे, तिला विवेक नसतो. कशीहि आणि कशाचाहि बळी देऊन आपली तृप्ति करावयाला ती पहात असते. अशा मनुष्याशीं समाजानें कसें वागावें? त्याचें उत्तर असें कीं समाजानें त्याला असे दुर्दैवी बळी घेऊं देऊं नयेत. मुलीचें वय वीस वर्षांच्या खालचें असेल आणि तिची इच्छा नसेल तर तिचा विवाह करावयाचा नाहीं हा नियम कडकपणें अंमलांत आणला जावा. जर कोणीहि मुलगी स्वेच्छेनें वृद्धाशीं लग्न करण्याला तयार नसेल तर त्या वृद्धानें काय करावें, असा प्रश्न सहजच उद्भवतो. समाजाजवळ त्या प्रश्नाला उत्तर नाहीं. तें द्यायला समाज बांधलेलाहि नाहीं. आंधळ्या भोगलालसेला बळी जाण्यापासून अभागी मुलींना कसें वांचवावें एवढ्याचाच विचार समाजानें करावयाचा आहे, भोगलालसेची तृप्ति करण्याकरितां साधनें पुरविणें हें समाजाचें कर्तव्य नाहीं. तथापि, व्यवहारांत असें दिसून येईल कीं सामाजिक वातावरणांत जेव्हां शुद्धता भरून जाते तेव्हां भोगलोलुप मनुष्याची लोलुपता त्यामुळें पुष्कळशी शमून जाण्याला मदत होते.

---

# खरी विधवा : २६

स्वखुषीनें पाळलेलें वैधव्य ही हिंदुधर्माची प्रसादी आहे; सक्तीनें लादलेलें वैधव्य हा शाप आहे .... ....

स्वखुषीनें पत्करलेलें ज्ञानमय वैधव्य हा कोणत्याहि राष्ट्राचा मोठा ठेवा आहे; आणि लादलेलें ज्ञानशून्य वैधव्य हा त्या राष्ट्राला कालिमा आहे. .... ....

हिंदुधर्मांतील ' विधवा ' या शब्दाच्या भोंवतीं एक पवित्र सुगंधाचें वलय आहे. कै. रमाबाई रानडे यांच्यासारख्या विधवेचा मी पुजारी आहे. विधवा होणें म्हणजे काय हें त्या जाणत होत्या. . . .

हिंदुधर्मांत विधवेला एक पवित्र स्थान आहे. पण आज हिंदु विधवेची जी करुणास्पद दशा दिसून येते तशी ती प्राचीनकाळीं कधींहि नव्हती. .... ....

खरी हिंदु विधवा हा एक मोठा ठेवा आहे, असें मी निश्चयपूर्वक मानतों. मानवसमाजाला हिंदुधर्माची ती देणगी आहे. रमाबाई रानडे ही अशीच देणगी होती. .... ....

आपल्या जीवनसहचराच्या ममतेचा ज्या स्त्रीनें अनुभव घेतला आहे त्या स्त्रीनें ज्ञानपूर्वक खुषीनें पाळलेलें वैधव्य जीवनाला शोभा आणि प्रतिष्ठा प्राप्त करून देतें, घराचें पावित्र्य वाढवितें आणि खुद्द धर्माला उन्नत करतें. .... ....

---

## सक्तीचें वैधव्य : २७

.... 'गाईचें रक्षण करा' असें धर्माच्या नांवानें आम्ही ओरडून सांगतों. पण बालविधवेच्या स्वरूपांत असलेल्या मानवी गाईला रक्षण देण्याचें मात्र आम्ही नाकारतों. धर्माच्या बाबतींत आम्ही बळाची मदत घेतों. पण ज्यांना विवाहविधीचें महत्व कळण्याची ताकद नाहीं अशा तीन लाख बालविधवांच्यावर आम्ही धर्माच्या नांवानें वैधव्य लादीत असतों. लहान लहान पोरींवर वैधव्य लादणें हा अत्यंत मोठा गुन्हा आहे आणि जबर किंमत देऊन आम्ही हिंदु तो रोजच्यारोज निस्तरतों आहों. आमची विवेकबुद्धि खरोखर जागृत झाली असेल तर १९ वर्षांच्या खालीं एकहि लग्न होणार नाहीं. मग वैधव्य तर दूरच. आणि तीन लाख मुलींचा धर्मदृष्टचा विवाहच मुळीं झाला नाहीं असेंच आम्ही मानूं. असल्या वैधव्याला कोणत्याहि धर्मशास्त्रांत आधार नाहीं. आपल्या जीवनसहचराच्या प्रीतीचा ज्या स्त्रीनें अनुभव घेतला आहे तिनें ज्ञानपूर्वक खुषीनें पाळलेलें वैधव्य जीवनाला शोभा आणि प्रतिष्ठा देतें, घराचें पावित्र्य वाढवितें आणि खुद्द धर्माला उन्नत करतें. धर्मानें किंवा रूढीनें लादलेलें वैधव्य म्हणजे मानेवरील असह्य जोखड आहे. गुप्तपणानें केलेल्या पापाचरणामुळें तें घराला दूषित करतें आणि धर्माला कमीपणा आणतें.

आणि ५० वर वय झालेले म्हातारे व व्याधिग्रस्त पुरुष लहान पोरींना बायका म्हणून पत्करतात, नव्हे खरेदी करतात, आणि केव्हां

केव्हां एकीच्या डोकीवर दुसरी आणतात हें लक्षांत घेतलें तर हें हिंदुधर्मांतील वैधव्य चीड उत्पन्न करण्याजोगें वाटत नाहीं काय? आमच्या समाजांत जोंवर हजारों विधवा नांदत आहेत, तोंवर आपण जळत्या ज्वालामुखीच्या तोंडावरच बसल्यासारखे आहोंत. कोणत्याहि क्षणीं त्याचा स्फोट होईल. आपण जर शुद्ध असूं, आपण हिंदु-धर्माचा बचाव करण्याची इच्छा बाळगीत असूं तर सक्तीच्या वैधव्याचें हें विष काढून टाकण्याखेरीज आपल्याला गत्यंतर नाहीं. जे बालविधवांचे पालक असतील त्यांनीं दृढ धैर्य धरून आपल्या ताब्यांत असलेल्या बालविधवांचा योग्य आणि उत्तम प्रकारें विवाह—पुनर्विवाह नव्हे, कारण त्यांचा पूर्वी खरोखर विवाह झालाच नव्हता—करून देऊन या सुधारणेला सुरवात केली पाहिजे.

---

# 'सती' आणि सक्तीचें वैधव्य : २८

ज्युलिअस सीझरच्या काळी होऊन गेलेल्या सिसिलीच्या डिओडोरस नांवाच्या ग्रंथकारानें लिहिलेल्या विश्वेतिहासावरील निबंधांतून ' सती ' आणि वैधव्य यावरील एक बोधप्रद उतारा प्यारेलाल यांनीं प्रकाशित केला आहे. तो पुढीलप्रमाणें:—

हिंदुस्थानांतील लोकात असा एक प्राचीन कायदा होता की, तरुण—तरुणींना विवाहबद्ध होण्याची इच्छा झाली असतां ते आईबापाच्या निवडी प्रमाणे लग्न न करता परस्परांच्या समतीने करीत. पण जेव्हां अपरिपक्व वयाच्या व्यक्तींमध्ये वाग्दान होई तेव्हा परीक्षणात चुका पुष्कळ वेळा घडत, आणि दोन्ही पक्षाना लग्नाविषयी पश्चाताप वाटे, तेव्हा पुष्कळ स्त्रिया भ्रष्ट होत, आणि व्यभिचार करून परपुरुषावर प्रेम करू लागत; आणि शेवटी जेव्हां प्रथम परात केलेल्या पतींना सोडण्याची त्यांना इच्छा होई पण शिष्टाचारामुळे उघडपणे ते करतां येत नसे, तेव्हां विषाचा उपयोग करून त्यांचा कांटा त्या काढीत; हे विष प्राणघातक असे, ते त्याना त्याच्या देशांत ताबडतोब मिळे; अत्यत घातुक शक्तीची औषधें मोठ्या प्रमाणांत व वेगवेगळ्या प्रकारची त्या देशात तयार होतात. यातली कांहीं औषधें अशी आहेत की, त्याची पूड जरी अन्नात किंवा पाण्यात मिसळून पोटात गेली तरी मरण ठेवलेलेंच. पण हा अघोर व्यवहार जेव्हा अगदी सार्वत्रिक झाला, पुष्कळ जीवाचे बळी पडले, आणि अपराध्याला शासन करूनसुद्धां इतर बायकांना या पापाचरणापासून परावृत्त करण्यात यश येत नाही असे आढळून आलें, तेव्हां एक कायदा करण्यात आला की बायको जर गरोदर नसेल किंवा तिला मुले झालेली नसतील तर मृतपतीच्या बरोबर तिला जाळून टाकावे,

आणि, जर ती हा कायदा पाळायला तयार नसेल तर, तिनें आमरण विधवा म्हणून राहावें, तिला अशुद्ध समजून यज्ञकर्मांतून आणि इतर धर्मविधींतून कायमचें बहिष्कृत करावे.

'सती' आणि वैधव्य या दोन अमानुष चालींचें मूळ म्हणून दिलेलें हें वर्णन जर खरें असेल, तर 'सती'ची चाल बंद करणाऱ्या जबरदस्तीनें आमच्यावर लादलेल्या कायद्याबद्दल ईश्वराचे आम्ही आभारच मानले पाहिजेत. पण ज्यांना लग्न म्हणजे काय हें समजतहि नाहीं अशा मुलींवर लादण्यात येणाऱ्या वैधव्याच्या रोगापासून हिंदु समाजाची मुक्तता अशा बाहेरच्या सक्तीनें होऊं शकणार नाहीं. ही सुधारणा हिंदूमध्येंच लोकमत सज्ञान करून त्याच्या जोरावर अंमलांत येऊं शकेल. दुसरें म्हणजे आईबापांनीं आपल्या विधवा मुलींचें लग्न करून देणें हें आपलें कर्तव्य मानल्यानें ती होऊ शकेल. या गोष्टीला मुलींची संमति मिळत नसेल, तेथें त्यांनीं लग्न करणें हें कसें बरोबर आहे याचें शिक्षण त्यांना देऊन ही गोष्ट त्यांना करतां येईल. अर्थात् हें अज्ञान मुलींसंबंधीं लिहिलें. जेथें विधवा म्हटल्या जाणाऱ्या स्त्रिया सज्ञान असतील आणि लग्न करण्याची त्यांना इच्छा नसेल तेथें 'तुम्ही अविवाहित कुमारिका असल्याप्रमाणेंच तंतोतंत विवाह करण्याला मोकळ्या आहात' एवढें सांगण्यापलीकडे कांहीं करण्याची आवश्यकता नाहीं. बंदिवान आपल्या बेड्यांना भूषणें समजून त्या उराशीं कवटाळून धरतो, तेव्हां त्या बेड्या तोडणें फार कठीण असतें. मुली आणि प्रौढ स्त्रियासुद्धा नाहीं का आपल्या रुपेरी आणि सोनेरी बेड्यांना आणि चुडयांना दागिने म्हणून समजत ?

---

# दडपलेला मानवसमाज : २९

अस्पृश्यवर्ग हाच एक मानवसमाजांतील दडपला गेलेला भाग नसून हिंदु समाजांतील तरुण विधवा हीदेखील यांतच मोडते. बंगालहून एक गृहस्थ लिहितातः—

विधवांच्या पुनर्विवाहाला मुसलमान समाजांत विरोध नाही खरा, पण मुसलमानाना चारपर्यंत बायका करण्याची सवड ठेवलेली आहे. आणि खरोखर बहुतेक मुसलमानांच्या एकाहून अधिक बायका असतातहि त्यामुळें मुसलमान समाजांतील पुरुषवर्गांत कोणीहि अविवाहित रहात नाही. यावरून जेथे विधवापुनर्विवाहाला बंदी नाही तेथे स्त्रियांची संख्या पुरुषापेक्षां पुष्कळच अधिक असते हे सिद्ध होत नाही काय ? याचाच अर्थ ज्या जातीमध्ये विधवापुनर्विवाहाला मुभा दिली आहे त्या जातीत अनेक बायका करण्याची मुभाहि दिली गेली पाहिजे हे सिद्ध होत नाही काय ?

विधवापुनर्विवाह हिंदु समाजांत रूढ केला तर तरुण विधवा तरुण मुलांना आपल्याशीं विवाह करावयाला प्रवृत्त करतील आणि अविवाहित मुलींच्यासाठी नवरे शोधणें अवघड किंबहुना अशक्यप्राय होणार नाही काय?

जर हिंदूंनी एकापेक्षां अधिक बायका कराव्यात अशी तरतूद करून ठेवली नाही तर विधवांच्या हातून जे दोष घडतात किंवा घडतात असें समजले जातें, ते दोष अविवाहित मुलींच्या हातूनहि मग घडणार नाहींत काय ?

विधवा-पुनर्विवाहाची शिफारस करतांना प्रेम, सोज्वळ, गृहस्थजीवन, पातिव्रताधर्म अशा पवित्र गोष्टींचा तरी विचार होणें अवश्य आहे, हे मी आपणास सुचवण्याचें कारण नाहींच.

विधवा-पुनर्विवाहाला प्रतिबंध करण्याच्या भरांत पत्रलेखकानें पुष्कळ गोष्टींकडे दुर्लक्ष केलें आहे. मुसलमानांना एकाहून अधिक बायका करण्याचा हक्क आहे खरा. पण पुष्कळसे मुसलमान एक बायको करूनच राहातात. अनेक बायका करण्यास हिंदुधर्मामध्यें दुर्दैवानें बंदी नाहीं हें लेखकाला माहीत नाहींसें दिसतें. उच्चवर्णीय हिंदू अनेक बायका करतात हें सर्वांना माहीतच आहे. पुष्कळ राजे लोकांचीं जी लग्नें होतात त्यांना मर्यादाच नसते. पत्रलेखक पुन्हां हें विसरतो कीं विधवा-पुनर्विवाहाला मनाई आहे ती फक्त उच्च म्हटल्या जाणाऱ्या हिंदूंतच आहे. चवथ्या वर्णांतील बहुजनसमाजांत विधवा स्त्रिया सर्रास पुनर्विवाह करीत असूनहि अनिष्ट असें कांहींहि घडलेलें नाहीं. एकापेक्षा अधिक बायका करण्याची मुभा त्या समाजांत असूनहि साधारणपणें एका वेळेला एकाच बायकोवर ते संतुष्ट असतात.

तरुण विधवा साऱ्या तरुणांना पटकावून बसतील आणि कुमारिकांच्यासाठीं कोणाला शिल्लकच ठेवणार नाहीत अशी शंका घेण्यांत तारतम्याचा खेदकारक अभावच दिसून येतो. तरुणींच्या पावित्र्याविषयीं अवास्तव चिंता लागणें हें रोगट मनोवृत्तीचेंच निदर्शक आहे. कांहीं थोड्या विधवांनीं पुनर्विवाह केल्यानें पुष्कळ तरुणी अविवाहित राहतील असा कांही संभव नाहीं. आणि समजा तसा प्रश्न कधीं निर्माण झालाच तरी तो आज घडणाऱ्या बालविवाहांमुळेंच झाला आहे असें दिसून येईल. बालविवाह बंद करा, आपोआप त्यालाहि आळा बसेल.

कोंवळ्या वयाची विधवा जोंवर अस्तित्वांत आहे, तोंवर प्रेम, गृहस्थजीवनाचें पावित्र्य इत्यादींबद्दल न बोलणेंच बरें.

पण पत्रलेखकाला माझा मुद्दाच समजलेला नाहीं. साऱ्या विधवांचा सर्रास पुनर्विवाह करावा असें मत मी प्रतिपादन केलेलें नाहीं.

१९ वर्षांपर्यंतच्या लहान विधवांविषयींच मी तसें लिहिलें आहे. या दुर्दैवी जीवांना ' पतिव्रताधर्म ' कसा कळावा ? ' प्रेम ' म्हणजे काय हें कसें समजावें ? या मुलींचें लग्न मुळीं झालेंच नाहीं असें म्हणणें सत्याला अधिक धरून होईल. विवाह हा जर एक पवित्र संस्कार असेल, नवजीवनांत प्रवेश करणें असेल ( आणि तसा तो असला पाहिजे, ) तर ज्यांचीं लग्नें व्हावयाचीं त्यांची पूर्ण वाढ झालेली असली पाहिजे. आपला सबंध जीवनाचा साथी निवडण्यांत त्यांचाहि कांहीं हात असला पाहिजे; आणि आपल्या कृतीचे परिणाम काय होतील तें त्यांना कळलें पाहिजे. लहान मुलांमुलींना एकत्र आणून त्याला विवाहाचें नांव द्यावयाचें आणि नवरा म्हटला जाणारा मुलगा मेला कीं त्या मुलीवर वैधव्य लादावयाचें हा ईश्वराचा व मानवाचा घोर अपराध आहे.

खरी हिंदु विधवा हा एक अमोल ठेवा आहे. हें मी निश्चय-पूर्वक मानतों. हिंदुधर्माची मानवसमाजाला ती एक देणगी आहे. रमाबाई रानडे ही अशीच एक देणगी होती. पण लहान पोरींचें वैधव्य हा हिंदुधर्मावर कलंक आहे. एक रमाबाई झाल्या म्हणून कांहीं तो कलंक धुवून निघणार नाहीं.

---

# विधवेचा आक्रोश : ३०

विधवांचा पुनर्विवाह करणें कांहीं मर्यादेपर्यंत आवश्यक आहे. ही सुधारणा आमचे तरुण स्वतःला शुद्ध करतील तेव्हांच अमलांत येणें शक्य आहे. ते शुद्ध आहेत काय! त्यांना मिळत असलेल्या शिक्षणाचा त्यांना कांहीं लाभ होत आहे काय! अथवा त्यांच्या शिक्षणाला कशाला दोष द्या! बालपणापासून पुढें आमच्यांत एक प्रकारची गुलामी मनोवृत्ति चिकाटीनें तयार केली जात असते. आणि जर आपल्याला स्वतंत्रपणें विचार करतां येत नसेल तर आपण स्वतंत्रपणें कृति तरी कशी करूं शकणार? आपण जातीचे, परदेशी शिक्षणाचे तसेच परक्या सरकारचे गुलाम बनलों आहोंत. सरकारनें केलेली आमची प्रत्येक सुखसोयी आमची बेडी बनली आहे. आमच्यामध्यें किती तरी शिक्षित तरुण मंडळी आहेत. त्यांच्यापैकीं किती थोड्यांना आपल्याच घरांतल्या विधवांच्या दुर्दैवी दशेचा विचार येत असेल? त्यांच्यापैकीं किती थोडेजण डबोल्याचा मोह दूर सारीत असतील? किती थोडेजण त्या विधवांना आपल्या मायबहिणी समजून त्यांच्या अब्रूचें रक्षण करीत असतील? किती थोडेजण आपल्या मताविषयीं पक्केपणा बाळगून आपल्या जातीला 'वाटेल तें करा' असें छातीठोकपणें सांगत असतील! बिचाऱ्या विधवेनें कोणाकडे जावें! मी तिचें कसें सांत्वन करूं?.... बालविधवेचा पालक असणाऱ्या प्रत्येकाला माझी प्रार्थना आहे कीं तिचें लग्न करून देणें हें त्यानें आपलें कर्तव्य मानावें.

# आदर्शांची भ्रष्टता : ३१

बालविधवांच्या पुनर्विवाहासंबंधीं आलेल्या एका पत्रांतील उतारा पुढें दिला आहे:—

२३ सप्टेंबरच्या 'यंग इंडिया'मध्ये आपण म्हटले आहे की आईबापांनी आपल्या लहान विधवा मुलींची पुनर्लग्नें करावीत. पण शास्त्राप्रमाणे जे कन्यादानाचा विधी करतात, त्या आईबापांना हे करणे कसे शक्य आहे? ज्या आईबापांनी देवाला स्मरून विधिपूर्वक मुलीवरचे आपले सर्व हक्क सोडून देऊन तिला जांवयाच्या स्वाधीन केली, त्यांना त्या जांवयाच्या मरणानंतर दुसऱ्या इसमाशी तिचा विवाह करून देणे कसे शक्य आहे? तिने वाटलें तर स्वतःच्या मर्जीने पुनर्विवाह करावा पण ज्या अर्थी तिच्या आईबापांनी तिला नवऱ्याला दान म्हणून दिले त्या अर्थी तिच्या नवऱ्याच्या मृत्यूनंतर जगांत कोणालाहि तिचा पुनर्विवाह करून देण्याचा अधिकार नाहीं आणि त्याच कारणाकरितां तिला स्वतःलाहि पुनर्लग्न करण्याचा अधिकार नाहीं. नवऱ्यानें मृत्युसमयीं स्पष्ट संमति दिली नसतांना जर ती पुनः लग्न करील तर अर्थात् ती आपल्या मृतपतीशी बेइमान आणि विश्वासघातकी ठरेल. तेव्हां सनातनी लोकांत रूढ असलेल्या कन्यादानपद्धतीने जिचें लग्न झालें आहे अशा विधवेनें —मग ती बाल असो, तरुण असो वा वृद्ध असो—तिच्या पतीने परवानगी दिली नसेल तर पुनर्विवाह करणे अशक्य आहे. पण खऱ्या सनातनी पतीला अशी परवानगी देण्याची कल्पनाहि सहन होणार नाहीं. त्यापेक्षां आपल्या बायकोनें शक्य असेल तर सती जावें हें तो आनंदानें मान्य करील. निदान आपलें उरलेलें आयुष्य तिनें भक्तिपूर्वक आपल्या चिंतनांत, किंवा देवाच्या भक्तींत—दोन्हींचा अर्थ एकच आहे—घालवावें हें त्याला आवडेल. हिंदु

विवाहाचे आणि वैधव्याचे उच्च आदर्श कायम टिकण्याला मदत व्हावी याच एका इच्छेने वा कर्तव्यभावनेने तो असे करण्याला प्रवृत्त झालेला असतो; हिंदु विवाह आणि वैधव्य हे एकमेकाला पूरक आहेत, ते एकमेकापासून स्वतंत्र नाहीत.

अशा प्रकारचा युक्तिवाद म्हणजे एका उच्च आदर्शाला भ्रष्टविणें आहे असें मी म्हणतों. पत्रलेखकाच्या मनांत सद्धेतु आहे यांत शंका नाहीं. पण स्त्रियांचें पावित्र्य कायम राहावें याविषयीं त्याला अवास्तव चिंता वाटत असल्यामुळेंच त्याला साधा न्याय दिसत नाहींसा झाला आहे. लहान पोरांच्या बाबतींत ‘ कन्यादान ’ कसलें ? बापाचा आपल्या मुलांवर मालमत्तेप्रमाणें हक्क असतो काय ? तो त्याचा रक्षक आहे, मालक नव्हे. आणि तो जेव्हां आपल्या मुलाच्या वा मुलीच्या स्वातंत्र्याची देवघेव करूं पाहातो व आपल्या रक्षकत्वाच्या अधिकाराचा दुरुपयोग करतो तेव्हां तो हा अधिकार गमावून बसतो. शिवाय, जें मूल दान ग्रहण करण्याला असमर्थ आहे अशाला दान करणें कसें शक्य आहे ? ग्रहण करण्याची पात्रता जेथें नसेल तेथें दान होऊंच शकत नाहीं. कन्यादान हा खरोखर एक गूढ धार्मिक विधि आहे. त्याला आध्यात्मिक अर्थ आहे. अशा संज्ञा त्यांच्या वाच्यार्थानें वापरणें म्हणजे भाषेचा आणि धर्माचा दुरुपयोग करणें आहे. पुराणांच्या गूढ भाषेचा असाच वरवरचा व शाब्दिक अर्थ घेऊन ‘ पृथ्वी ही ताटासारखी चपटी असून सहस्र फणांच्या नागाच्या डोक्यावर राहिलेली आहे आणि परमेश्वर त्याची शय्या करून क्षीर–सागरांत आरामानें पहुडले आहेत ’ असें कोणी म्हणेल !

ज्या पालकानें आपली लहान मुलगी एखाद्या म्हातारचळ लागलेल्या मनुष्याला किंवा गुडघ्यांतूनहि वर न निघालेल्या पोराला देऊन आपल्या विश्वस्तपणाचा दुरुपयोग केला, त्यानें ती मुलगी विधवा झाली तर निदान तिचा पुनर्विवाह करून देऊन तरी आपलें पाप धुवून टाकलें पाहिजे. मी माझ्या मागील एका लेखांत म्हटल्याप्रमाणें अशीं लग्नें पहिल्यापासूनच रद्द म्हणून जाहीर झालीं पाहिजेत.

---

# संतति-नियमन (२)

आज आपल्या समाजांत संयमाचें वातावरण निर्माण होण्याला अनुकूल असें कांहींच नाहीं. आमचें शिक्षणच मुळीं त्याच्याविरुद्ध आहे. आपल्या मुलांचीं लग्नें एकदाचीं कशींबशीं करून टाकलीं म्हणजे झालें, मग त्यांना डुकरासारखीं अनेक पोरें कशीं होतील, हाच आईबापांच्या चिंतनाचा विषय असतो. त्या मुली असल्या तर सोयीला पडेल तितक्या लहान वयांत त्यांचीं लग्नें उरकलीं जातात, मग नैतिक कल्याणाच्या दृष्टीनें त्यांचें कांहीं कां होईना. लग्नसमारंभ म्हणजे मेजवान्या आणि निरर्थक डामडौलांनीं भरलेली एक दीर्घसूत्री व्यथाच असते. नव्या बनलेल्या गृहस्थाचें जीवन हें गतकालाला धरूनच पुढें चालू होतें. हें जीवन म्हणजे दीर्घकालपर्यंत इंद्रियासक्ति. कामासक्त जीवन घालविण्याकरितां अधिकांत अधिक अनिर्बंधपणा मिळेल अशा रीतीनें सुट्टीचे दिवस आणि सामाजिक करमणुकीच्या गोष्टी आंखल्या जातात. जें साहित्य डोक्यांत कोंबलें जातें तें बहुतकरून पाशवी विकारांना उत्तेजित करणारेंच असतें. आज तागायतचें अगदीं ताजें साहित्य, पाशवी विकारांत रत राहणें हें कर्तव्यकर्म आहे आणि संपूर्ण जितेंद्रियता हें पाप आहे, असेंच जवळ जवळ शिकवितें.

मग कामक्षुधा ताब्यांत ठेवणें हें कठीणच नव्हे तर जवळ जवळ अशक्य व्हावें यांत नवल तें काय? म्हणून, संयमाच्या द्वारा संतति-

मी इतकीं वर्षें समजत होतों आणि माझी अशी कल्पना होती कीं, जोंवर विवाहित जोडपीं केवळ संततीच्याच इच्छेनें नसला तरी संग करतील तोंवर विवाहाचा हेतु तीं बरोबर अंमलांत आणीत आहेत, त्यात स्मृतीच्या कोणत्याहि आज्ञेचा भंग होत नाहीं. पण या नव्या प्रकाशांत जेव्हां मी स्मृतीची भाषा पाहूं लागलों तेव्हां एक नवीन गोष्ट मला कळून आली. स्मृतीची आज्ञा कडकपणें पाळणारे पति-पत्नी अविवाहित आणि ब्रम्हचारी जीवन घालविणाऱ्या माणसांइतकेच ब्रम्हचारी आहेत या म्हणण्याचा अर्थ पूर्वी कधींहि मला समजला नव्हता, तो आतां समजला.

या नव्या प्रकाशाप्रमाणें, स्त्रीपुरुषसंयोगाचा एकमेव हेतु संततीची इच्छा हाच आहे, कामवासनेची पूर्ती हा नाहीं. विवाहाच्या या कल्पनेप्रमाणें निव्वळ वासनापूर्ति म्हणजे लंपटपणाच होय. जो संभोग आजवर आपण निष्पाप आणि नीतियुक्त मानीत होतों, त्याच्या-विषयीं हा शब्द वापरणें कटु वाटेल. पण मला रूढीसंबंधीं बोलावयाचें नाहीं; हिंदु ऋषींनीं पुढें मांडलेल्या विवाहशास्त्रासंबंधीं बोलावयाचें आहे. त्यांची मांडणी कदाचित् दोषयुक्त असेल, कदाचित् ती सर्वस्वीं चूकहि असेल. पण निरनिराळीं स्मृतिवचनें अंतःस्फूर्त आणि अनु-भवाच्या पायावर रचलेलीं आहेत असें मानणाऱ्या माझ्यासारख्याला त्यांचा अर्थ पूर्णत्वानें स्वीकारण्यावांचून गत्यंतर नाहीं. वस्तूंचें सत्य-दर्शन करण्याचा आणि कांहीं जुनीं शास्त्रवचनें त्यांच्या संपूर्ण अर्था-प्रमाणें कसोटीला लावून पाहण्याचा, या व्यतिरिक्त दुसरा मार्ग मला माहीत नाहीं; मग ही कसोटी कितीहि कठीण वाटो किंवा तिच्या-मधून निघालेले निर्णय कितीहि कटु वाटोत.

तेव्हां मी वर जें सांगितलें त्याच्या प्रकाशांत कृत्रिम साधनांनीं किंवा तत्सम प्रकारांनीं संततिनियमन करणें ही मोठी घोडचूक

होईल. मी हें माझी जबाबदारी पूर्णपणें समजून लिहीत आहें. मिसेस मार्गारेट सँगर आणि त्यांचे अनुयायी यांच्याविषयीं मला मोठा आदर आहे. आपल्या कार्याविषयींच्या त्यांच्या उत्कट उत्साहाचा माझ्यावर मोठा परिणाम झाला. संततीची इच्छा नसतांना संततीला वागविण्याचें आणि वाढविण्याचें ओझें वाहावें लागण्याचा ज्यांना त्रास होतो अशा स्त्रियांबद्दल त्यांना वाटणारी सहानुभूति मी जाणतों. पुष्कळ प्रॉटेस्टंट धर्माचार्य, शास्त्रज्ञ, पंडित आणि डॉक्टर लोक यांचा पाठिंबा संततिनियमनाच्या या पद्धतीला आहे हें मला माहीत आहे. या लोकांपैकीं अनेकांशीं प्रत्यक्ष परिचय असण्याचें भाग्य मला लाभलें आहे. आणि त्यांच्याविषयीं माझ्या मनांत मोठा आदर वसत आहे. तथापि माझ्या वाचकांपासून किंवा या पद्धतीच्या थोर पुरस्कर्त्यांपासून मी माझें मत जर छपवीन तर मी माझ्या ईश्वराशीं बेइमान झाल्यासारखें होईल. माझा ईश्वर म्हणजे सत्य—एकमेव सत्य, आणि मी माझें मत लपविलें तर मला माझी चूक—माझें आजचें मत समजा चुकीचें असलें तर—खरोखर मला कधींच आढळून येणार नाहीं. शिवाय असे पुष्कळ स्त्रीपुरुष आहेत कीं, जे मला मार्गदर्शक मानून अनेक नीतिविषयक प्रश्नांत माझा सल्ला स्वीकारतात. त्यांत हा संततिनियमनाचा प्रश्नहि अंतर्भूत आहे. त्यांच्याकरितांहि माझें मत प्रदर्शित करणें इष्ट आहे.

संततीचें नियमन व निग्रह झाला पाहिजे या बाबतींत संततिनियमनाच्या कृत्रिम साधनांच्या पुरस्कर्त्यांत आणि माझ्यांत मतभेद नाहीं. संयमाच्या द्वारा हा निग्रह करणें कठिण आहे हेंहि अमान्य करतां येणार नाहीं. तरीसुद्धां मनुष्यजातीला जर आपलें साध्य साधावयाचें असेल तर, यावांचून दुसरा मार्ग नाहीं. चर्चा--विषय बनलेल्या या पद्धतीचा जर सर्वत्र स्वीकार केला गेला, तर मनुष्य-

जातीचा नैतिक अधःपात होईल अशी माझी मनोमन खात्री आहे. या पद्धतीच्या पुरस्कर्त्यांकडून याच्याविरुद्ध पुरावा पुढें केला जात असतांनासुद्धां हें मी सांगत आहे.

मी अंधश्रद्धाळु नाहीं असें मला वाटतें. सत्य हें प्राचीन आहे म्हणूनच केवळ तें सत्य नव्हे, किंवा तें प्राचीन आहे म्हणूनच त्याकडे संशयाच्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे हेंहि अवश्य नाहीं. जीवनाच्या अशा कांहीं मूलभूत गोष्टी आहेत कीं, ज्या आपल्या आयुष्यांत अंमलात आणणें कठीण असलें तरी त्यांना कमी लेखून टाकून देतां येणार नाहीं.

संयमाच्या द्वारा संततिनियमन करणें हें कठीण आहे यांत शंका नाहीं. तथापि त्याच्या प्रभावाविषयीं आणि संतति-नियमनाच्या कृत्रिम साधनांच्या वापरापेक्षां तो श्रेष्ठ आहे याविषयीं, कोणाचें खरोखर दुमत असल्याचें अजून तरी ऐकिवांत नाहीं.

तेव्हां कामोपभोग हाच एक परम आनंद आहे असें कोणी मानीत असेल तर गोष्ट वेगळी. नाहींतर मला वाटतें कीं स्त्रीपुरुष-संयोगाचा अत्यंत मर्यादित उपयोग करण्याविषयीं जी शास्त्राज्ञा आहे, तिच्या सूचितार्थाचा संपूर्ण स्वीकार केला तर संयमाचें पालन हें पुष्कळच सुकर होईल. जननेंद्रियाचें कार्य प्रजोत्पत्ति करणें हेंच केवळ आहे. अर्थात् प्रजा म्हणजे विवाहित जोडप्याला शक्य आहे तेवढी उत्तमोत्तम प्रजा. म्हणजे हें कार्य तेव्हांच घडूं शकेल आणि घडावें कीं जेव्हां दोघांनाहि अशा संयोगाची परिणति जी संतति तिची इच्छा असते. विषयोपभोगासाठीं तें घडूं नये. म्हणून संततीच्या इच्छेव्यतिरिक्त अशा संयोगाची इच्छा ही अधार्मिक समजली पाहिजे आणि तिचें संयमन केलें पाहिजे.

निग्रह करणें सामान्य माणसाला शक्य आहे कीं नाहीं याचा विचार पुढें करूं.

---

# संतति-नियमन (१) : ३२

माझे लेख काळजीपूर्वक वाचणाऱ्या माझ्या एका मित्राला—सहकारी कार्यकर्त्याला—मी संतति-नियमनाकरितां ' सुरक्षित काळांतील समागम '* पद्धतीला मान्यता देण्याचा संभव आहे असें वाचून कसेंसेंच वाटलें. संतति-नियमनाचीं साधनें वापरण्याइतकीच घृणा या पद्धतीबद्दल मला कशी वाटत नाहीं आणि ही पद्धति फक्त विवाहित जोडप्याच्याच बाबतींत बव्हंशीं कशी खुली आहे हें त्या सद्गृहस्थांना स्पष्टपणें समजावून देण्याचा मी प्रयत्न केला. परंतु या विषयासंबंधीं चर्चा करतांना आम्हांला कल्पनाहि नव्हती इतक्या खोलात आम्ही शिरलों. संतति-नियमनाच्या साधनां इतकाच या ' सुरक्षित काळांतील समागम ' पद्धतीचाहि माझ्या या मित्राला तिटकारा आहे. यावरून मला असें दिसून आलें कीं सामान्य माणसेंसुद्धां स्मृतींनीं सांगितलेला संयम पाळतील अशी शक्यता आहे असा त्यांना विश्वास वाटतो. पति-पत्नींना खरोखरच संततीची इच्छा असेल त्याच वेळीं त्यांनीं संग करावा, हा स्मृतींनीं घालून दिलेला नियम आहे. मला या नियमाची माहिती होती खरी पण या चर्चेमुळें ज्या दृष्टीनें मी या नियमाकडे पाहूं लागलों ती दृष्टि पूर्वी मला नव्हती. हा नियम म्हणजे एक पूर्णत्वाचा आदर्श म्हणून सांगितला असावा, तो अक्षरशः व्यवहारांत आणावयाचा नाहीं, असेंच

---

* सुरक्षित काळः—मासिक ऋतुकाळापूर्वीचे दहा दिवस.

नियमन ही जर अत्यंत इष्ट, शहाणपणाची आणि संपूर्णपणें निरुपद्रवी पद्धति असेल, तर आपण समाजाचा आदर्श आणि वातावरण यांत बदल घडवून आणला पाहिजे. हें इष्ट साध्य घडवून आणण्याचा मार्ग फक्त एकच आहे. तो हा कीं, ज्या व्यक्तींचो संयमाच्या पद्धतीवर श्रद्धा आहे त्यांनीं स्वतःच त्याबाबतींत प्रारंभ करावा आणि अढळ श्रद्धेनें आपल्या आजूबाजूच्या वातावरणावर परिणाम करावा. गेल्या लेखांत मी विवाहाविषयींची जी कल्पना चर्चिली ती, मला वाटतें, त्यांना अत्यंत सार्थ वाटेल. ती कल्पना बरोबर आकलन झाली म्हणजे संपूर्ण मानसिक क्रांति होईल. ती कांहीं थोड्या निवडक लोकांकरितांच आहे असें नव्हे. मानवजातीचा तो कायदा म्हणून पुढें मांडला गेला आहे. या कायद्याच्या भंगानें मानवी प्राण्यांचा दर्जा कमी होतो आणि नको असलेल्या मुलांच्या वाढत्या संख्येच्या रूपानें त्यांना तत्काळ शिक्षाहि मिळते; त्याच्या भंगानें सतत वाढत जाणाऱ्या रोगांची मालिका सुरू होते आणि सृष्टिकार्याला जबाबदार अशा तऱ्हेचें मनुष्याचें नैतिक नातें तुटून जातें. कृत्रिम साधनांनीं केलेल्या संततिनियमनानें कांहीं अंशीं नव्या उत्पन्न होणाऱ्या मुलांची संख्या कमी होते आणि उपासमार टळते ही गोष्ट खरी आहे. पण त्याच्या योगानें व्यक्तीची आणि समाजाची होणारी हानी अपरिमित आहे. एकतर, भोगाकरितांच कामवासनेची जे तृप्ति करून घेऊं इच्छितात त्यांची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि सर्वस्वी बदलते. विवाहाकडे धार्मिक बंधन म्हणून पाहण्याची त्यांची दृष्टि नाहींशी होते. म्हणजेच ज्या सामाजिक आदर्शांना आतांपर्यंत बहुमोल ठेवा म्हणून आपण जतन केलें त्यांचें मूल्य बदलतें. अर्थात् विवाहाच्या जुन्या आदर्शांना जे धर्मभोळेपणा समजतात

त्यांना हें म्हणणें मुळींच पटणार नाहीं, यांत शंका नाहीं. पण माझें हें सांगणें, जे लोक विवाहाला धार्मिक विधि समजतात आणि जे स्त्रीला पाशवी भोगाचें साधन न मानतां पुरुषाची माता आणि आपल्या संततीच्या सतूशीलाची विश्वस्त म्हणून मानतात, फक्त त्यांनाच उद्देशून आहे.

मी आणि माझ्या सहकाऱ्यांनीं आचरलेल्या आत्मसंयमनाच्या अनुभवानें मी वर व्यक्त केलेलें मतच दृढ होतें. विवाहाविषयींच्या प्राचीन कल्पनेचा अत्यंत स्वच्छ प्रकाशांत बोध झाल्यानें या अनुभवाला जबरदस्त सामर्थ्य प्राप्त झालें. माझ्या बाबतींत आतां वैवाहिक जीवनांतील ब्रम्हचर्य ही वस्तु स्वाभाविक आणि अपरिहार्य होऊन बनली आहे आणि खुद्द विवाहाइतकीच ती सहज झाली आहे. संततिनियमनाकरितां याहून दुसरी कोणतीहि पद्धत निरुपयोगी वाटते—मनांतसुद्धां आणूं नयेशी वाटते. जननेंद्रियाचें एकमेव आणि उदात्त कार्य उत्पत्ति हें आहे, ही कल्पना एकदां स्त्रीपुरुषांना बरोबर आली म्हणजे मग दुसऱ्या कोणत्याहि हेतूनें एकत्र येणें म्हणजे आपल्या वीर्याचा घोर दुरुपयोग करणें आहे, त्याचबरोबर आपल्यांत उत्पन्न होणारी उत्तेजना ही बहुमोल अशा शक्तीचा व्यर्थ व्यय आहे असें त्यांना वाटूं लागेल. जुन्या शास्त्रकारांनीं वीर्याची इतकी मोठी किंमत कां मानली आहे आणि समाजाच्या हिताकरितां वापरल्या जाणाऱ्या शक्तींत त्याचें रूपांतर व्हावें असा त्यांचा जबरदस्त आग्रह कां आहे हें मग समजून येईल. ते छातीठोकपणें सांगतात कीं, ज्यानें किंवा जिनें आपल्या कामशक्तीवर ताबा मिळविला आहे त्याचें वा तिचें सबंध जीवन—शारीरिक, मानसिक आणि आध्यात्मिक जीवन—खंबीर बनतें, आणि दुसऱ्या कोणत्याहि साधनांनीं मिळणार नाहीं अशा दुर्लभ शक्तीचा त्याला वा तिला लाभ होतो.

ज्यांच्याकडे आदर्श म्हणून पहावें असे महान ब्रम्हचारी जगांत अनेक नव्हे, एकसुद्धां नाहीं. म्हणून वाचकांनीं आपलें मत विचलित होऊं देऊं नये. आपल्या आजूबाजूला जे ब्रम्हचारी आपण पहात आहों ते फार अपूर्ण असे नमुने आहेत. फार तर त्यांना साधक म्हणतां येईल. त्यांनीं आपल्या शरीरावर फक्त ताबा मिळविलेला असतो. मनावर नाहीं. मोहाचा मुळींच पगडा बसणार नाहीं अशी त्यांची स्थिती नसते. याचें कारण ब्रम्हचर्य ही वस्तु साधण्याला फार कठिण आहे असें नव्हे. भोंवतालचें सामाजिक वातावरण त्याला विरोधी असतें, आणि प्रामाणिकपणें प्रयत्न करणाऱ्यांपैकीं बहुतेकजण या पाशवी विकाराला इतर विकारांपासून अज्ञानानें वेगळा काढून त्यावर अंकुश ठेवावयाचा असें समजतात. वास्तविक या विकारावर यशस्वी रीत्या ताबा मिळवावयाचा असेल तर मनुष्य ज्यां ज्या विकारांना बळी पडत असेल त्या सर्व विकारांवर ताबा मिळविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. सर्व साधारण पुरुषाला किंवा स्त्रीला ब्रम्हचर्य साध्य होणें अशक्य नसलें तरी कोणी असें समजूं नये कीं एखाद्या साधारण विद्यार्थ्यानें कोणत्याहि शास्त्रांत पारंगत व्हावयाचें ठरविलें तर त्याला जितका प्रयत्न करावा लागेल, त्याहून कमी प्रयत्न ब्रम्हचर्य साध्य करण्याला लागेल. या ठिकाणीं 'ब्रम्हचर्य' हा शब्द ज्या अर्थानें वापरला आहे, त्या अर्थाचें ब्रम्हचर्य साध्य करणें म्हणजे जीवनशास्त्रांत पारंगत होणेंच आहे.

---

# विवाहितांचें ब्रह्मचर्य : ३३

एक मित्र लिहितात:—

संततिनियमनाकरिता संयम हाच सार्वभौम उपाय आहे असेच माझेहि आपल्या सारखेच पुष्कळ दिवसापासून मत आहे. स्त्रीपुरुषसंग हा संतति-उत्पादनाकरिताच फक्त आहे. तद्व्यतिरिक्त हेतूने कोणत्याहि स्वरूपात केलेला संग ही भोगइच्छेची अनैसर्गिक वृत्ति आहे, हे सिद्ध करण्याची जरूरी नाही. पण कधीकधी त्यामुळे माणसापुढे एक मोठा पेच येऊन उभा राहतो. एकदा किंवा दोनदा संग करूनसुद्धा, समजा, गर्भधारणा झाली नाहीं, तर मग काय करावें ? मर्यादा कुठे घालावी ? संतति उत्पन्न करण्याची सारी आशा कायमची सोडून देणे ही गोष्ट कठीण आहे. दुसऱ्या बाजूने, अमर्यादपणे संग करीत राहिल्यानें मनुष्याचे सर्व वीर्य निपटून निघते. पुनः, एकदां किंवा दोनदा संग करून पाहूनहि संतति न झाली तर तुझ्या नशिबातच संतति नाही आणि म्हणून इतःपर तू आता संग करू नकोस, असे त्या व्यक्तीला सांगावे काय ? पण तसा ताबा ठेवण्याला त्या व्यक्तीमध्ये असामान्य निग्रह आणि आध्यात्मिक बळ असावे लागेल. तरुणपणीं किंवा ऐन उमेदीच्या वयात संतति उत्पन्न करण्याच्या बाबतींत वारंवार प्रयत्न करूनहि अपयश आल्यानंतर उतरत्या वयात मुले झाल्याची उदाहरणे घडलेली नाहीत किंवा ऐकिवांत नाहीत असे नाहीं. त्यामुळे संपूर्णपणे व्रतस्थ राहणे हे अधिकच अवघड होऊन बसते, आणि पतिपत्नी एरवी निरोगी आणि कसल्याहि शारीरिक दोषापासून मुक्त असतात, तेव्हां तर परिस्थिति मोठीच बिकट होते.

ही अडचण मला मान्य आहे, पण ती त्या प्रश्नांत मुळांतच आहे. कोणत्याहि प्रगतीच्या मार्गात अशाच अडचणी पसरलेल्या

असतात, आणि त्या अडचणींचा मनुष्य जसजसा निरास करीत जातो तसतसा तो उत्क्रांतीच्या मार्गानें चढत जात असतो. हिमालयाला पादाक्रांत करण्याचीच गोष्ट घ्या. जसजसे तुम्ही उंच उंच चढतां तसतसा चढ हा अधिकअधिक खडा होत जातो, चढणें अवघड होत जातें. या साहसांत कितीतरी वीरांचे आजपर्यंत बळी पडले आहेत. तरी प्रत्येक वर्षी नवे प्रयत्न सुरू होतात आणि पुनः त्यांची पूर्वीप्रमाणेंच वासलात लागते. इतकें झालें तरी शोधकांच्या उत्साहावर त्यायोगें पाणी पडत नाहीं. ही जर हिमालयाला पादाक्रांत करण्याच्या बाबतींत स्थिति, तर स्वतःला जिंकण्याच्या बाबतींत काय बोलायचें? तें तर त्याहूनहि बिकट काम आहे. पण त्याचें बक्षिसहि तसेंच मोठें आहे. 'हिमालयावर इतके फूट उंच चढलों' या कल्पनेनें जास्तींत जास्त काय होईल! कांहीं काल आनंदानें आणि विजयोन्मादानें फुलून जातां येईल एवढेंच. पण स्वतःवर विजय मिळविल्याचें बक्षिस आत्मानंद हें आहे. त्या आनंदाला क्षय नसतो, तो वर्धिष्णु असतो. ब्रह्मचर्याच्या शास्त्रांतलें हें सर्वश्रुत अनुभवसिद्ध वचन आहे कीं, ज्या मनुष्यानें ब्रह्मचर्याचे नियम बरोबर पाळले आहेत त्याचें वीर्यबीज फलद्रुप झाल्यावांचून राहणारच नाहीं, राहतां कामा नये. आणि हें अगदीं बरोबर आहे. मनुष्य जेव्हां आपलें पशुत्व संपूर्णपणें जिंकतो, तेव्हां अनैच्छिक अब्रह्मचर्य हें असंभवनीय होतें, आणि केवळ वासनातृप्तीकरितांच वासना तृप्त करून घेण्याची इच्छा मरून जाते. मग संग घडतो तो फक्त संततीच्या इच्छेनेंच घडतो. 'वैवाहिक ब्रह्मचर्य' असें ज्याला म्हणतात त्याचा अर्थ हा आहे. दुसऱ्या शब्दांत सांगायचें तर, जो मनुष्य हा नियम पाळतो, तो जरी गृहस्थजीवन घालवीत असला तरी त्याला संपूर्णपणें संगापासून विरक्त झालेल्या मनुष्याचीच

आणि गुणानेंहि तितक्याच योग्यतेची अवस्था प्राप्त होते. कारण संग हे फक्त संतति–उत्पादनाचें साधन आहे, भोगाचें नव्हे. व्यवहारांत हा आदर्श संपूर्णपणें क्वचितच येतो ही गोष्ट खरी आहे. पण आपले आदर्श घडवितांना आपल्याला आपले दोष किंवा हातून घडणाऱ्या संभवनीय चुका, यांच्या भाषेंत विचार करून चालणार नाहीं, परंतु आजची प्रवृत्ति बरोबर याच्या विरुद्ध जाण्याची आहे. आणि कृत्रिम साधनांच्या पुरस्कर्त्यांनी आपल्यापुढें जवळ जवळ स्वैराचार हाच आदर्श आणून ठेवला आहे. अर्थात् स्वैराचार हा कांहीं आदर्श होऊं शकत नाहीं हें उघड आहे. आदर्शाला आचारांत उतरविण्याच्या बाबतींत कधीं मर्यादा असूं शकत नाहीं पण कोणीहि कबूल करील कीं, अमर्याद स्वैराचारामुळें त्या व्यक्तीचा किंवा त्या जातीचा निश्चितपणें नाशच होणार. म्हणून संयम हाच आपला आदर्श होऊं शकेल. आणि तसा तो प्राचीन काळापासून मानला गेला आहे. याकरितां हा संयम कोणत्या मार्गानें संपादन करायचा याचा शोध करणें हेंच आपलें कर्तव्य ठरतें. त्याला बगल देणें हें उचित ठरत नाहीं.

अनुभवान्तीं माझें असें निश्चित मत बनले आहे कीं, ब्रह्मचर्य–पालनाच्या बाबतींत ज्या अडचणी अनुभवाला येतात त्यांपैकीं बहुतेक तत्संबंधींचे नियम माहीत नसल्यामुळें येतात. ते नियम आपल्याला सांपडले तर त्या ताबडतोब नाहींशा होतील. उदा० पत्रलेखकानें जो एक बिकट प्रश्न चर्चिला आहे त्याचा आपण आदर्शाच्या प्रकाशांत विचार करूं. पहिली गोष्ट म्हणजे, आदर्श अवस्थेंत जशा तऱ्हेची आकस्मिक परिस्थिति उत्पन्न होणारच नाहीं. कारण लहानपणापासूनच ब्रह्मचर्याचे नियम ज्यांनीं पाळले आहेत अशा नेहमीच्या निरोगी दंपतींमध्यें संग हा कधींहि निष्फळ ठरणार नाहीं.

पण व्यवहारांत अशा विचित्र गोष्टी घडून येतात खऱ्या. अशा उदाहरणामध्यें एकच नियम घालून देतां येईल. तो हा कीं, मासिकधर्म संपतांच फक्त एक वेळ संग करण्याची मुभा गर्भधारणा होईपर्यंत ठेवावी....या संगाचा हेतु सफल झाला कीं त्याचा पुढें निश्चयपूर्वक त्याग केला पाहिजे. कारण केवळ इंद्रियतृप्ति हा त्याचा कधींहि उद्देश असता कामा नये. शरीराचें व मनाचें आरोग्य हें शरीराच्या आणि मनाच्या पावित्र्याच्या प्रमाणांतच वाढत असतें हा माझा विश्वास माझ्या अनुभवावर आधारलेला आहे. आणि त्यांत नवलहि नाहीं. मानवासारखा अद्भुत प्राणि उत्पन्न करण्याची शक्ति ज्या द्रव्यांत आहे तें द्रव्य जर बरोबर रक्षण केलें गेलें तर त्याचें रूपांतर अद्वितीय असें तेज आणि बळ निर्माण होण्यांत झाल्यावांचून राहाणारच नाहीं. शास्त्रांना जें सत्य दिसून आलें त्याचें प्रत्यंतर कोणालाहि स्वानुभवानें घेतां येईल. आणि हा नियम पुरुषांइतकाच स्त्रियांनाहि लागू आहे. पण खरी अडचण ही आहे कीं आम्ही आमच्या अंतःकरणांत कामवासनेला थारा देऊन बाहेर मात्र तिच्यापासून सुटण्याचा व्यर्थ खटाटोप करीत असतों. त्यामुळें शरीरानें व मनानें आपण अगदीं निकामी बनतों. आणि, गीतेच्या शब्दांत म्हणावयाचें तर 'मिथ्याचारी' किंवा दंभमूर्ती बनतों.

---

# मिसेस् सँगर आणि गांधीजी : ३४

मिसेस् मार्गारेट सॅगर या संततिनियमन चळवळीच्या एक प्रसिद्ध पुढारी बाई आहेत. बायकाना इच्छा नसतांनासुद्धां वारवार बाळंत होण्याच्या प्रसंगांतून सोडविण्याकरिता संततिनियमन करणें व त्यासाठी कृत्रिम साधनांचे साह्य घेणे या गोष्टींचा त्या प्रचार करीत असतात. हिंदुस्थानांतील कोट्यावधि स्त्रियाना आपला हा संदेश देण्याकरितां त्या येथे आल्या होत्या त्या वेळीं त्या गांधीजींनाहि जाऊन भेटल्या आणि एक मोठा समाजसेवक धर्मपुरुष या नात्याने त्यांचे या बाबतीत आपल्याला कुठवर साह्य मिळते यासंबंधी त्यांनी त्यांच्याशी चर्चा केली. वारवार होणाऱ्या गरोदरपणाचा स्त्रियांना फार त्रास होतो पण नवऱ्यापुढे त्यांचे कांहीं चालत नाहीं, स्त्रियांची यांतून मुक्तता झाली पाहिजे, स्वतःचे भवितव्य ठरविण्याचा त्यांचा त्यांनाच हक्क असला पाहिजे, येथपर्यंत गांधीजींचा मिसेस् सॅगर यांना पूर्ण पाठिंबा आहे. पण हे संततिनियमन कृत्रिम उपायांनी न करितां ब्रह्मचर्यपालनाच्या द्वाराच करणे इष्ट आहे असे गांधीजींचे म्हणणे, आणि मिसेस् सॅगर ते स्वीकारण्याला तयार नाहीत. या बाबतींत त्यांची गांधीजींशीं झालेली मुलाखत खाली दिली आहे.

या मुलाखतीत गांधीजींनी आपले संपूर्ण अंतरंग बाईंच्या पुढे उघडे केले आणि आपल्या खासगी जीवनांतीलहि काही गोष्टी त्यांनी त्यांना सांगितल्या आणि म्हणाले—

" मला जर तुम्ही उपायासंबंधीं विचाराल तर, 'आत्मसंयमाच्या द्वारा आत्मसाक्षात्कार' हा माझा जीवनसिद्धांत ठरून गेला असल्यामुळें मी दुसरा उपाय सुचवूंच शकणार नाहीं."

पण सॅंगर बाईंना हा उपाय अशक्यप्राय वाटला. "हिंदुस्थानच्या स्त्रियांना अशक्य असे कांहीतरी करायला गांधीजी सांगत आहेत. नवऱ्यांना 'नाहीं' म्हणणे बायकाना शक्यच नाही. गांधी हे हिंदी स्त्रियांचा स्वभाव ओळखीत नाहीत." असे त्यांनी आपले मत पुढे आपल्या निवेदनांत प्रगट केले. असें गाधीजी काय म्हणाले ते आपण पाहू. ते म्हणाले—

"स्त्रियांच्या स्वभावपरीक्षणाचें क्षेत्र मी माझ्या पत्नीला बनविलें. तिच्यामध्यें मी साऱ्या स्त्रीजातीचा अभ्यास केला. दक्षिण आफ्रिकेंत असतांना मी अनेक युरोपियन स्त्रियांच्या सन्निध्यांत आलों होतों, आणि तिथल्या जवळ जवळ प्रत्येक हिंदी स्त्रीलाहि मी ओळखीत होतों. त्यांच्याबरोबर मी काम केलें. राजकारणाच्या क्षेत्रांतच नव्हे तर घरगुती क्षेत्रांतहि. तुम्ही आपल्या नवऱ्याच्या किंवा आपल्या आईबापांच्या गुलाम नाहीं, हें त्यांच्या मनावर ठसविण्याचा मीं प्रयत्न केला. पण अडचण ही होती कीं, कित्येकजणी आपल्या नवऱ्याचा प्रतिकार करूं शकत नव्हत्या. त्याला उपाय खुद्द स्त्रियांच्याच हातीं आहे. हा झगडा त्यांना फार कष्टदायक आहे हें मला कबूल आहे आणि त्याबद्दल मी त्याना दोष देत नाहीं. मीं पुरुषांना दोष देतों. पुरुषांनीं त्यांच्या विरुद्ध कायदे केले आहेत. पुरुष स्त्रीला आपलें भोगसाधन मानीत आला आहे. तीहि त्याचें भोगसाधन बनायला शिकली आणि अंतीं तेंच तिला स्वाभाविक आणि सुखकर वाटूं लागलें. कारण एकजण जेव्हां दुसऱ्याला आपल्याबरोबर खालीं ओढतो तेव्हां हें अधःपतन सोपें होतें. .... .... जेवढें आयुष्य राहिलें आहे तेवढ्या आयुष्यांत 'तुम्ही स्वतंत्र आहांत' हें सत्य जर स्त्रियांच्या मनावर मी ठसवूं शकलों, तर हिंदुस्थानांत संततिनियमनाचा प्रश्नच उद्भवणार नाहीं असें मला वाटूं लागलें आहे. पुरुष स्त्रियांच्याजवळ कामभावनेनें येतात तेव्हां त्यांना त्या फक्त 'नाहीं' म्हणायला जर शिकल्या तर मला नाहीं वाटत कीं सर्वच

पुरुष पशू असतात; आणि जर स्त्रियांना प्रतिकार कसा करायचा याचें ज्ञान झालें तर सर्व कांहीं सुरळीत होईल. माझ्या सहवासांत आलेल्या स्त्रियांना आपल्या नवऱ्यांचा त्यांनीं कसा प्रतिकार करावा हें मी शिकवूं शकलों आहें. खरा प्रश्न असा आहे कीं पुष्कळ जणींना प्रतिकार करण्याची इच्छाच नसते... पतिपत्नी या दोघांचेंहि बिनसेल इतक्यापर्यंत प्रतिकार करण्याचें शेंकडा ९९ बाबतींत कारणच पडत नाहीं. ' नको, मला तें नको आहे. ' असें बायकोनें नवऱ्याला निक्षून सांगितलें तर त्याच्याकडून तिला त्रास होणार नाहीं. पण तिला तसें शिक्षणच मिळालेलें नसतें. पुष्कळ वेळां तिचे आईबाप तिला हें शिक्षण देत नाहींत कांहीं उदाहरणें अशीं मला माहीत आहेत कीं ज्या ठिकाणीं आईबापानीं आपल्या मुलीच्या नवऱ्याला तिच्यावर सक्तीनें मातृपद न लादण्याबद्दल आर्जवून सांगितलें आहे. आणि मला तसे समजूतदार नवरेहि भेटले आहेत. स्त्रीनें प्रतिकाराचा आपला प्राथमिक हक्क गाजवायला शिकावें अशी माझी इच्छा आहे. तिला वाटतें आपल्याला तो हक्क नाहींच. "

पण सॅंगर बाईंना वाटते की, अशा आत्मसंयमनाच्या आचरणामुळे कुटुंबात चिरड, झगडे उत्पन्न होतील; पतिपत्नीमधील 'प्रेमळ नेत्रकटाक्ष' आणि ' चुंबने 'नाहीशी होतील. पण सॅंगरबाई विसरतात की, संततिनियमन आणि तशाच इतर कोमल किंवा हलकट गोष्टी आल्यामुळे अमेरिकेंत अनंत झगडे कुलगडी, काडीमोड आणि अशाच इतर भानगडी निर्माण झाल्या आहेत. आत्मसंयमनामुळे मज्जातंतूचा आणि डोक्याचा बिघाड झाल्याची उदाहरणें त्यांनी दाखवून दिलीं तेव्हां गांधीजी म्हणाले--

" हीं उदाहरणें म्हणजे वेडसर माणसांची तपासणी करून काढलेला पुरावा आहे. निरोगी मनाच्या माणसांच्या आचारांवरून कांहीं हे निर्णय काढलेले नाहींत. उदाहरणादाखल म्हणून घेतलेल्या

लोकांनीं माफक प्रमाणांतसुद्धां ब्रम्हचर्य पाळलेलें नाहीं. हें मज्जा-तंतूविशारद् समजून चालतात कीं अनिर्बंध—असंयमी जीवन चालू असतांनाच लोकांनीं संयम पाळला पाहिजे. याचा परिणाम म्हणजे ते संयम पाळीत नाहींतच पण वेडे मात्र बनतात. अशा पुष्कळ लोकांशीं माझा पत्रव्यवहार चालू आहे आणि ते आपलीं दु:खें मला निवेदन करितात. मी त्यांना जर संततिनियमनाची ही तुमची ( कृत्रिम ) पद्धति सांगितली तर त्यांचें जीवन याहूनहि भयंकर होईल. ”

ज्या पतिपत्नींना कामप्रेरणा आवरावीशी वाटते पण ते शक्य होत नाही त्याच्या बाबतीत काय करावे ?

या विषयाच्या सभाषणातून पुढे प्रीति आणि आसक्ति यांमधील भेद गांधीजींनी विशद करून सांगितला. ते म्हणाले—

जेव्हां दोघांनाहि आपला विकार तृप्त करून घ्यावासा वाटतो पण त्या कृतीचे परिणाम भोगण्याची मात्र इच्छा नसते तेव्हां ती प्रीति नसते, कामासक्ति असते. पण प्रीति जर शुद्ध असेल तर ती विकारावर मात करील आणि स्वत:ला मर्यादेंत ठेवील. विकारांच्या-बाबतींत आपल्याला पुरेसें शिक्षण मिळालेलें नाहीं. “ आपल्याला संतति नको, पण आपण संबंध ठेवूं या—’ असें जेव्हां नवरा म्हणतो तेव्हां तो त्याचा पाशवी विकार नव्हे तर दुसरें काय ? त्यांना जर अधिक संतति नको असेल तर त्यांनीं संबंध ठेवण्याचें सोडून दिलें पाहिजे. प्रीति ज्या क्षणीं पाशवी गरजांच्या पूर्तीचें साधन बनते त्याच क्षणीं ती लालसा बनते. अन्नाच्या बाबतींत असेंच आहे. अन्न केवळ चैनीकरितां म्हणून खाल्लें जातें तेव्हां ती लालसा असते. भूक भागविण्याकरितां कांहीं तुम्हीं चाकोलेट खात नाहीं. तुम्ही तें चैनीकरितां खातां आणि मग डॉक्टरकडे जाऊन औषध मागतां.

' व्हिस्कीनें माझें डोकें सुंद होतें. ' असेंहि कदाचित तुम्ही डॉक्टरला सांगाल आणि तो तुम्हांला औषध देईल. पण व्हिस्की किंवा चाकोलेट न घेणें हेंच अधिक चांगलें नव्हे काय?

सँगरबाई—मला ही उपमा कबूल नाही.

गांधीजी—बरोबर, बरोबर! संतति न होतां कामभावना प्रगट होणें ही आत्म्याची गरज असें तुम्ही समजतां, मग तुम्हांला ही उपमा कशी कबूल होईल? मला मात्र तसें वाटत नाहीं.

सँगरबाई—होय. कामभावनेचें प्रकटीकरण ही आत्म्याची गरज आहे आणि म्हणून माझे म्हणणे असे आहे की परिणामापेक्षां या प्रकटीकरणाचा जो स्वभावधर्म त्याला जास्त महत्व आहे कारण परिणाम कांहीहि झाले तरी पतिपत्नीचा संबंध हा मुळीं स्वभावच आहे पुष्कळशी मुले कर्मधर्मसंयोगाने जन्माला येतात, आईबापांना गर्भधारणाची इच्छाहि नसते. संभोगक्रियेमध्ये मुले व्हावीत या इच्छेने क्वचितच स्त्री-पुरुष दोघे एकमेकाकडे ओढली जातात. ... ... स्त्रीपुरुष दोघांचे एकमेकावर प्रेम आहे, दोघांचे एकत्र जीवन एकमेकाना सुखकारक आहे, अशा स्त्रीपुरुषाना दोन वर्षातून फक्त एकदाच म्हणजे त्यांना जेव्हां मुलाची इच्छा होईल त्याच वेळी संग करणें शक्य आहे असे तुम्हाला वाटते काय?

गांधीजी—नेमकी तीच गोष्ट माझ्या बाबतींत घडली आहे आणि माझेंच एकट्याचें तसें उदाहरण आहे असें नाहीं.

केवळ संततीकरितांच संग घडणें हें प्रेम आणि कामक्षुधा भागविण्याकरितां संग करणें ही लालसा, असें म्हणणें हें तर्कशास्त्रदृष्ट्या बरोबर नाहीं. कारण दोन्हींमध्यें क्रिया एकच घडते, हा सँगरबाईचा विचार. गांधीजींनीं तें तावडतोब कबूल केलें. ते म्हणाले, ' स्त्रीपुरुषसंग हा कामलालसेच्याच जातीचा असें म्हणायला माझी कांहीं हरकत नाहीं. ' त्यांनीं आपल्या स्वतःच्या जीवनामध्यें घडलेलीं

उदाहरणें देऊन तें पूर्ण स्पष्ट केलें. " माझ्या पत्नीकडे मी लालसेनें जोंवर पहात होतों तोंवर आम्हां दोघांमध्यें मेळ नसे. आमचें प्रेम उच्च भूमिकेवर चढलें नव्हतें. आम्हांला एकमेकांविषयीं आपलेपणा नेहमींच वाटे. पण आम्ही—किंवा खरें म्हटलें तर मीच—जेव्हां संयमी बनलों तेव्हांच आम्ही एकमेकांच्या अधिकाधिक जवळ जवळ येऊं लागलों. माझ्या पत्नीच्या बाजूनें संयमाच्या बाबतींत कधींहि नाखुषी नव्हती. पुष्कळ वेळां ती संयम दाखवीत असे. पण तिनें जरी अनेक वेळां आपली अनिच्छा दाखविली तरी तिनें मला प्रतिकार कधीं फारसा केला नाहीं. तिच्यापासून इंद्रियतृप्ति जोंवर मी इच्छित होतों तोंवर मी तिची सेवा करूं शकलों नाहीं. पण ज्या क्षणीं मी इंद्रियासक्त जीवनाला राम राम ठोकला, त्याच क्षणापासून आमचे संबंध आध्यात्मिक झाले, लालसा मेली आणि प्रीतीचें साम्राज्य सुरू झालें.

सॅंगर बाईनी विचारले, " स्त्रीपुरुषसग सबध आयुष्यांत फक्त तीन किंवा चार वेळाच घडावा काय ? "

गाधीजी म्हणाले,

तीन किंवा चार मुलांपेक्षां जास्त मुलें असणें हें अनीतिकारक आहे आणि इतकीं मुलें झाली कीं पतिपत्नींनीं आपली शय्या वेगळी करावी असें लोकांना कां शिकविलें जाऊं नये ? त्यांना जर हें शिकविलें तर तीच पुढें रूढी पडेल आणि लोकांच्या मनावर जर ही गोष्ट सुधारक ठसवूं शकले नाहींत, तर तसा कायदाच कां करूं नये ? पतिपत्नींना जर चार मुलें झालीं तर त्यांना भरपूर संगसुख मिळालें असें म्हटलें पाहिजे. त्यानंतर त्यांचें प्रेम उच्च भूमिकेवर गेलें पाहिजे. त्यांचीं शरीरें मिळालीं, त्यांना हवीं तेवढीं मुलें झालीं. आतां त्यांच्या प्रेमाचें आध्यात्मिक संबंधांत रूपांतर झालें पाहिजे.

ही मुलें मेलीं आणि त्यांना आणखी पाहिजे असलीं तर त्यांनीं खुशाल पुनः संग करावा. इतर विकारांचे गुलाम नसतांना लोकांनीं याच विकाराचे गुलाम कां होऊन बसावें ? संततिनियमनाचें तुम्ही जेव्हां त्यांना शिक्षण देतां, तेव्हां तुम्ही त्यांना संग हें कर्तव्यकर्म आहे असें सांगतां. तुम्ही म्हणतां कीं जर त्यांनी ही गोष्ट केली नाहीं तर त्यांच्या आध्यात्मिक उन्नतींत अडथळा येईल. ‘ नियमित संग करा ’ असेंसुद्धां तुम्ही म्हणत नाहीं. संतातिनियमनाचें शिक्षण दिल्यानंतर ‘ बस्स. याच्यापुढें जायचें नाहीं ’ असें तुम्ही त्यांना सांगत नाहीं. लोकांना तुम्ही माफक प्रमाणांत दारू प्यायला सांगणार. जणूं काय माफक प्रमाण राहाणें हातचेंच आहे. मला हे माफक पिणारे माहीत आहेत. ”

गांधीजींचे असे मत असले तरीसुद्धां सॅंगरबाईची विलक्षण कळकळ पाहून गांधीजींनी आपल्याला पटणारा एक उपाय सांगितला. तो म्हणजे असुरक्षित कालावधीत संग टाळणे, आणि महिन्यातून दहा दिवस जो ‘ सुरक्षित ’ काळ मानला आहे त्या काळापुरताच संग करणे. यामध्ये असुरक्षित काळांत पाळावयाचा कांही ना कांहीं संयम तरी आहे. आणि सत्यशोधक गांधीजींचे यांतच वैशिष्ट्य आहे. ... ... ...

( कै. महादेवभाई देसाई यांच्या लेखाचा योग्य तेवढा संक्षेप करून. )

# स्त्रिया आणि दागिने : ३५

( कोलंबो येथील सिंहली स्त्रियांच्या समुदायासमोर दिलेले व्याख्यान. )

महेन्द्र लंकेला आला त्या वेळीं माझ्या मातृभूमीच्या लेकरांची पोटाची किंवा आत्म्याची उपासमार होत नव्हती, आमचें भाग्य चढतें होतें आणि तुम्हीहि त्या भाग्यांत भागीदार झालात. आज तीं लेंकरें उपाशीं मरत आहेत, आणि त्यांच्या वतीनें मी आज तुमच्यापुढें भिक्षापात्र घेऊन आलों आहें. तुम्ही त्यांच्याशीं असलेलें आपलें नातें जर नाकारीत नसाल, उलट तुम्हांला त्यांत जर अभिमान वाटत असेल तर, तुम्ही आपल्या जवळचे पैसेच देऊन भागणार नाहीं तर तुमचीं रत्नाभरणेंहि तुम्हीं मला दिलीं पाहिजेत. इतर ठिकाणच्या भगिनींनीं असेंच केलें आहे. स्त्रियांना दागिन्यांनीं मढलेल्या जेव्हां मीं पाहतों तेव्हां माझे भुकेले डोळे त्यांच्या दागिन्याकडे लागतात. दागिन्यांची मागणी करण्यांत माझा दुसराहि एक अंतस्थ हेतु आहे, तो म्हणजे स्त्रियांचें मन दागिन्यांच्या आणि रत्नाच्या लालसेपासून परावृत्त करणें हा. आणि इतर भगिनींच्या बाबतींत जसा मी मोकळेपणानें वागतों तसेंच वागायचें तर मी तुम्हांला एक विचारूं ? पुरुषापेक्षां स्त्रीनें स्वतःला अधिक सजविण्याचें कारण काय ? पुरुषाला खूष करण्याकरितां, असें माझ्या मैत्रिणींनीं मला सांगितलें आहे. भगिनींनों, जगाच्या कारभारांत जर तुम्हांला तुमची कामगिरी बजवायची असेल तर मी तुम्हांला सांगतों, पुरुषाला खूष करण्या-

करितां नटण्याचें तुम्ही नाकारलें पाहिजे. मी जर स्त्री असतों तर, स्त्री ही आमच्या हातचें खेळणें होण्याकरितां जन्माला आली आहे अशा तऱ्हेच्या पुरुषाच्या कसल्याहि आढ्यताखोरीविरुद्ध मी बंड पुकारलें असतें. स्त्रीच्या हृदयांत हळूच शिरण्याकरितां मी मनानें स्त्रीच बनलों आहें. माझ्या पत्नीशीं मी ज्या प्रकारें वागत असे त्यांत सुधारणा करण्याचें ठरवीपर्यंत मी तिच्या अंतःकरणांत शिरूं शकलों नाहीं, म्हणून मी तिचा पती म्हणून माझे जे कांहीं हक्क म्हणायचे ते सर्व सोडून दिले आणि असें करून तिचे सर्व हक्क तिला परत दिले. आणि आज तुम्हाला ती माझ्याइतकीच साधी असलेली दिसत आहे. तिच्या अंगावर माळ किंवा भपकेदार पोषाख तुम्हांला दिसत नाहीं. तसें तुम्हीं व्हावें असें मला वाटतें. आपल्या लहरींच्या, आवडीनिवडीच्या त्याचप्रमाणें पुरुषांच्या तुम्ही कधींहि गुलाम होऊं नका. स्वतःचें शरीर नटवूं नका. अत्तरें आणि सुगंधी तेलें वापरूं नका. आपला योग्य असा सुवास सुटावा असें तुम्हांला वाटत असेल तर तो तुमच्या हृदयांतून येऊं द्या. मग तुम्हीं पुरुषांचेंच नव्हे तर साऱ्या मानवजातीचें मन आकर्षून घ्याल. तो तुमचा जन्मजात हक्क आहे. पुरुष हा स्त्रीच्या पोटींच जन्माला आला आहे, तिच्या हाडामासांचा तो बनलेला आहे. तुम्ही शुद्धीवर या आणि तुमचा संदेश पुनः एकदां जगाला द्या.

चवाळ्या आणि निळीच्या मळ्यांतील तुमच्या भगिनींची काय भयानक अवस्था आहे, तुम्हांला माहीत आहे ? आपल्या बहिणी म्हणून त्यांना वागवा, त्यांच्यांत जाऊन मिसळा. आणि तुम्हांला जें स्वच्छतेचें अधिक ज्ञान आहे त्याचा आणि तुमच्या बुद्धीचा उपयोग करून त्यांची सेवा करा. त्यांच्या सेवेंतच तुम्हाला सन्मान वाटूं द्या. आणि तुमच्या शेजारींच सेवेचें क्षेत्र पडलेलें नाहीं काय ? गुंड

पुरुष आहेत, दारूडे आहेत, समाजाला ते दहशत होऊन राहिले आहेत. त्यांच्यांत जा, मिसळा आणि त्यांना गुंडगिरीपासून परावृत्त करा. त्या मुक्तिसेनेच्या कांहीं मुली पहा कशा निर्भयपणें चोरांच्या, जुगारी लोकांच्या आणि दारुड्यांच्या अड्ड्यांत जातात, त्यांच्या हातींपायीं पडतात, आणि त्यांना शुद्धीवर आणतात. ही सेवाच तुमच्या अंगावर असलेल्या दागदागिन्यापेक्षां तुम्हांला अधिक सजवील. तुम्ही अशा रीतीनें बचत केलेल्या संपत्तीचा मग मी विश्वस्त होईन, आणि ती गरीबांत वांटून देईन. मी आतां तुम्हांला वेडेवांकडे चार शब्द सांगितले ते तुमच्या अंतःकरणांत वसोत हीच माझी प्रार्थना.

---

## कांहीं निश्चित त्याग करा : ३६

गांधीजींच्या हरिजन दौऱ्यांमध्यें मद्रासला एका मुलीनें त्याना त्यांच्या सहीसाठीं पांच रुपयांची नोट देऊं केली.

गांधीजी म्हणाले, " अं हं, बांगडी पाहिजे. "

त्या मुलीनें दोन्ही बांगड्या काढून दिल्या, आणि पांच रुपयांची नोटहि दिली.

" पण हे द्यायला तुमच्या वडिलांची परवानगी आहे काय ? वाटल्यास या बांगड्या परत घेऊन जा. "

त्या मुलीने एक बांगडी परत घेतली, व म्हणाली, " ही आठवण म्हणून राहू द्या माझ्याजवळ."

" पण दुसरी नवी बांगडी तुम्ही वडिलांच्याकडे मागणार नाहीं ना ?

" नाहीं. " तिनें स्पष्ट उत्तर दिलें.

" मग आतांची परत केलेली बांगडीहि असूं द्या माझ्याकडेच."

गांधीजी म्हणाले, व ती मुलगी हासत परतली. दुसरी एक मुलगी म्हणाली, " माझ्या वडिलांच्या परवानगीशिवाय कसं बर मी कांहीं देऊं ! "

" नका देऊं तुम्ही. पण तुमच्या वडिलांनीं सगळी स्वतंत्रता आपल्याकडेच ठेवून घेतली आहे वाटतं; तुम्हांला कांहींच दिली नाहीं ! "

नुकतेच लग्न झालेली दुसरी एक मुलगी म्हणाली, " मी तुम्हांला पैसे देईन, पण मला दागिने नाहीं देता यायचे. कारण ते दागिने दिले कीं, त्यांच्या जागीं दुसरे येणारच. ते तुम्हांला कांहीं आवडणार नाहीं. दागिने कायमचे सोडून द्यायची जेव्हा माझी तयारी होईल तेव्हांच मी ते तुम्हाला देईन."

तुमचं म्हणणं खरं आहे; मला तुमचे पैसे नको आहेत. पैसे काय, तुमच्या वडिलांकडे मागितले कीं मिळतील. मला तुमचे दागिने तुमच्याकडून हवेत; मात्र ते पुन्हा तुमच्या अंगावर येतां कामा नयेत ही माझी अट आहे. ज्या दिवशी आपण होऊन तुम्ही माझ्याकडे याल आणि आपले दागिने माझ्या हातीं ठेवाल त्या दिवसाची मी वाट पहात राहीन.

विजगापट्टण येथील भाषणात, स्त्रियानी कांही तरी निश्चित त्याग केला पाहिजे असे सांगताना गांधीजींचे हृदय भावनाकुल झाले होते. ते म्हणाले:

" हरिजनकार्य हें अग्नीसारखें आहे. अग्नीत जितकें तूप ओतावें तितकी त्याची भूक वाढते. तसें हरिजनकार्यासाठीं तुम्ही जितकें देतां तितकी त्या कार्याची गरज वाढते. जे या कार्यासाठीं दान करतात त्यांना लाभच होतो, त्यांची कधींहि हानि होत नाहीं. जे देत नाहींत त्यांची मात्र निःसंशय हानि होते. देण्यानें तुम्हांला पुण्य लाभेल. दिलें नाहींत तर स्वतःलाच गमवाल. कारण सवर्ण हिंदुजातींतील पुरुष आज युगानुयुगें हरिजनांचा छळ करीत आले आहेत; आणि आज आपल्याला जर दुर्भाग्याचे दिवस आले असतील तर त्याला हरिजनाशी होणारें आपलें वर्तनच पुष्कळ अंशीं कारणीभूत आहे याविषयीं मला शंका नाहीं. म्हणून आपल्या अंतःकरणांतून अस्पृश्यतेचें पिशाच्च हाकून लावा असें मी हिंदुस्थानच्या स्त्रियांना सांगत असतों. आपल्यापैकींच कांहीं लोकांना

आपण आपल्यापेक्षां हलके समजतों हा अन्याय आहे, पाप आहे. ईश्वराच्या या सृष्टींत कोणी उच्च नाहीं, कोणी नीच नाहीं आपण सारीं त्याचीं लेंकरें आहोंत. आईबापांच्या डोळ्यांना सारीं मुलें जशीं सारखीं तशींच ईश्वरालाहि हीं सारीं लेंकरें सारखींच असलीं पाहिजेत. म्हणून अस्पृश्यतेला धर्मामध्यें आधार नाहीं. असें जेव्हां मी म्हणतों तेव्हां त्या माझ्या सांगण्यावर तुम्ही संपूर्ण विश्वास ठेवा. आपल्या आजुबाजूला असलेल्या सर्व हरिजनांना तुमच्या अंतःकरणांत स्थान द्या. तुमच्या घरीं हरिजन मुलांना येऊं द्या; तुम्ही हरिजन वस्तींत जा; त्यांच्या मुलांबाळांची, घरादारांची काळजी घ्या; हरिजन स्त्रियांशीं आपल्या बहिणीप्रमाणें बोला चाला.

हें हरिजनकार्य हिंदुस्थानच्या स्त्रियांनींच हातीं घ्यावयाचें आहे. आणि आपण या ठिकाणच्या सर्व हिंदु महिला आपलें कर्तव्य कराल अशी मी आशा करतों. ज्यांना आपले सर्व, किंवा कांहीं थोडे, दागिने देण्याची इच्छा व शक्ति आहे त्यांनीं ते द्यावेत. मात्र या देणगीला एक अट आहे. कांहीं कां द्यानात, त्याच्याजागीं दुसरें तुमच्या अंगावर येतां कामा नये. या कार्यासाठीं आपलें स्वतःचें कांहीं अर्पण झालेलें आहे अशी भावना तुमच्या अंतःकरणांत जागृत व्हावीसें मला वाटतें. ती भावना रुपये अगर नोटा देऊन कांहीं येणार नाहीं. कारण ते पैसे तुमच्या वडिलांकडून किंवा पतीकडून आलेले असणार. पण दागिने ही मात्र तुमची स्वतःची मालमत्ता आहे, आपल्या पतीकडून किंवा वडिलांकडून नवे दागिने करून न घेण्याचें ठरवून जेव्हां तुम्हीं ते देतां तेव्हां तो त्याग निश्चित-पणें तुमचा असतो. तुम्ही सर्वांनीं माझ्या सांगण्याचा भावार्थ लक्षांत घेऊन असा निश्चित स्वरूपाचा त्याग करावा अशी माझी इच्छा आहे. ”

---

अत्यंत हृदयस्पर्शी असे अनेक प्रसंग पाहण्याचें भाग्य माझ्या घाईच्या जीवनक्रमांत मला लाभलेले आहे. कितीतरी विविध आणि भावमधुर अनुभव मला मिळाले आहेत. पण, हें लिहीत असतांना, हरिजनकार्यासाठीं मी हिंडत होतों त्या वेळीं जो एक प्रसंग घडला त्याहून अधिक हृदयस्पर्शी प्रसंग माझ्या आठवणींत दुसरा नाहीं. बदगरा येथील माझें भाषण मी नुकतेंच संपविलें होतें. त्या भाषणांत, हजर असलेल्या स्त्रियांना या कार्याकरितां दागिने काढून कां द्यावेत हें समजावून देऊन मी त्यांच्याकडे दागिन्यांची मागणी केली होती. भाषण संपवून मी जमलेल्या देणग्या विकूं लागलों होतों. इतक्यांत सोळा वर्षांची कौमुदी मंद गतीनें व्यासपीठावर आली. एक बांगडी काढून तिनें मला विचारलें, " आपली सही द्याल काय ? " मी सही देऊं लागलों तों दुसरीहि बांगडी पुढें आली. तिच्या दोन्ही हातांत एकेकच बांगडी होती. मी म्हटलें, "दोन्हीची गरज नाहीं. एक घेऊनसुद्धां मी सही देईन. "

यावर उत्तर म्हणून तिनें आपली सोन्याची मोहनमाळ काढली. ती काढणें कांहीं सोपें नव्हतें. तिच्या लांब सडक केसांतून ती सोडवून काढायची होती. पण मलबारीच तरुणी ती. चकित दृष्टीनें पहाणाऱ्या हजारों स्त्रीपुरुषांच्या समुदायापुढें हें सर्व करण्याला तिला बेगडी लज्जा वाटली नाहीं.

मी विचारलें, " तुझ्या वडिलांची तुला परवानगी आहे काय ? "

तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. कारण तिचा त्याग अद्यापिहि पूर्ण झाला नव्हता. तिचे हात आपोआप कानाखालीं गेले व लोकांच्या टाळ्यांच्या कडकडाटांत कानांतील रत्नजडित कुंडलें बाहेर आलीं. लोकांच्या आनंदाला आतां पारावार राहिला नाहीं.

मी तिला पुन्हां विचारलें, " हा त्याग करण्याला तुझ्या वडिलांची परवानगी आहे काय ? "

त्या लाजऱ्या मुलीच्या तोंडून उत्तर बाहेर पडण्यापूर्वींच कोणी-तरी मला सांगितलें कीं, तिचे वडील सभेंतच हजर आहेत. मी लिलांव करीत असलेल्या मानपत्रावर रक्कम बोलून ते स्वतः मला मदत करीत आहेत आणि योग्य कार्याला दान करण्यांत मुलीप्रमाणेंच तेहि सढळ आहेत. मी कौमुदीला बजावलें कीं, तूं आतां परत अंगावर दागिने घालतां कामा नयेत. ती अट तिनें निश्चयपूर्वक मान्य केली. तिच्या हातीं सही देतांना त्या सहीच्या पूर्वी, " तूं केलेला त्याग हाच तूं टाकून दिलेल्या दागिन्यापेक्षां अधिक खरा दागिना आहे. " असें लिहिल्याशिवाय मला राहवलें नाहीं. तिचा हा त्याग म्हणजे ती खरी हरिजन सेविका असल्याचा निसाराच होता असें ठरो !

—गांधीजी

—:०:—

कालिकत येथे गांधीजींच्या मुक्कामाच्या शेवटच्या दिवशी कौमुदी आपल्या वडिलाना बरोबर घेऊन गाधीजींना भेटायला आली. बदगरा येथें गांधीजी-बरोबर मी गेलो नसल्यामुळे कौमुदीला मी येथेच प्रथम पाहिलें. तिच्यांत कृत्रिमपणा कसलाच दिसत नव्हता. ती बोले अगदी हळूहळू पण बहुतेक स्तब्धच राही. गांधीजींना तिच्या त्यागाच्या बाबतीत अधिक जाणून घेण्याची इच्छा होती. त्यांनी विचारले,

" सभेला येण्यापूर्वीच दागिने देऊन टाकण्याचा निश्चय तिनें केला होता कीं सभेंतच अकस्मात तिचा हा बेत ठरला ? "

तिचे वडील म्हणाले, " घरींच तिचा निश्चय ठरला होता. आमची परवानगीहि तिने मिळवून ठेवली होती. "

" पण तुला अशी लंकेची पार्वती बघून तुझ्या आईला वाईट वाटणार नाहीं काय ? "

" वाटेल, पण मी पुन्हां अंगावर दागिने घालावेत अशी सक्ती काही ती माझ्यावर करणार नाही अशी मला खात्री आहे. " कौमुदी म्हणाली.

" पण योग्य काळीं आतां तुझें लग्न होणारच, मग लग्न झाल्यावर तुझ्या नवऱ्याला तुझें हें दागिने न घालतां राहणें आवडणार नाहीं कदाचित. मग तूं काय करशील ? माझ्यासमोर एक मोठी नैतिक आपत्ति उभी राहिली आहे. तुझा त्याग खरोखर विलक्षण आहे. त्याबद्दल मी ' हरिजन ' मध्यें एक लेख लिहिला आहे. त्यांत मी म्हटलें आहे कीं तूं पुढें केव्हांहि दागिने वापरणार नाहींस. त्याला जर तुझी तयारी नसेल तर मग लेखाचा तेवढा भाग मला बदलावा लागेल. नाहीं तर भावी पतीच्या इच्छेलासुद्धां न जुमानतां तुला तुझ्या निश्चयावर अढळ राहवें लागेल. बाकी तूं मलबारी मुलगी आहेस, तुला तें साधेल. नाहीं तर, दागिने न घातले तरी तुला पसंत करणारा नवरा तुला शोधावा लागेल. तुला काय वाटतें ते मोकळेपणानें मला सांग. "

गांधीजीच्या बोलण्याचा आशय हळूहळू पूर्णपणे कौमुदीच्या लक्षांत आला. तिला करायला सांगण्यांत आलेली गोष्ट फार मोठी होती. फार महत्त्वाचा निर्णय तिला करायचा होता. थोडा वेळ शांतपणें तिनें चिंतन केलें, आणि मग एकच वाक्य ती बोलली. " दागिने घालण्याची सक्ती न करणाऱ्या पुरुषाबरोबरच मी लग्न करीन." गांधीजींच्या नेत्रांत आनंद झळकला.

" पूर्वीं एक अन्नपूर्णा मला मिळाली होती. तिचें लग्न झालें होतें तरी तिनें सर्व दागिने काढून टाकले होते आणि मरेपर्यंत तिनें तें आपलें व्रत सोडलें नाहीं. आतां तूं मला मिळालीस. "

आणि तेव्हांपासून कौमुदीच्या उदात्त त्यागाची कहाणी स्त्रियांना वरचेवर सांगण्याचा गांधीजींना कधींहि कंटाळा येत नाहीं.

—महादेव देसाई

---

## स्त्रियांचे खरे दागिने. : ३८

म्हैसूर येथे स्त्रीसमुदायापुढे केलेल्या भाषणात गांधीजी म्हणाले:—

" शील किंवा पावित्र्य हाच स्त्रीचा खरा दागिना आहे. धातू अथवा रत्नें हे केव्हांहि खरे दागिने नव्हत. सीता—दमयंती यासारख्या सतींचीं नांवें त्यांच्या निर्दोष पातिव्रत्यामुळेंच आपणांस प्रातःस्मरणीय वाटतात, त्यांच्या अंगावर कांहीं दागिने असले तरी त्या दागिन्यांमुळें कांहीं त्या पवित्र ठरलेल्या नाहींत. मी तुमच्याकडून दागिन्यांची मागणी करतों यांत देखील कांहीं खोल अर्थ आहे. ' दागिन्यांतून सुटका झाल्यामुळें आपल्याला फार बरें वाटतें. ' असें कितीएक भगिनींनीं मला सांगितलें आहे. एका नव्हे, अनेक दृष्टींनीं याला मी पुण्यकर्म म्हटलें आहे. गरीब, असहाय अशा लोकांना आपल्या संपत्तीचा भरपूर वांटा न देतां कोणाहि स्त्रीला अगर पुरुषाला आपल्याजवळ संपत्ति बाळगण्याचा अधिकार नाहीं. सामाजिक आणि धार्मिक दृष्टीनें तें कर्तव्यकर्म आहे; गीतेनें त्याला ' यज्ञ ' म्हटलें आहे. आणि जो हा यज्ञ करीत नाहीं त्याला 'चोर' म्हटलें आहे. गीतेंत यज्ञाचे पुष्कळ प्रकार सांगितले आहेत; पण गरीबांची आणि वडिलांची सेवा करण्याहून मोठा यज्ञ कोणता असूं शकेल ? आज तर आपल्यांतील उच्चनीचतेचे भेद विसरून जाऊन, ' माणसें तेवढीं सगळीं सारखीं हें ओळखणें याहून दुसरा महान् यज्ञच नाहीं. खरा साज शरीरावर धातूंचें व दगडांचें ओझें वागव

ण्यांत नाहीं, तर आपलें हृदय शुद्ध करून आत्म्याचें सौंदर्य वाढविण्यांत आहे. ही गोष्ट हिंदी स्त्रियांच्या गळीं उतरावी अशीहि माझी इच्छा आहे. त्यागाचें आणि सेवेचें उदात्त उदाहरण स्त्रियांच्या पुढें ठेवणारी पहिली स्त्री आंध्रमधील स्वर्गवासी श्रीमती अन्नपूर्णादेवी हीच मला भेटली. पहिल्याच दिवशींच्या भेटींत तिनें आपले एकदोन नव्हे सारे दागिने काढून दिले. ज्या स्त्रियांनीं हें दृश्य पाहिलें त्या चकित झाल्या. आणि मग दागिन्यांचा नुसता पाऊस पडला, आणि दागिने काढून टाकल्यामुळें, अन्नपूर्णादेवीचें सौंदर्य कमी झालें असें का तुम्हांला वाटतें ? उलट ती मला अधिकच सुंदर दिसूं लागली. इंग्रजी भाषेंत एक म्हण आहे. " ज्याची कृति सुंदर त्याचीच मूर्ति सुंदर " असा तिचा अर्थ आहे.

---

## आंध्रमधील एक दुःखदायी अनुभव. : ३९

कोकानाडा येथें, प्रचंड सार्वजनिक सभा झाल्यानंतर, मी जेव्हां रात्रीं ९ वाजतां माझ्या मुक्कामाकडे परतलों तेव्हां कांहीं स्त्रिया आणि मुली मला भेटायला आल्या होत्या. मी आंत शिरलों तेव्हां उजेड बराच अंधुक होता. त्या स्त्रियांची हालचाल आणि मुद्रा कांहीं चमत्कारिक वाटत होती. ‘ हं, तुम्ही कांततां कीं नाहीं ? टिळक स्वराज्य फंडासाठीं तुम्ही मला काय देणार ? ’ हे नित्याचे भेटीचे पहिले प्रश्न माझ्या तोंडांत येईनात. ‘ या स्त्रिया कोण ’ असें मी घरवाल्यांना विचारलें. त्यांनाहि माहीत नव्हतें. त्यांनीं चौकशी केली, आणि भीतभीतच उत्तर आलें, ‘ आम्ही नायकिणी आहोंत ’ पृथ्वी मला पोटांत घेईल तर बरें असें मला झालें. त्यांच्या व्यवसायिक जीवनाच्या प्रारंभीं एक विधि असतो असें सांगून घरधन्यांनीं मला शांत करण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें तर माझी स्थिति जास्तच केविलवाणी झाली. त्या धिक्कारणीय गोष्टीला त्यामुळें प्रतिष्ठेचें स्वरूप आलें. मी उलटतपासणी केली. त्यांनीं अत्यंत सौजन्ययुक्त शब्दांत सांगितलें कीं ‘ आम्ही दर्शन घ्यायला आलों आहों. ’

“ त्या दुसरा कांहीं धंदा करतील काय ? ”

“ हो, त्यांतून जर आमचा निर्वाह झाला तर आम्ही करूं. ”

तेथल्या तेथेंच संभाषण संपवून त्यांना रजा द्यावी असें मला वाटेना. माझ्या जातीची मला लज्जा वाटली. राजमहेंद्री या

मुक्कामाच्या ठिकाणीं मी यासंबंधीं स्पष्ट बोललों. आंध्रमधील हा अत्यंत दुःखदायी अनुभव होता. हिंदुस्थानांतील इतर भागांतसुद्धां हें पाप या ना त्या रूपानें अस्तित्वांत आहे असें मला वाटतें. आत्मशुद्धीतूनच जर स्वराज्य आपण मिळविणार असलों तर स्त्रियांना आम्ही आमच्या इंद्रियलालसेचें भक्ष्य बनवितां कामा नये, एवढेंच मी म्हणेन. दुर्बलांचें संरक्षण करण्याचा कायदा या ठिकाणीं विशेषेंकरून लागू होतो. गोरक्षणामध्यें स्त्रियांच्या पावित्र्याचेंहि रक्षण आहे. स्त्रियांना आपल्या आयाबहिणीमुलींप्रमाणें आपण आदरानें वागवायला जर शिकलों नाहीं तर हिंदुस्थानचें पुनरुत्थान होणार नाहीं. आमच्यामधील माणुसकीला मारून आम्हांला जंगली बनविणारीं पापें आपण धुवून काढून स्वच्छ होऊं या.

---

# पतिता भगिनी. : ४०

आपली लाज विकून पोट भरणाऱ्या स्त्रियांना भेटण्याचा माझा पहिला प्रसंग म्हणजे आंध्र प्रांतांतील कोकोनाडा येथें. तेथें तशा पांच सहा स्त्रियांशींच माझी कांहीं क्षण भेट झाली. दुसरा प्रसंग बारिसाल येथें आला. तेथें मात्र मुद्दाम वेळ ठरवून घेऊन शंभरच्या वर स्त्रिया मला भेटल्या. त्यांनीं आधीं पत्र पाठवून मुलाखतीची परवानगी विचारली होती; व त्या पत्रामध्यें, आपण काँग्रेसच्या सभासद झालों आहोंत, टिळक स्वराज्य फंडासाठीं देणग्या दिल्या आहेत असें म्हणून, वेगवेगळ्या काँग्रेस कमिटयांत तुम्ही अधिकारपदें घेऊं नयेत असा आपण आम्हांला सल्ला कां दिलांत हें आम्हांस समजत नाहीं,' असें लिहिलें होतें. " आमच्या पुढच्या जीवनाचें सार्थक व्हावें यासाठीं आम्ही काय करावें या बाबतींत आपला सल्ला पाहिजे. " असें त्यांनीं पत्राच्या शेवटीं म्हटलें होतें. ज्या सद्गृहस्थांनीं तें पत्र माझ्या हातीं दिलें त्यांनीं तें ' देऊं कीं नको, मला तें बरें वाटेल कीं नाहीं,' अशी कांकूं करीतच तें दिलें. पण मी त्यांना धीर दिला. " या भगिनींची जर कांहीं कोणत्या रीतीनें मला सेवा करतां आली तर ती करणें हें मी माझें कर्तव्य समजतों " अशी मी त्यांना खात्री दिली.

या भगिनींच्या सांनिध्यांत गेलेले माझे ते दोन तास माझ्या आठवणींत कायमचे राहिले आहेत. बारिसालच्या एकंदर २०००० लोकवस्तीमध्यें आपली संख्या ३९० आहे असें त्यांनीं सांगितलें. ही संख्या बारिसाल येथील पुरुषांचा कलंक दाखवीत आहे. जितक्या लवकर हा कलंक नाहींसा होईल तितकी बारिसालची थोर कीर्ति उज्ज्वल होईल. जी स्थिति बारिसालची तीच इतरहि शहरांची समजावी. म्हणून बारिसालचें नांव मी उदाहरणादाखल घेतलें. या भगिनींची सेवा करण्याचा विचार ठरविण्याचें श्रेय बारिसालच्या कांहीं तरुणांना आहे. या पापाचें निर्मूलन करण्याचें श्रेयहि बारिसालला लवकरच लाभेल अशी मी आशा करितों.

ज्या कांहीं वाईट गोष्टी माणसानें स्वतःच निर्माण करून ठेवल्या आहेत त्या सर्वांत मानवजातीच्या उत्तम अंगाशीं म्हणजे स्त्रीजातीशीं ( त्यांना मी ‘ अबला ’ म्हणणार नाहीं ) त्यानें जो कुव्यवहार केला आहे त्याच्याइतकी अधोगामी, अघोर किंवा पशुतुल्य अशी दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं. स्त्री आणि पुरुष या दोहोंमध्यें स्त्रीजात ही अधिक थोर आहे, कारण आज देखील आत्मबलिदानाची, मूक सहनशक्तीची, नम्रतेची, श्रद्धेची आणि ज्ञानाची ती मूर्ति आहे. ज्ञानाचा गड्डा काय तो आमच्याजवळच आहे या पुरुषांच्या वृथाभिमानाच्या निराधार कल्पनेपेक्षां स्त्रीची उपजत बुद्धीच पुष्कळवेळां अधिक फलदायी ठरलेली आहे. रामाच्या नांवापूर्वी सीतेचें किंवा कृष्णाच्या नांवापूर्वी राधेचें नांव घेतलें जातें त्याला अर्थ आहे· सुधारलेल्या युरोपांतील कांहीं देशांत वेश्याव्यवसायाला तेथील सरकारानीं कायदेशीर मान्यता दिली आहे आणि तो सर्वत्र जोरांत सुरू आहे म्हणून त्याला आमच्या उत्क्रांतीच्या क्रमांत स्थान आहे असें समजून स्वतःची फसवणूक न करून घेतलेली बरी. त्याचप्रमाणें

हिंदुस्थानांतलि गतकालाचीं उदाहरणें घेऊनहि हें दुष्कृत्य आपण पुढें चालुं ठेवतां कामा नये. ज्या क्षणीं आपल्याला दुष्कृत्य व सत्कृत्य यांतील भेद कळेनासा होतो आणि आपण आपल्याला पूर्णपणें माहीत नसलेल्या गतकालाची गुलामी वृत्तीनें री ओढीत राहतों, त्याचक्षणीं आपली उन्नति थांबते. गतकालांत जें जें कांहीं उदात्त व उत्तम होतें त्याचे आम्ही वारसदार आहोंत, त्याचा आम्हांला अभिमान वाटतो. जुन्या चुकाच पुढें चालू ठेऊन आपण आपल्या या वारसदारीला काळीमा लावतां कामा नये. स्वाभिमानी हिंदुस्थानांत प्रत्येक स्त्रीच्या शीलाची आपल्या स्वतःच्या बहिणीच्या शीलाइतकीच चिंता वाहणें प्रत्येक पुरुषाचें कर्तव्य नाहीं काय ? हिंदुस्थानच्या प्रत्येक रहिवाशाला आपला भाऊ किंवा बहीण मानण्याइतकी भावना मोठी होणें यालाच स्वराज्य म्हणावयाचें.

असें असल्यामुळें, या शंभर भगिनींना पाहून पुरुष या नात्यानें मी लाजेनें मान खालीं घातली. त्यांतल्या कांहींजणी वयस्क होत्या; बहुतेक वीस ते तीस वर्षांच्या दरम्यानच्या होत्या; दोन तीन बारा वर्षांखालच्या मुली होत्या. त्या सर्वांमध्यें मिळून सहा मुली व चार मुलगे होते असें त्यांनीं सांगितलें. त्यांतल्या सर्वांत वडील मुलाचें त्यांच्याच ज्ञातींतील एका मुलीशीं लग्न झालें होतें. आपल्याला दुसरें कांहीं करणें शक्य झालें तर बरेंच, नाहींतर आपलें आयुष्य गेलें तसेंच त्याहि मुलींचें आयुष्य त्या बनविणार होत्या. आपलें आयुष्य दुर्दैवी, त्यांत कसची सुधारणा घडून येणार, असें त्यांना वाटावें हें हृदयांत खंजीर खुपसण्यासारखें मला वाटलें. तरी त्या बायांत विनय होता, बुद्धि होती. त्यांचें बोलणें संभावितपणाचें होतें, त्यांचे जबाब स्वच्छ व सरळ होते. त्यावेळीं तरी निदान त्यांचा निश्चय कोणत्याहि सत्याग्रह्याच्या निश्चयाइतका अढळ होता. त्यांच्यापैकीं अकरा जणींनीं

‘ आजचा आयुष्यक्रम आम्ही सोडून देऊं व मदत मिळाली तर, उद्यांपासून विणकाम व कांतण सुरू करूं ’ असें वचन दिलें. बाकी-च्यांनीं विचार करून सांगू म्हणून सांगितलें. कारण मला फसवण्याची त्यांची इच्छा नव्हती.

हें काम बारिसालच्या नागरिकांचें आहे. हिंदुस्थानांतील सर्व सच्च्या सेवकांचें—पुरुषांचें तसेंच स्त्रियांचें—हें काम आहे. २० हजार वस्तीमध्यें ३५० अशा अभागी भगिनी आहेत, तर त्या हिशेबानें सबंध हिंदुस्थानांत त्यांची संख्या ५२५०००० होईल. परंतु हिंदु-स्थानची चार पंचमांश जनता खेड्यापाड्यांत राहात असलेनें व ती शेतकरीच असल्यानें तिला या पापाचा स्पर्श झालेला नसावा अशी मी माझी समजूत करून घेतों. म्हणून सबंध हिंदुस्थानांत आपलें शील विकून पोट भरणाऱ्या स्त्रियांचा आंकडा कमींत कमी १०५०००० इतका होईल. या अभागी स्त्रियांना त्यांच्या अधो-गतीपासून परतविणें शक्य होण्यापूर्वीं दोन गोष्टी झाल्या पाहिजेत. आपण पुरुषांनीं आपले विकार जिंकण्यास शिकलें पाहिजे, आणि या स्त्रियांना अब्रूनें व मानानें जगतां येईल असा एखादा धंदा शोधून दिला पाहिजे. असहकाराच्या चळवळीनें जर आपली शुद्धि झाली नाहीं व आपल्या दुष्ट विकारांना ताब्यांत आणतां आलें नाहीं तर त्या चळवळीचा कांहींच उपयोग नाहीं. आणि गर्दी न होतां सर्वांना करतां येण्याजोगा धंदा म्हणजे सूत काढणें व विणकाम हाच होईल. या भगिनींनी, म्हणजे त्यांच्यापैकीं बहुसंख्य स्त्रियांनीं, लग्नाचा विचार करण्याची गरज नाहीं. तो आपण करूं शकत नाहीं हें त्यांनाहि कबूल झालें. अर्थात त्यांनीं भारताच्या खऱ्या संन्यासिनी बनलें पाहिले. सेवेव्यतिरिक्त इतर चिंता मागें नसल्यामुळें त्यांनीं मनमोक्त कांतावें, विणावें. १०५०००० बायकांनीं रोज ८ तास

तत्परतेनें विणणें म्हणजे कंगाल हिंदुस्थानची दररोज तितक्या रुपयांची प्राप्ती झाली. आपण रोज दोन रुपये तरी मिळवतो असें त्या म्हणाल्या. पण त्यांनीं हेंहि कबूल केलें कीं पुरुषांची वासना तृप्त करण्यासाठीं त्यांना जी कित्येक गोष्टींची गरज लागते ती आतां विणकाम व सूत काढणें सुरू केल्यावर स्वाभाविक आयुष्यक्रमांत परत शिरल्यानें मुळींच उरणार नाहीं. आमची मुलाखत संपत याव-याच्या वेळीं, आपलें पापी जीवन जोंपर्यंत त्यांनीं सोडलें नाहीं तोंपर्यंत, कॉंग्रेस कमिट्यांमध्यें अधिकाराच्या जागा त्यांना कां घेतां येणार नाहींत हें मी न सांगतांच त्यांना समजून चुकलें. स्वराज्याच्या पवित्र वेदीवर हृदय आणि आचरण पवित्र असल्याशिवाय कोणालाहि पुरोहित होतां यावयाचें नाहीं.



## आपल्या अभागी भगिनी : ४१

दक्षिण हिंदुस्थानांत मला मिळालेल्या मानपत्रांमध्यें देवदासींतर्फे मिळालेलें मानपत्र अत्यंत हृदयस्पर्शी होतें. 'वेश्या' या शब्दाला 'देवदासी' हें दुसरें सौम्य नांव आहे. तें मानपत्र ज्या मंडळींनीं करून आणलें होतें ती मंडळी, ज्या कुळांतून या दुर्दैवी भगिनी 'देवदासी' म्हणून तयार केल्या जातात, त्या कुळांतीलच होती. मानपत्र घेऊन येणाऱ्या शिष्टमंडळाकडून मला असें कळलें कीं या बाबतींत आंतून सुधारणा सुरू आहे. पण प्रगति अजून फारच सावकाश होत आहे. शिष्टमंडळांतील प्रमुख गृहस्थांनीं सांगितलें कीं सर्वसाधारण लोक या सुधारणेच्या बाबतींत उदासीन आहेत. या बाबतीत पहिला धक्का मला कोकोनाडला मिळाला. आणि तेथील लोकांपुढें बोलतांना मागेंपुढें न पाहता मी स्पष्ट स्पष्ट बोललों. दुसरा धक्का बारिसाल येथें मिळाला. तेथें अशा पुष्कळ दुर्दैवी भगिनी मला भेटल्या. त्यांना देवदासी म्हटलें काय किंवा दुसरें कांहीं म्हटलें काय, सारखेंच आहे. पुरुषाच्या वासनेपायीं कितीएक स्त्रियांना आपलें शील विकावें लागावें, ही गोष्ट अत्यंत लज्जास्पद व खेदाची आहे, लांछनास्पद आहे. कायदे पुरुष घडवितो, 'अबला', म्हटल्या जाणाऱ्या स्त्रीजातीवर त्यानें जी ही अवदशा लादली आहे त्याबद्दल त्याला भयंकर प्रायश्चित भोगावें लागेल. पुरुषांच्या मोहपाशांतून स्त्रिया जेव्हां पूर्णपणें सुटतील, आपली मान ताठ करून त्या चालूं लागतील

आणि पुरुषानें केलेल्या कायद्यांच्या व संस्थांच्या विरुद्ध बंड पुकारतील तेव्हां त्याचे तें बंड अहिंसात्मक असलें तरी, परिणामकारी झाल्या-खेरीज राहाणार नाहीं. आपल्या बेकायदेशीर आणि अनैतिक वासनापूर्तीसाठीं ज्यांना लज्जाहीन जिणें कंठावें लागत आहे अशा हजारो भगिनींच्या दुर्दैवाचा थोडा तरी विचार हिंदुस्थानांतील पुरुषानें करावा. आणि दुःखाची गोष्ट अशी कीं ही नीतिविघातक वेश्यागृहें धुंडणारे लोक विवाहित असतात त्यामुळें ते दुहेरी पाप करितात. जिच्याशीं एकनिष्ठ राहूं म्हणून त्यांनी शपथ घेतलेली असते त्या आपल्या धर्मपत्नीच्या बाबतींत ते पाप करतात. तसेंच ज्याच्या शीलाचें रक्षण आपल्या रक्ताच्या बहिणीच्या शीलरक्षणा-इतकेंच तीव्रपणें करण्याला ते बांधलेलें आहेत, त्या आपल्या भगि-नींच्या बाबतींतहि ते पाप करतात जर आम्ही हिंदुस्थानच्या पुरुषांनीं, आपली प्रतिष्ठा ओळखली तर हा अनाचार एक दिवसहि टिकूं शकणार नाहीं.

अत्यंत प्रतिष्ठित अशा आपल्या लोकांपैकीं अनेकजण जर या दुराचारांत रुतले नसते तर, एखाद्या भुकेलेल्या माणसानें केलें चोरावीं किंवा एखाद्या पोरानें पैशाची गरज आहे म्हणून खिसे कापावेत अशा तऱ्हेच्या गुन्ह्याहून फार मोठा, असा हा व्यभिचाराचा गुन्हा ठरला असता. समाजाला अनिष्ट किंवा अधिक घातक कोणती गोष्ट आहे ! मालमत्ता चोरणें कीं सतीचें शील चोरणें ? वेश्या ही आपलें शील विकण्याच्या कामीं स्वतः सामील असते तसा, शर्यतीच्या मैदानावर ज्या लक्षाधीशाचा खिसा कापला जातो तो लक्षाधीश त्या चोरींत स्वतः सामील असत नाहीं असा युक्तिवाद कोणी करूं नये. कोण अधिक वाईट ? खिसेकापू पोर कीं आपल्या सावजाला गुंगीचें औषध देऊन त्याची सारी मालमत्ता आपल्याकडे घेऊन टाकणाऱ्या

कागदावर त्याची सही घेणारा एखादा हलकट माणूस? पुरुष आपल्या न कळणाऱ्या अशा सूक्ष्म आणि निर्लज्ज कल्पनांनीं स्त्री-मधील अत्यंत उदात्त प्रेरणेचा प्रथम अपहार करून मग तिच्याविरुद्ध करावयाच्या गुन्ह्यात तिला आपली साथीदारीण बनवीत नाहीं काय? कीं पंचम या अस्पृश्य समजल्या गेलेल्या जातीप्रमाणेंच कांहीं स्त्रिया अशा प्रकारचें हीन जीवन घालवण्यासाठीं म्हणूनच जन्माला येतात? मी वर लिहिलें त्यांतील भावार्थाचा प्रत्येक विवाहित वा अविवाहित तरुणानें विचार करावा. या सामाजिक विकृतीसंबंधीं—या नैतिक महारोगासंबंधीं—मला जें कांहीं समजलें आहे तें सर्वच मला येथें लिहितां येणार नाहीं, कल्पनेनेंच ज्यानें त्यानें बाकीच्या गोष्टी जाणून घ्याव्यात. आणि जर तो स्वतःच गुन्हेगार असेल तर त्याविषयीं भय आणि लज्जा धरून त्यानें त्यापासून दूर सरावें. प्रत्येक शुद्ध हृदयाच्या माणसानें आजुबाजूचें वातावरण शुद्ध ठेवण्याकरतां शक्य तें करावें—मग तो अथवा ती कोठें का असत ना—या दुसऱ्या कामाच्या बाबतींत 'वाचा वदे परी करणें कठीण' अशी स्थिति आहे; पण गोष्ट नाजूक आहे म्हणूनच सर्व विचारी माणसांचें इकडे लक्ष जाणें अवश्य आहे. अशा अभागी भगिनींमध्यें करावयाचें कार्य सर्वत्र तज्ज्ञ मंडळीकडे सोपविलें पाहिजे. माझी सूचना आहे ती वेश्यागृहांकडे जाणाऱ्या लोकांत काम करण्यासंबंधींची आहे.



## दुहेरी गुन्हा : ४२

नैतिक आचाराच्या बाबतींतील गलिच्छपणानें तर गांधीजींच्या हृदयाला अधिकच खोल जखम झाली. आपल्या आप्तस्वकीय पुरुषांमध्येंच त्या स्त्रिया बसल्या होत्या. रूढी राक्षसीने त्यांना ज्या परिस्थितींत टाकले होतें, त्या परिस्थितींतून बाहेर निघण्याकरितां काय करावें हे दोघांनाहि कळेनासें झालें होतें. हा देखावा करुणास्पद होता.

" आम्हांला कोणालाच तो धंदा आवडत नाहीं. पण पोट कसें भरायचें ?" हेंच सर्वांचे दीन गाऱ्हाणें होतें.

" समजा मी तुम्हाला येथून नेलें आणि भरपूर अन्न, वस्त्र, शिक्षण आणि स्वच्छ वातावरण दिलें तर तुम्ही हें लज्जास्पद जिणे सोडून देऊन माझ्या बरोबर याल काय ? "

गांधीजींनीं विचारलें.

त्या 'होय' म्हणाल्या, पण गांधीजी त्या बाबतींत भ्रमात नव्हते. त्यांनीं आपल्या भाषणांत हा विषय काढला आणि दोषी लोकांच्या निद्रिस्त विवेकबुद्धीवर जळजळीत शब्दांनीं डागण्या ओढल्या. ते म्हणाले.

" त्या मुलींच्याशीं बोलत असतांना आणि त्या वस्तूंमधील गूढार्थ समजून घेत असतांना लहान लहान मुलींना अनैतिक कारणाकरितां वाहून टाकण्याच्या चालीच्या विरुद्ध माझा आत्मा खळबळून उठला. त्यांना ' देवदासी ' असें म्हणून धर्माच्या नांवानें आपण प्रत्यक्ष ईश्वराचा अपमान करीत आहोंत आणि या आपल्या भगिनींचा उपयोग आपली भोगलालसा तृप्त करण्यासाठीं करून घेत

असतांनाच ईश्वराचें नांव घेऊन आपण दुहेरी गुन्हा करीत आहों. अनैतिक उपयोगाकरितां अशा प्रकारचा लोकांचा एक स्वतंत्र वर्ग असावा, आणि त्याच्या या बीभत्स अनीतीकडे कानाडोळा करणारा दुसरा एक वर्ग असावा, हे विचार मनांत आले म्हणजे जीवनाविषयांचीं निराशा वाटूं लागते. आणि मी तुम्हांला खात्रीपूर्वक सांगतों कीं त्यांच्याशीं बोलत असतांना त्यांच्या डोळ्यांत यत्किंचितहि पाप नाहीं, आणि दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीप्रमाणें त्यांच्यांतहि निर्मल भावना आणि निर्मल शील असूं शकतें, असें मला दिसून आलें. त्याच्यात आणि आपल्या सख्ख्या बहिणींत काय फरक आहे ? आमच्या स्वतःच्या बहिणींचा जर आम्ही अनैतिक कारणांकरिता उपयोग करूं देणार नाहीं तर यांचा तरी तसा उपयोग करूं देण्याची आम्हांला कशी छाती होते ? या गोष्टींशीं ज्या हिंदूंचा कशाहि प्रकारें कोणताहि संबंध आला असेल, त्यांनी समाजांतून हा रोग काढून त्याला शुद्ध करावें. मी या स्त्रियांना जें वचन दिलें आहे तें जर मी पूर्ण केलें तर त्यांच्यापैकीं पुष्कळशा स्त्रिया आपलीं चरित्रें सुधारतील. पण जर त्या तसें करूं शकल्या नाहींत तर मी त्याना दोष न देतां त्या ज्या समाजांत रहात आहेत त्या समाजालाच-दोषी धरीन. या भगिनींना बंधुत्वाचा हात पुढें करणें हें तुमचें काम आहे; लज्जास्पद जीवनातून निघून त्या वाटेवर येत आहेत इकडे लक्ष पुरविणें तुमचें काम आहे. मोहाशीं समोरासमोर पुनः जेव्हां त्यांची गांठ पडेल तेव्हां त्याला विरोध करणें त्यांना कठीण जाईल हें मी जाणतों. पण पुरुष जर आपली भोगलालसा आवरील आणि सारा समाज या दुष्कृत्याला विरोध करण्यासाठीं उभा राहील तर समाजांतून ही पापप्रवृत्ति नाहींशी करणें सहज शक्य होईल."

—महादेव देसाई.

---

## "हरिजनांसारखीच आमची दशा" : ४३

एका देवदासीशीं लग्न केलेले आंध्र पदवीधर लिहितातः—

"आपल्याला पुष्कळ दिवसांपासून लिहावे म्हणतों, पण भयंकर लाज वाटत होती. परमेश्वरकृपेने शेवटीं आज मीं आपल्या मनावरचें ओझें आपल्यापुढें हलकें करीत आहे.

मी देवदासी जातींतला आहे. सामाजिक दृष्ट्या माझें आयुष्य वाया गेलें. महात्माजी, नायकिणींच्या धंद्यापेक्षां हीन धंदा या जगांत दुसरा असेल असे आपल्याला वाटतें का? व्यभिचार प्रत्यक्ष एका जातीच्या रूपानें अस्तित्वांत राहावा हा हिंदुस्थानाला कलंक नाही काय?

मला वाटते आंध्रदेश या दुष्ट प्रवृत्तीचा गाभा आहे. येथें हिंदुसमाज—विशेषतः लग्नसमारंभाच्या व देवीच्या उत्सवांच्या प्रसंगीं—नायकिणींना त्या पवित्र देवीसमोर अश्लील हावभाव करून तशींच अश्लील गाणीं म्हणण्याकरितां बोलावतो, आणि नवविवाहित जोडप्याला वाईट किस्ता वाटून देतो.

व्यभिचारी जीवनाला वाहिलेल्या या सबंध जातीची मोठी दैन्यावस्था आहे. ही पापप्रवृत्ति जाळून टाकण्याकरितां येथील तरुण मंडळी अतिशय खटपट करीत आहेत. पण त्यांना मदतीची आणि मार्गदर्शनाची फार गरज आहे. हरिजनोद्धाराच्या चळवळीइतकीच महत्त्वाची व तांतडीची म्हणून आपण ही बाब हातीं घेणार नाहीं काय? कृपा करून आपल्या अंतःकरणाच्या एका कोपऱ्यांत, सदोदित या बाबीला जागा द्या आणि ती लोकांपुढें मांडीत जा. आपल्या पाठीशीं फक्त कॉंग्रेसच नव्हे तर सबंध लोकमत उभें आहे. वेश्याव्यवसायाचे बिल किंवा इंडियन पिनलकोड जें करूं शकणार नाहीं तें आपल्या एका शब्दानें होईल असा मला विश्वास आहे.

मी माझ्याच जातींतल्या एका मुलीशीं कायदेशीरपणें व धर्मविधीनें लग्न केलें आहे, आणि मला दोन मुली आहेत. कोणत्याहि हिंदु धर्मपत्नीइतकीच माझी पत्नी मला पवित्र दिसते. तरी समाज आमच्याकडे तुच्छतेनें पहातो. आमच्या वाडवडिलांची पापें आमचा सूड घेत आहेत. आम्ही दोघेंहि जरी वेश्याव्यवसायापासून मुक्त असलों तरी त्याचा डाग आम्हांला चिकटलेला आहे.

हरिजन आणि देवदासी या दोनच ज्ञाती अशा आहेत की त्याना जवळ जवळ सारख्याच प्रमाणांत दूषित समजलें जातें. अर्थात् त्यांनीं आपला नैतिक दर्जा आपणच सुधारला पाहिजे. तरी पण ते स्वतः करतील त्यापेक्षां आपल्यासारखा शिक्षक त्याना आणि समाजाला अधिक लवकर शिक्षण देऊ शकेल. या दोन सारख्याच चळवळी आहेत. हरिजनांविषयींच्या भरांत या दुसऱ्या तसल्याच ज्ञातिभगिनीला कृपा करून आपण विसरूं नका."

पत्रलेखक म्हणतो तशी शक्ति माझ्यात असती तर किती बरें झालें असतें! माझ्या मर्यादांची जाणीव होऊन मला वाईट वाटतें. पत्रलेखकाला कदाचित् माहीत नसेल कीं मी 'यंग इंडिया' चालवीत होतो त्या वेळीं वरचेवर देवदासीप्रथेसंबंधीं आणि सामान्यपणें वेश्याव्यवसायासंबंधीं लिहीत असें. पण माझ्या त्या प्रयत्नांनीं तें पाप कांहीं उखडलें गेलें नाहीं. फक्त कांहीं वैयक्तिक बाबतींत त्यामुळें क्लेशनिवारण होत असे इतकेंच. त्याच प्रश्नाचा 'हरिजन' मध्यें आज मी पुनः उल्लेख करीत आहे, तो 'यंग इंडिया'च्या कालापेक्षां कांहीं अधिक यश मिळेल अशी आशा धरून नव्हे. या ताज्या प्रयत्नानें जरी वैयक्तिक बाबतींत क्लेशनिवारण झालें तरी मला बरें वाटेल.

देवदासींचा प्रश्न हरिजन प्रश्नासारखाच आहे असें जें पत्रलेखकानें म्हटलें आहे तें बरोबर आहे. तरीपण त्या दोन्हींमध्यें जो फरक आहे तोहि त्याला कळून येईलच. पण दोघांच्या दैन्यावस्थेंत किती प्रमाणाचा भेद आहे हें मापीत बसणें म्हणजे वेळेचा अपव्यय आहे.

हिंदुधर्म जर निष्कलंक व्हावयाचा असेल तर अस्पृश्यतेप्रमाणेंच पाप टिकवून धरणारी ही संस्था नष्ट झालीच पाहिजे.

या पापापासून समाजाला सोडविण्याच्या उदात्त कार्यांत जे गुंतले आहेत, त्यांना पद्धतशीर रीतीनें काम करावें लागेल, त्यांच्या प्रयत्नांना तत्काळ यश आलेलें दिसलें नाहीं तरी त्यांनीं निरुत्साही होऊं नये. त्यांनीं आपल्या लगतच्या पापावर आपलें लक्ष्य केंद्रीभूत करावें. हा प्रश्न सोडविण्याचे दोन मार्ग आहेत. आपल्या हीन हेतु-पूर्तीस्तव जे देवदासींचा उपयोग करतात अशा लोकांमध्यें काम करणें, आणि खुद्द देवदासींमध्यें काम करणें. देवदासींनींच खुद्द समाजाचें दुर्व्यसन आपण पुरवायचें नाहीं असें ठरविलें तर ही पद्धति तत्काळ बंद होईल. पण हा क्रम वाटतो तितका सोपा नाहीं. भुकेल्या पोटाला पाप जाणवत नाहीं. भीष्मद्रोणाप्रमाणें देवदासीसुद्धा आपल्या पोटाकडे बोट दाखवून आपल्या पापाचें समर्थन करतात. आपल्या धंद्यांत पाप आहे ही त्यांची पापाविषयींची भावना संवयीनें मंद पडली आहे. म्हणून वेश्याव्यवसायाच्या ऐवजीं त्यांना निर्वाहाचें दुसरें निष्पाप साधन शोधलें पाहिजे. यानंतर समाजांमध्यें काम केलें पाहिजे. देवदासींना बोलावतात असे उत्सव आणि लग्नसमारंभ कुठें आहेत हें शोधून काढून जे या समारंभांचे पुढारी असतील त्यांची समजूत घातली पाहिजे. सुधारकांनीं समाजाला अधिकारवाणीनें सुधारणा करावयाला सांगून भागणार नाहीं. समाजाच्या बुद्धीला आणि हृदयाला त्यांना हात घालावा लागेल. एक प्रकारें सुधारणा म्हणून जेवढी आहे तेवढी सर्व एक तऱ्हेचें शिक्षणच आहे, सर्व-सामान्यपणें ज्याला शिक्षण म्हणून म्हणतात त्या शिक्षणाइतकेंच तेंहि महत्वाचें व आवश्यक आहे. म्हणून तें एक स्वतंत्र शास्त्रच

आहे, आणि पद्धतशीर रीतीनें त्याचा पाठपुरावा केला तरच त्याचे परिणाम पदरीं पडतात.

एका देवदासीशीं लग्न करण्याचें धारिष्टच दाखविल्याबद्दल पत्रलेखकाचें अभिनंदन करणें रास्त होईल. स्वतःच्या विवेकबुद्धीची प्रचिती मिळाली तर त्यानें तेवढ्यावर समाधान मानावें आणि आपल्या आणि पत्नीच्या बाबतींत समाजाचे जे वाईट ग्रह आहेत ते गिळून टाकावेत.

---

# भारतांतील महिलांना : ४४

प्रिय भगिनींनों,

लोकमान्य टिळकांच्या पुण्यस्मृतिनिमित्त ३१ जुलै रोजीं मुंबईत परदेशी कापडाची होळी करून ज्या परदेशी वस्त्रबहिष्काराला आपण सुरुवात केली, त्या बहिष्कारयज्ञाची पूर्ति पुढल्या ३० सप्टेंबर रोजीं करण्याचा ऑ. इं. काँ. कमिटीनें महान् निर्णय घेतला आहे. कपड्यांच्या त्या प्रचंड राशीला अग्नि देण्याचा मान मला मिळाला होता. त्या राशींत बहुमोल साड्या व आजपर्यंत तुम्हीं ज्यांना सुंदर समजत आलांत असे इतर वस्त्रालंकार होते; ज्या भगिनींनीं आपलीं बहुमोल वस्त्रें दिलीं त्यांनीं खरोखरीच योग्य व शहाणपणाची गोष्ट केली असें मला वाटतें. प्लेगदूषित वस्तू जाळून टाकणें हाच जसा त्याचा अर्थशास्त्रदृष्ट्या योग्य व उत्कृष्ट विनियोग, तीच गोष्ट विदेशी कपड्यांनाहि लागू समजावी. राष्ट्रपुरुषाच्या शरीरांत आणखीं रोग उत्पन्न होऊं नयेत यासाठीं आवश्यक अशी ती शस्त्रक्रिया होती.

गेल्या १२ महिन्यांत हिंदी महिलांनीं मातृभूमीप्रीत्यर्थ असामान्य कामगिरी बजावली आहे. नकळत ईश्वरी कृपा पसरविणाऱ्या देवदूताप्रमाणें तुम्ही मूकपणें काम केलें आहे. आपल्याजवळचे पैसे आणि उत्तमोत्तम दागदागिने तुम्ही देऊन टाकलेत. निधि जमविण्याकरितां

तुम्ही घरोघर हिंडलांत. तुमच्यापैकीं कांहींजणींनीं पिकेटिंगहि केलें. दिवसातून हजार वेळ तऱ्हतऱ्हेचे मूल्यवान् रंगीबेरंगी पोषाख अंगावर घालण्याची संवय असलेल्या तुमच्यांतील कांहीं स्त्रियांनीं आज शुभ्र, निष्कलंक पण जड वाटणारी खादी अंगावर घातली आहे. तो निष्कलंक शुभ्रपणा स्त्रीच्या हृदयांतील पावित्र्याची आठवण करून देणारा आहे. तुम्ही हें जें सारें केलेंत तें तुमच्या प्रिय मातृभूमीप्रीत्यर्थ केलेंत, न्यायाप्रीत्यर्थ केलेंत. तुमच्या वाचेला अगर कार्याला फसवणुकीचा वासदेखील नाहीं. रागद्वेषरहित असा हा तुमचा विशुद्ध त्याग आहे. मी तुमच्यापुढें कबूल करतों कीं, स्वयंस्फूर्तीनें आणि प्रेमभरानें तुम्ही हें जें सहकार्य दिलेंत, त्यावरून माझी खात्री झाली कीं, परमेश्वर आपल्या पाठीशीं उभा आहे. आमचा लढा हा आत्मबुद्धीचा लढा आहे. हें सिद्ध करण्याला, लाखों हिंदी महिलांनीं त्याला सक्रिय मदत केली, यावाचून आणखी दुसरा कोणता पुरावा पाहिजे?

तुम्ही आतांपर्यंत पुष्कळ दिलेंत, तरी आता तुमच्याकडून अधिकाची गरज आहे. टिळक स्वराज्यफंडाच्या वर्गणीचा मोठा हिस्सा बहुश: पुरुषांनींच उचलला. पण स्वदेशीचा कार्यक्रम पूर्ण होणें हें तुम्ही जर सर्वांत मोठा वांटा उचललात, तरच शक्य आहे. तुम्ही आपल्या जवळच्या परदेशी कापडाचा सर्वस्वी त्याग केल्याखेरीज बहिष्कार अशक्य आहे. तुमच्यांत जोंवर आवडीनिवडी आहेत तोंवर संपूर्ण त्याग अशक्य आहे. बहिष्कार म्हणजे संपूर्ण त्याग. ईश्वर बरींवाईट जीं मुलें आपणांस देतो त्याच मुलांवर संतुष्ट राहून आपण ईश्वराचें पाड नाहीं कां मानीत? तसेंच हिंदुस्थानात जें कांही कापड निर्माण होईल तसल्याच कापडावर आपण समाधान मानलें पाहिजे. परक्याला आपलें मूल कुरूप दिसलें म्हणून आईनें

त्याला फेंकून दिलें असें कधीं ऐकलें आहे काय? तशीच मनाची भावना हिंदुस्थानांतील देशाभिमानी स्त्रियांनीं आपल्या देशांत तयार झालेल्या मालाबद्दल ठेवली पाहिजे; आणि हातसुताच्या व हातविणीच्या खादीलाच फक्त तुम्ही हिंदुस्थानांत तयार झालेलें कापड मानलें पाहिजे, या संक्रमणकालांत जाडीभरडी खादीच बव्हंशीं आपणांला मिळेल. तुमच्या रुचीला आवडेल किंवा तुम्हांला अवश्य वाटेल अशा सार्‍या कलेची भर तुम्हांला घालायची असेल तर ती निच्यांतच तुम्ही खुशाल घ्याला. कांहीं महिने या जाड्याभरड्या खादीवरच जर तुम्ही समाधान मानलेंत तर ज्या आपल्या पूर्वजांच्या तलम, उंची, रंगीबेरंगी वस्त्राचा जगाला एक वेळ हेवा वाटत होता तशा वस्त्रांचें पुनरुज्जीवन होण्याच्या बाबतींत हिंदुस्थानाला निराश होण्याचें कारण पडणार नाहीं. आपल्या सुखसोयींचा आणखी ६ महिनेपर्यंत त्याग करण्याचा जर तुम्ही अभ्यास केलात तर तुम्हांला आढळून येईल कीं, आपण ज्याला आज कलात्मक समजतो तो केवळ आभास आहे, आणि खरी कला निव्वळ बाह्य आकारांतच नाहीं तर त्या आकाराच्या मागें जें लपलें आहे त्यांतहि आहे. एक कला मारणारी असते, एक तारणारी असते. खरोखरीच पहा, जें तलम कापड विलायतेहून किंवा जपानहून इकडे येतें त्यानें आपल्या लाखों बंधूभगिनींना अगदीं अक्षरशः मारलेलें आहे, आणि आपल्या हजारों प्रिय भगिनींना लाजिरवाणें जिणें कंठायला लाविलें आहे. खरी कला ही कलावंतांच्या हृदयांतील आनंदाची, समाधानाची आणि शुद्धतेची द्योतक असली पाहिजे. जर तुम्हांला आपल्या देशात अशा कलेचें पुनरुज्जीवन व्हावें असें वाटत असेल तर तुमच्यापैकीं ज्या स्त्रिया उच्चवर्गीय आहेत त्यांनीं आजच्या क्षणाला खादी वापरणेंच अवश्य आहे आणि स्वदेशीचा कार्यक्रम यशस्वी होण्या-

साठीं खादी वापरणेंच फक्त आवश्यक आहे असें नाहीं तर तुमच्या-पैकीं प्रत्येकीनें सवड सांपडेल तेव्हां सूत कांतणेंहि आवश्यक आहे. मी मुलांना आणि पुरुषांनासुद्धां सूत काढायला सांगत असतो. त्यांच्या-पैकीं हजारों लोक आज सूत काढीत आहेत. पण पूर्वीप्रमाणेंच आजहि सूत काढण्याची मुख्य जबाबदारी तुम्हां स्त्रियांवरच विशेष आहे. दोनशें वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांतील स्त्रिया स्वदेशाला लागणाऱ्या कापडापुरतेंच कांतीत नव्हत्या, तर परदेशाला लागणारें कापडसुद्धां त्यांच्या सुतांतून निर्माण होत असे. त्याचें सूत जाडेभरडेंच नसे तर जगांत आजवर कधीं निघालें नाहीं इतकें तलम सूत त्या कांतीत असत. आमच्या वाडवडिलांनीं कांतलेल्या सुताइतकें तलम सूत जगांतल्या एकाहि यंत्रावर अजून निघालेलें नाहीं. तेव्हां जर खादीची मागणी इतःपर आपल्याला पुरवावयाची असेल तर तुम्ही चरखा-मंडळें काढलीं पाहिजेत, सूत कांतण्याच्या चढाओढी लावल्या पाहिजेत, आणि हिंदीं बाजारपेठ हातसुतानें भरून टाकली पाहिजे. अर्थातच यासाठीं तुमच्यांतील कांहींजणींनी पिंजण्यांत, कांतण्यांत, चरखे दुरुस्त करण्यांत तरबेज झालें पाहिजे. याचा अर्थ तुम्ही अविश्रांत श्रम केलें पाहिजेत. सूत कांतण्याकडे आपल्या निर्वाहाचा धंदा म्हणून तुम्ही पाहूं नये. मध्यम वर्गांतील लोकांच्या बाबतींत कुटुंबाच्या उत्पन्नांत चरख्यामुळें थोडी भर पडेल. अगदीं गरीब बायांना मात्र तो निःसंशय पोटाचा उद्योग होईल. पूर्वीप्रमाणेंच चरखा हा विधवांचा आवडता सोबती व्हावा. पण ज्याना उद्देशून ही विनंति मी करीत आहे त्या तुम्ही त्याच्याकडे कर्तव्य म्हणून—धर्म म्हणून पाहिले पाहिजे. सुखवस्तु स्त्रियांनीं रोज जर थोडें थोडें कांतलें तर त्यामुळें सूत स्वस्त होईल, आणि जो तलमपणा आपल्याला त्यांत हवासा वाटतो तो इतर कोणत्याहि मार्गापेक्षां या मार्गानें अधिक लवकर येईल.

तेव्हां हिंदुस्थानची आर्थिक आणि नैतिक मुक्ति ही प्रामुख्यानें तुमच्यावरच अवलंबून आहे. राष्ट्राचें भवितव्य तुमच्या मांडीवर खेळते आहे. कारण तुम्हीच पुढील पिढीचें संगोपन करणार आहात. हिंदुस्थानच्या मुलांना साधीं, पापभीरू आणि शूर बनविण्याच्या दृष्टीनेंहि तुम्ही वाढवूं शकाल किंवा त्यांना अशक्त समजून, त्यांचे लाड करून आयुष्यांत उत्पन्न होणाऱ्या वादळांना शूरपणानें तोंड द्यावयाला अपात्र अशीं दुर्बळहि त्यांना बनवूं शकाल. त्यांना परदेशी छानछोकीची तुम्ही संवय लावलीत कीं मोठीं झाल्यानंतर त्या संवयींचा त्याग करणें त्यांना कठीण जाणारच. हिंदुस्थानचें भाग्य सरकारपेक्षां तुमच्या हातींच अधिक सुरक्षित आहे. सरकारनें हिंदुस्थानच्या साधनसंपत्तीची इतकी पिळवणूक केली आहे कीं हिंदुस्थान आत्मविश्वास गमावून बसला आहे. स्त्रियांच्या प्रत्येक सभेमध्यें राष्ट्रकार्याप्रीत्यर्थ मी तुमचे आशीर्वाद मागितले आहेत, आणि ते या श्रद्धेनें कीं तुम्ही शुद्ध, सरळ आणि दैवी वृत्तीच्या आहांत, तुमचा आशीर्वाद सफळ होणारच. विदेशी वस्त्रांचा त्याग करून आणि फावल्या वेळांत राष्ट्राकरितां अविश्रांतपणें सूत कांतून आपल्या आशिर्वादाला फळ येईल असें करा.

तुमचा निष्ठावत भाऊ—मो. क. गांधी,

---

वर्किंग कमिटीनें सविनय कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेणाऱ्यांना आतां सूत काढण्याची सक्तीची अट घातली आहे. त्यामुळें हिंदी स्त्रियांना देशसेवा करण्याची अपूर्व संधी लाभलेली आहे. मिठाच्या सत्याग्रहानें लाखो स्त्रियांना घरकुलांतून बाहेर पडायला लावलें आणि स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें देशाची सेवा करूं शकतात हें दाखवून दिलें. खेड्यापाड्यातील स्त्रियांना पूर्वी कधींहि मिळाली नव्हती एवढी प्रतिष्ठा आज मिळालेली आहे. साम्राज्यसत्तेचें जूं झुगारून देण्याच्या हिंदुस्थानच्या शांततामय चळवळींत चरख्याला पुनः त्याचें मध्यवर्ती स्थान लाभल्यामुळें हिंदी स्त्रियांना एक विशिष्ट दर्जा प्राप्त झाला आहे. सूत काढण्यांत स्त्रिया पुरुषापेक्षां जात्याच वरचढ असतात.

कालचक्राच्या सुरूवातीपासून स्त्रीपुरुषांमध्यें श्रमविभाग चालू आहे. ख्रिस्ती पुराणांत मूळ पुरुष आदाम विणीत असे आणि स्त्री ईव्ह ही कांतीत असे असें म्हटलें आहे. सूत काढणारे पुरुष विरळाच पंजाबमध्यें १९२०।२१ सालीं पुरुषांना जेव्हां मी सूत कांता म्हणून सांगे तेव्हां ते म्हणत ' सूत काढणें हें आम्हांला शोभत नाहीं. हें सर्वांशीं बायकांचें काम आहे. आम्ही तें करणें कमीपणाचें आहे. ' अलीकडे मात्र या कामाला कमीपणाच्या भूमिकेवरून ते विरोध करीत नाहींत. देशभक्तीनें प्रेरित होऊन जेव्हां पुरुषांनीं सूत काढा-

वयास सुरवात केली तेव्हां त्याचें एक शास्त्रच बनूं लागलें, आणि इतर क्षेत्रांप्रमाणेंच या क्षेत्रांतहि महत्त्वाचे शोध लागूं लागले. तरी पण अनुभवावरून असें दिसतें कीं सूत काढणें हें नित्य स्त्रियांचेंच काम राहणार; आणि असा अनुभव येण्याला सबळ कारणहि आहे असें मला वाटतें. कांतण्याची क्रिया मुळांतच मंद गतीनें व त्या मानानें शांतपणानें चालणारी क्रिया आहे. स्त्री ही तर त्यागाची आणि म्हणून अहिंसेची मूर्तीच आहे. त्यामुळें स्त्रीजातीचें कार्यहि युद्धापेक्षां शांति प्रस्थापित करण्याकडेच अधिक झुकणार. आज तिला हिंसक लढाईच्या कामासाठीं खेंचलें जात आहे. ही गोष्ट आधुनिक संस्कृतीला कांहीं भूषणास्पद नाहीं. हिंसा ही स्त्रीप्रकृतीच्या इतकी विरुद्ध आहे कीं थोडक्याच काळांत स्त्री आपल्या मूळ प्रकृतीला मारक होणाऱ्या या प्रकाराविरुद्ध बंड करील आणि पुरुषालासुद्धां आपल्या मूर्खपणाचा पश्चात्ताप करावयाला लावील असें वाटतें. स्त्रीपुरुषांची समानता म्हणजे कांहीं त्यांच्या व्यवसायांची समानता नव्हे. एखाद्या स्त्रीला शिकार खेळायची असेल अगर भालाफेंक करायची असेल तर त्याला कायद्याची आडकाठी असणार नाहीं हें खरें, पण जें केवळ पुरुषाचें काम तें करण्यापासून ती स्वभावतःच परावृत्त होते. निसर्गानें या ज्या दोन भिन्न जाती निर्मिल्या आहेत त्या परस्परांना पूरक व्हाव्यात म्हणून. त्यांच्या बाह्याकाराप्रमाणेंच त्यांच्या कामाचींहि स्वरूपें ठरलेलीं आहेत.

पण मला जें सांगावयाचें आहे त्यासाठीं स्त्रीपुरुषांचीं कार्यें भिन्नभिन्न आहेत हें सिद्ध करण्याची गरज नाहीं. लाखों स्त्रिया, निदान हिंदुस्थानांत तरी, सूत काढणें हें आपलें नैसर्गिक काम मानतात हें

प्रत्यक्षच दिसत आहे. साहजिकच वर्किंग कमिटीच्या ठरावानें येणारी जबाबदारी पुरुषांपेक्षां स्त्रियांवर अधिक पडत आहे. आणि त्यामुळें आपलें स्वत्व दाखविण्याची संधि त्यांना मिळत आहे. माझ्या पुढच्या सैन्यांत पुरुषांपेक्षां स्त्रियांचाच भरणा अधिक आहे असें झालें तर मला मनापासून आनंद होईल. लढा जुंपलाच तर पुरुषांपेक्षां स्त्रियांची भरती अधिक असल्यामुळें त्याला मग मला अधिक आत्मविश्वासानें तोंड देतां येईल. पुरुषांच्या हिंसेची मला धास्ती वाटते. पण स्त्रिया असल्या तर तसा प्रसंग उद्भवणार नाहीं याविषयीं मला खात्री राहील.

## परदेशी कापड बहिष्कार आणि स्त्रिया : ४६

विदेशी-वस्त्रबहिष्काराच्या शाखेकडे ज्या स्त्रिया काम करीत असतील त्यानीं लक्षांत ठेवावें की खादी-उत्पत्तीच्या विधायक कार्याखेरीज निव्वळ बहिष्काराची चळवळ बाधक होईल. खादी-उत्पत्तीशिवाय बहिष्काराला जरी यश आलें तरी तें यशच स्वातंत्र्याच्या राष्ट्रीय चळवळीचा नाश करणारें ठरेल. कारण लाखो लोक श्रद्धापूर्वक तो कार्यक्रम घेतील. पण आपल्याला अंगावर घालायला कापडच नाहीं किंवा जें कापड मिळतें तें फारच महाग आहे असें जर त्यांना आढळून आलें तर ते आपल्याला शिव्याशाप देतील. म्हणून बहिष्काराची पद्धत अशी : परदेशी कापडाचा बहिष्कार करा, आणि आपली स्वतःची खादी तयार करा आणि ती वापरा....

आपली नग्नता झांकण्याकरितां आपल्याला कापड खरेदीच केलें पाहिजे ही भ्रामक समजूत देशांतून नाहींशी झाली कीं कापडाची उणीव देशाला कधींहि भासण्याचें कारण पडणार नाहीं. मँचेस्टरचीं किंवा दिल्लीचीं बिस्किटें जर आपल्याला मिळालीं नाहींत तर आपण उपाशी मरूं, या समजुतीसारखीच ती कल्पना आहे. आपण जसें आपलें अन्न शिजवितों आणि खातों, तसेंच, आपण मनांत आणलें तर, आपलें कापड आपल्याला तयार करून वापरतां येईल. नुकत्या शंभर वर्षांपूर्वी आपण तें करीत होतों, आणि ती कला आजहि

आपल्याला शिकतां येईल. त्यांतील महत्त्वाच्या सर्व क्रिया अत्यंत सोप्या आहेत. आजच्या या आणीबाणीच्या वेळीं राष्ट्राच्या या क्रांतीच्या कालांत आपण मागेंपुढें पहातां कामा नये, आळसाला पोसतां कामा नये. आपल्या गिरण्यांसंबंधीं माझें म्हणणें पुन: येथें मांडण्याचें मला कारण दिसत नाहीं. जरी प्रत्येक गिरणी खरीखुरी स्वदेशी असली आणि जरी सर्व लोक स्वदेशाभिमानी झाले, तरी त्यांना आपल्याला लागणारे सर्व कापड पुरवितां येणार नाहीं. कोणी-कडूनहि पाहिलें तरी, आपल्याला आवडलें न आवडलें तरी, आप-ल्याला अहिंसक मार्गांनीं स्वातंत्र्य मिळवावयाचें असेल आणि १९२० सालीं ज्या विदेशी—वस्त्र-बहिष्कारावर आम्ही आमची शक्ति केंद्री-भूत करावयाला लागलों होतों तो बहिष्कार जर आपल्याला साध्य करावयाचा असेल तर खादीचा अंगिकार केल्यावांचून आपल्याला गत्यंतर नाहीं.

पुरुषांनीं या बहिष्काराच्या कार्यांत कसा भाग घ्यावयाचा तें मी पूर्वीं सांगितलें आहे. येथें त्यांना मी एवढेंच सांगतों कीं स्त्रियांनीं जेथें कोठें पिकेटिंग हातीं घेतलें असेल तेथें त्यांच्या कामांत जर त्यांनीं ( पुरुषांनी ) ढवळाढवळ केली तर ते चळवळीचा चुथडा करतील.

# स्त्रिया व अस्पृश्यता : ४७

( १९३३, ३४ साली आपल्या हरिजन दौऱ्यात गांधीजींनी ठिकठिकाणी स्त्रीसमुदायापुढे जीं भाषणें केली त्यांतील कांहीं उतारे खाली दिले आहेत. )

हरिजनकार्यासाठीं तुम्हाला जेवढें देतां येईल तेवढें तुम्ही द्यावें अशी माझी इच्छा आहे. ‘ आम्ही हरिजनसेवा कशी करावी ’ असें तुम्ही आपल्या मानपत्रांत मला विचारलें आहे. अत्यंत महत्त्वाची पहिली गोष्ट म्हणजे आपण आपल्या मनांतून अस्पृश्यता समूळ काढून टाकली पाहिजे. आपल्या स्वतःच्या मुलांबाळांची तुम्ही जशी सेवा करितां तशीच हरिजनांच्या मुलांबाळांचीहि करावी. त्यांना आपले आप्त समजून, भाऊ बहिण समजून, एकाच भारतमातेच्या पोटचीं आपण सारीं लेंकरें असें समजून, तुम्ही त्यांच्यावर प्रेम करावें.

त्यागाची आणि सेवाभावाची जिवंत प्रतिमा म्हणून स्त्रियांची मी पूजा करीत आलों आहे. निसर्गानें निःस्वार्थ सेवेची जी देणगी तुम्हांस दिली आहे त्याबाबतींत पुरुष तुमच्याशी कधींहि बरोबरी करूं शकणार नाहींत. दुःख पहातांच विरघळणारें करुणामय अंतःकरण स्त्रीचें असतें. तेव्हां हरिजनांच्या दुःखांनीं तुमचें हृदय जर द्रवलें, तुम्ही अस्पृश्यतेचा त्याग केलात आणि त्याचबरोबर उच्चनीच भेदालाहि मूठमाती दिलीत तर हिंदुधर्म शुद्ध होईल आणि आध्यात्मिक प्रगतीच्या दिशेनें हिंदुसमाजाचें पाऊल कितीतरी पुढें पडेल. तात्पर्य, सबंध हिंदुस्थानचें म्हणजे ४० कोटी मानवप्राण्यांचें कुशल

या गोष्टीनें साधलें जाणार आहे. आणि मानवजातीच्या पांचव्या हिस्स्यामध्यें जें हें आश्चर्यजनक शुद्धीकरण सुरू होईल त्याचा उत्कृष्ट परिणाम सर्व मानवजातीवर झाल्याशिवाय कसा राहील ?

या चळवळीचे असे दूरगामी परिणाम होणार आहेत. आत्म शुद्धीची ही महान् चळवळ आहे. आज चाललेल्या सर्व चळवळींहून कदाचित् ही मोठी आहे. या चळवळींतील आपला वांटा तुम्हीं पूर्णपणें उचलावा अशी माझी अपेक्षा आहे.

* * *

ईश्वरानें सर्व निर्मिलें. त्याला सारे प्राणीमात्र सारखेच. माणसां-माणसांमध्यें जर उच्चनीच असा भेदभाव त्यानें ठेवला असता तर हत्ती आणि मुंगी यांच्यांतील भेदासारखा तो आपल्या नजरेला आला असता. पण माणसामध्यें असा कांहीं फरक त्यानें ठेवलेला नाहीं. सर्वांचा आकार, सर्वांच्या नैसर्गिक गरजा पक्षपात न करता त्यानें सारख्याच ठेवलेल्या आहेत. हरिजन हे घाण काढून टाकण्याचें काम करतात म्हणून जर त्यांना तुम्ही अस्पृश्य लेखीत असाल तर कोणत्या आईनें आपल्या मुलांबाळांची अशा तऱ्हेची सेवा केलेली नाहीं ? समाजाची सर्वांत उपयुक्त सेवा बजावणारे हे आपले हरिजन बांधव अस्पृश्य व बहिष्कृत समजणें म्हणजे अन्यायाची परिसीमा होय. या पापाची जाणीव हिंदु स्त्रियांमध्यें उत्पन्न करण्याकरितां मी हा दौरा काढला आहे. कोणत्याहि मानवी प्राण्याला आपल्यापेक्षा कमी लेखून त्याच्याकडे तिरस्कारानें पाहणें हें कधींहि पुण्यकृत्य होणार नाहीं. आपण सारे एकाच ईश्वराचे उपासक आहोंत. निर-निराळ्या नांवांनीं आपण त्याची उपासना करतों. म्हणून मुळांत आपण एकच आहोंत हें ओळखून अस्पृश्यतेचा व त्याचप्रमाणें माणसामाणसांमधील उच्चनीचतेचा आपण त्याग केला पाहिजे.

* * *

एक गोष्ट तुम्ही करा असें सांगण्यासाठीं मी येथें आलों आहे. कांहीं माणसें उच्च व कांहीं माणसें नीच हा भेद पूर्णपणें विसरा. कांहीं स्पृश्य आहेत, कांहीं अस्पृश्य आहेत ही भावना पूर्णपणें मनांतून काढून टाका. परमेश्वरावर माझ्याइतकीच तुमची श्रद्धा आहे हें मी जाणतों. तो ईश्वर पुरुषांमध्यें व स्त्रियांमध्यें उच्च आणि नीच असा भेद करण्याइतका निष्ठुर आणि अन्यायी खास नाहीं. ही अस्पृश्यता हिंदुधर्मावरील अत्यंत मोठा कलंक आहे, आणि अस्पृश्यता राहिली तर हिंदुधर्म मरेल असें म्हणावयाला मला कांहींहि संकोच वाटत नाहीं. ईश्वराच्या बाबतींत माणसांच्या व्यवहाराची भाषा जर बोलावयाची झाली तर परमेश्वरानें आपली फारच गय केलेली आहे असें मी म्हणतों. पण ईश्वराच्या सहनशक्तीलाहि मर्यादा आहे. हिंदूंच्या हिंदुस्थानांत आज माणूस माणसाचा जो छळ करीत आहे त्याची तो यापुढें अधिक गय करणार नाहीं हें मी स्पष्टपणें आपल्याला सांगूं इच्छितों.

---

# एका भगिनीचे प्रश्न : ४८

" स्त्रियांच्या अब्रूचे रक्षण कसे करावें " असा प्रश्न केला असतां गांधीजींनीं उत्तर दिलेः—

" या प्रश्नाची दोन रीतींनीं चर्चा करतां येईल. एक, स्त्रीनें आपली स्वतःची अब्रू कशी राखावी, व दुसरी, तिच्या आप्तसंबंधी पुरुषांनीं ती कशी राखावी.

पहिल्यासंबंधीं सांगावयाचें तर जेथें अहिंसामय वातावरण आहे, जेथें अहिंसेची सतत शिकवणूक मिळत आहे, तेथें स्त्री ही स्वतःला दुबळी, असहाय, परावलंबी मानणारच नाहीं. ती जर खरोखरच शुद्ध असेल तर असहाय मुळीं राहाणारच नाहीं. तिची शुद्धताच तिला स्वतःच्या बळाची जाणीव करून देईल. स्त्रीची इच्छा नसेल तर तिचें पावित्र्य नष्ट करणें हें शरीरबळाच्या दृष्टीनें अशक्य आहे असें मला नेहमींच वाटत आलें आहे. तिच्या मनांत भीतीचा प्रवेश होतो किंवा स्वतःच्या नैतिक बळाची तिची जाणीव नष्ट होते तेव्हांच तिच्यावर हल्ला होऊं शकतो. तिच्यावर हल्ला करणाऱ्याच्या शरीरबळाशीं जर ती तुल्यबळ झाली नाहीं तर तिची अब्रू जाण्यापूर्वींच मरून जाण्याची शक्ति तिचें पावित्र्य तिला देईल. सीतेचीच गोष्ट घ्या. रावणापुढें तिच्या शारीरिक शक्तीचा काय पाड होता! पण त्या राक्षसी शक्तीलाहि गवसणी घालणारें पावित्र्याचें तेज तिच्याजवळ होतें.

सर्व तऱ्हेच्या मोहांनीं तिला वश करण्याचे त्यानें प्रयत्न केले. पण तिच्या संमतीवांचून तिच्या अंगाला स्पर्श करण्याची त्याची छाती झाली नाहीं. उलटपक्षीं एखादी स्त्री आपल्या शारीरिक सामर्थ्यावर किंवा हत्यारावर जर विसंबून राहिली तर तिचें तें बळ संपतांच तिची दाणादाण उडायला वेळ लागणार नाहीं.

दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर अगदीं सोपें आहे. तिचा भाऊ, बाप अगर मित्र तिच्या आणि हल्ला करणाऱ्याच्या मध्यें उभा राहील आणि तिचें संरक्षण करील. मग तो हल्ला करणाऱ्याचें मन त्याच्या दुष्ट हेतूपासून परतविण्याचा तरी एक प्रयत्न करील किंवा त्याला विरोध करीत असतांना मरण आलें तरी पत्करील. अशा रीतीनें देह ठेवण्यांत तो आपलें कर्तव्य बजावील, एवढेंच नव्हे तर जिचें रक्षण करावयाचें त्या स्त्रीच्या अंगीं त्यामुळें नवचैतन्य निर्माण होऊन आपलें शील संरक्षण करण्याचा मार्ग तिला चटकन दिसेल."

"हो. पण तिथेच तर सारी गोम आहे. स्त्रीनें आपलें मरण कसें ओढवून घ्यावयाचे? ते शक्य आहे का तिला?"

"हो, खात्रीनें शक्य आहे. पुरुषापेक्षां स्त्रियांना तें केव्हांहि अधिक शक्य आहे. यापेक्षां कमी महत्वाच्या कारणांकरितांसुद्धां स्त्रिया प्राणत्याग करूं शकतात हें मला माहित आहे. वीस वर्षाच्या एका मुलीला आपण अभ्यास करणार नाहीं असें म्हटलें म्हणून आपला छळ चालला आहे, असें वाटून कांहीं दिवसापूर्वीं तिनें स्वतःला जाळून घेतलें. किती थंडपणानें आणि दृढतेनें तिनें मृत्यूला कवटाळलें! साध्या दिव्यानें तिनें आपली साडी पेटविली आणि नंतर हूं का चूं सुद्धां केलें नाहीं. अर्थातच सगळें होऊन जाईपर्यंत शेजारच्या खोलींत असणाऱ्या मंडळींना या प्रकाराची दादसुद्धां लागली नाहीं. हें कृत्य अनुकरणीय म्हणून कांहीं मी ही गोष्ट

विस्तारानें सांगितली नाहीं. मला एवढेंच सुचवायचें आहे कीं स्त्री ही अगदीं सहजपणें आपला जीव फेंकून देते. हें धैर्य निदान माझ्या अंगांत तरी खास नाहीं. पण त्यासाठीं बाहेरच्या ज्योतीपेक्षां आंतल्या ज्योतींचीच आवश्यकता आहे हे मी मान्य करतों."

"राग न करतां किंवा मार न देता मुलांशी कसे वागायचे" अशी शंका एका भगिनीनें विचारली. त्यावर गांधीजी मोठ्याने हसले व म्हणाले:

"लालयेत् पंच वर्षाणि दश वर्षाणि ताडयेत्
प्राप्तेतु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्"

ही आपली जुनी म्हण तुम्हांला माहीत आहे ना? पण कांहीं काळजी करूं नका. जरी कांहीं वेळां मुलाला तुम्हांला रागें भरावें लागलें तरी त्या रागाला मी अहिंसक राग म्हणेन. शहाण्या आई-बद्दल मी हें बोलतों आहे. अडाणी आईबद्दल बोलत नाहीं. ती तर आई व्हावयालाच मुळीं लायकच नसते."

प्रश्नः—हिंदी महिलामध्ये जी सामाजिक व राजकीय जागृति झाली आहे त्यामुळे त्याच्या परपरागत घरगुती कर्तव्यात व त्यांच्या समाजविषयक कर्तव्यात झगडा निर्माण झाला आहे एखाद्या स्त्रीने सामाजिक कार्य अगावर घेतले तर तिला आपली मुलेंबाळे व घरदार यांकडे कदाचित् दुर्लक्ष करावे लागेल. हे कोडें कसे सोडवायचे ?

उत्तरः—पुष्कळ वेळां स्त्रीचा वेळ आवश्यक तीं घरगुतीं कामें आवरण्यांतच न जाता आपल्या 'पतिदेवां'ची बडदास्त ठेवण्यांत व स्वतः ची छानछोकी पुरविण्यांतच जात असतो. स्त्रीची ही घरांतली गुलामगिरी मला जंगलीपणाचें चिन्ह वाटतें. चुलीचें दास्य हा मुख्यतः रानटीपणाचाच अवशेष आहे असें मला वाटतें. या चिंता-भारांतून आपल्या स्त्रियांची जितक्या लवकर सुटका होईल तितकें बरें. घरगुती कामांतच स्त्रीचा सर्व वेळ खर्च न व्हावा हें बरें.

## स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य

प्रश्नः—विवाहित स्त्रीचा इस्टेटीवर हक्क असावा या संबधी कायद्यांत सुधारणा घडवून आणण्याला कांहीं मडळींचा विरोध आहे. त्यांचे म्हणणें असे की, स्त्रियांना आर्थिक स्वातत्र्य मिळालें तर त्यांच्यांत अनीति माजेल व त्यामुळें गृहस्थजीवन छिन्नविच्छिन्न होऊन जाईल, या प्रश्नासंबंधानें आपले मत काय आहे ?

उत्तरः—या प्रश्नाचें उत्तर मी दुसरा एक प्रश्न विचारून देतों. पुरुषांना स्वातंत्र्य लाभल्यामुळें व त्यांच्या हातीं इस्टेट आल्यामुळें

त्यांच्यांत अनीति माजलेली आहे कीं नाहीं? जर तुमचें उत्तर होकारार्थी असेल तर मग ती स्त्रियांतहि माजली तरी हरकत नाहीं. आणि जेव्हां स्त्रियांना पुरुषांप्रमाणेंच इस्टेटीच्या मालकीचे हक्क व इतर गोष्टी लाभतील तेव्हां असें आढळून येईल कीं त्या सद्गुणी वा दुर्गुणी होण्याशीं या हक्कांचा कांहींहि संबंध नाहीं. पुरुषाच्या अथवा स्त्रीच्या असहायपणावर जी नीति अवलंबून असते तिच्यांत कांहीं तथ्य नाहीं. आमच्या अंतःकरणाच्या शुद्धतेंतच नीतीचीं मुळें रुजलेलीं आहेत.

---

## स्त्रियांवर होणारे हल्ले ! : ५०

साऱ्या जगाच्या कसोटीची ही वेळ आहे. युद्धापासून कोणाचीहि सुटणूक नाहीं. रामायण आणि महाभारत हीं कविकल्पनांचींच जरी अपत्यें असलीं तरी त्यांचे जनक निव्वळ कवीच नव्हते. ते द्रष्टे होते. त्यांनीं करून ठेवलेलें वर्णन आज प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांपुढें घडत आहे. अनेक रावण एकमेकांशीं लढत आहेत. त्यांची शक्ति अद्वितीय दिसत आहे. ते अंतराळांतून प्राणघातक अस्त्रांचा वर्षाव करतात. समरांगणांतील कोणत्याहि प्रकारचें शौर्य त्यांच्या शक्तीच्या अथवा कल्पनेच्या पलीकडे नाहीं.

मानव कांहीं अशा रीतीनें लढणार नाहीं. देव तर नाहींतच नाहींत. फक्त पशूच असे लढूं शकतील. शरीरबळाच्या मदानें धुंद झालेले सोजीर दुकानें लुटीत आहेत आणि स्त्रियांवर हात टाकण्यालाहि त्यांना लाज वाटत नाहीं. अशा तऱ्हेच्या प्रकाराना प्रतिबंध करण्याची ताकद युद्धकालांत सरकारच्या अंगीं नाहीं. सरकारची मुख्य गरज लष्कर भागवितें. अर्थातच सैनिकांच्या दुर्वर्तनाकडे तें कानाडोळाच करणार. सबंध राष्ट्रच जेथें लष्कर बनतें तेथें लष्करी चालचलणूक हेंच त्या राष्ट्राच्या संस्कृतीचें सर्वस्व बनून जातें. त्यामुळें एखाद्या सैनिकानें जरी असला अतिप्रसंग केला तरी तो तेथें धिक्कारणीय असा समजला जात नाहीं. पण हिंदुस्थानाला तसें बनवायाला कित्येक पिढ्या जाव्या लागतील.

आणि म्हणूनच एका भगिनीनें पाठविलेले खालील प्रश्न निर्माण होतात :

१ "एखाद्या सोजिरानें स्त्रीची बेअब्रू केली तर तिचें पावित्र्य नष्ट झालें असें मानतां येईल काय ?

२ त्या स्त्रीचा समाजानें धिक्कार करावा किंवा तिला वाळीत टाकावें काय ?

अशा प्रसगीं स्त्रियांनी व लोकांनी काय करावं ? "

प्रत्यक्ष जरी त्या स्त्रीचें पावित्र्य नष्ट झालें असलें तरी त्यामुळें कांहीं तिचा धिक्कार करावा किंवा तिला वाळीत टाकावें असें ठरत नाहीं. तिला आपली सहानुभूति मिळाली पाहिजे. क्रूरपणें तिच्या-वर आघात केला गेला आहे. जशी एकाद्या जखमी माणसाची आपण शुश्रुषा करतों तशीच तिचीहि केली पाहिजे. स्त्री ही स्वेच्छेनें जेव्हां आपलें शील भ्रष्ट करूं देण्याला तयार होते तेव्हांच ती समाजाच्या धिक्काराला पात्र ठरते. व्यभिचार आणि बळजबरी हीं केव्हांहि एक नव्हेत. या दृष्टीनें जर आपण पाहूं लागलों तर असलें प्रकार लपविण्याची जी आपली आजपर्यंतची संवय आहे ती आपण टाकून देऊं. स्त्रियांच्या बाबतींत पुरुषांनीं अशा तऱ्हेचें वर्तन करूं नये. यासाठीं जनमत तयार करतां येईल आणि त्या जनमताचा प्रभावहि सरोस पाडतां येईल.

वर्तमानपत्रांतून जर या प्रकाराविरुद्ध एकसारखी ओरड झाली तर गोरे काय अगर काळे काय कोणतेहि शिपाई अशा तऱ्हेचें वर्तन करूं धजणारच नाहींत. त्यांच्या वरिष्ठांना असल्या गैर वर्तनाला आळा घालणें भागच पडेल.

स्त्रियांना माझा असा सल्ला आहे कीं त्यांनीं शहरें सोडून खेड्यांत जावें. तेथें त्यांच्यासाठीं पुष्कळ कार्य पडलें आहे. खेड्या-

मध्यें जबरी होण्याची धास्ती त्या मानानें फारच कमी. पण त्यांनीं आपली राहाणी साधी ठेवली पाहिजे, गरिबांशीं एकरूप झालें पाहिजे. रेशमी अगर साटिनचे कपडे, दागदागिने, जडजवाहिर वगैरे घालून त्या आपल्या संपत्तीचें तेथें प्रदर्शन करूं लागल्या तर आगींतून निघून फुफाट्यांत पडल्यासारखें होईल. अर्थात् ज्यांना शहरांत राहणें आवश्यकच आहे अशा स्त्रियांसाठीं हा सल्ला नाहीं.

पण निर्भय कसें व्हावयाचें याचें ज्ञान स्त्रियांनीं करून घेणें ही मुख्य गोष्ट आहे. जी स्त्री निर्भय आहे आणि आपलें पावित्र्य हीच आपली ढाल हें जिला कळलें आहे अशा स्त्रीची कधींहि विटंबना होणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. पुरुष कितीहि पशुकोटीला गेला असला तरी स्त्रीच्या पावित्र्याच्या धगधगत्या ज्वालेपुढें त्याची मान शरमेनें खालींच होईल. अशा स्त्रियांनीं आपलें रक्षण केल्याची उदाहरणें आजच्या काळांत सुद्धां आढळतात. हें लिहित असतांनाच एक दोन उदाहरणें माझ्या आठवणींत येत आहेत. म्हणून ज्या ज्या स्त्रिया हा माझा लेख वाचतील त्यांनीं हें मनोधैर्य आपल्या अंगीं बाणवून घेण्याचा प्रयत्न करावा असें मी त्यांना सुचवितों. विटंबना होईल, अशा नुसत्या भीतीनेंच त्या आज गर्भगळित होतात, तें त्यांनीं टाकून दिलें तर त्या पूर्णपणें निर्भय बनतील. पण धैर्याच्या कसोटींत आपण टिकतों कीं नाहीं हें पहाण्याकरितां स्त्रियांनी तसा बिकट प्रसंग मुद्दाम होऊन अंगावर ओढवून घेण्याची मात्र कांहीं जरूरी नाहीं.

ईश्वराची कृपा कीं असे अनुभव हजारो लाखों स्त्रियांना येत नाहींत. प्रत्येक शिपाई पशूच असतो असें नाहीं. सभ्यपणा विसरून जाणारे फार थोडे लोक असतात. साप शेंकडा वीस टक्केच विषारी असतात, आणि त्यांतसुद्धां चावणारे अगदींच थोडे. त्यांच्यावर पाय

पडला नाहीं तर कांहीं ते मुद्दाम उलटून अंगावर येत नाहींत. पण या साऱ्या माहितीचा उपयोग कुणाला? साप दिसल्याबरोबर ज्यांची बोबडी वळत नाहीं त्यांना! म्हणून आईबापांनीं व नवऱ्यांनीं स्त्रियांना निर्भय कसें व्हावें याची शिकवण दिली पाहिजे. तें शिक्षण ईश्वरावर जिवंत श्रद्धा ठेवल्यानेंच मिळेल. ईश्वर अदृश्य असला तरी तो सर्वांचें बिनचूक रक्षण करतो अशी ज्याची श्रद्धा आहे तोच सर्वांहून अधिक निर्भय असतो.

पण हा विश्वास, हें नीतिधैर्य एका दिवसांत येत नाहीं, तोंवर स्वसंरक्षणाची आपल्याला दुसरीं साधनें शोधलीं पाहिजेत. स्त्रीवर हल्ला होईल तेव्हां हिंसा कीं अहिंसा असा विचार करीत बसूं नये. तिचें पहिलें कर्तव्य म्हणजे आत्मसंरक्षण. आपल्या अब्रूचें रक्षण करण्यासाठीं सुचेल तो उपाय किंवा हत्यार वापरण्याची तिला पूर्ण मोकळीक आहे. ईश्वरानें तिला नखें दिलीं आहेत, दांत दिले आहेत. सर्व शक्ति एकवटून तिनें त्यांचा उपयोग करावा; आणि जरूर तर त्या प्रयत्नांत मरणहि पत्करावें. ज्या स्त्रीनें वा पुरुषानें मृत्यूचें भय फेकून दिलें तिला किंवा त्याला स्वतःचें रक्षण करतां येईल; इतकेंच नव्हे तर आपल्या प्राणाचा त्याग करून इतरांचेंहि ती किंवा तो रक्षण करूं शकेल. खरोखर आपण मरणाला अतिशय भितों, म्हणूनच शेवटीं अधिक मोठ्या शरीरबळापुढें नमतों. कांहींजण हल्ला करणारापुढें वांकतील, कांहीं लांच देतील, कांहीं पोटावर सरपटत जातील किंवा इतर लाचारीच्या प्रकारापुढें मान वांकवितील; कांहीं स्त्रिया मरण पत्करण्यापेक्षां आपलें शरीर स्वाधीन करतील. निंदा करण्याच्या बुद्धीनें मी हें लिहिलें नाहीं. मनुष्यस्वभाव कसा आहे तें फक्त मी स्पष्ट केलें. पोटावर सरपटत गेलें काय किंवा एखाद्या स्त्रीनें जुलूम करणाऱ्या पुरुषाला आपलें शरीर दिलें काय दोन्हीमध्यें जगण्याचाच हव्यास दिसून

येतो. हा हव्यासच आपल्याला स्वाभिमान सोडावयाला लावतो, वाटेल ती हीन गोष्ट करायला लावतो. म्हणून जो जिवावर उदार झाला तोच वांचला, 'तेन त्यक्तेन भुंजीथा:' प्रत्येक वाचकानें हा अप्रतिम श्लोक पाठ करावा. पण नुसत्या पाठ करण्यानें मात्र कांहींच उपयोग व्हावयाचा नाहीं. तो अगदीं खोल, हृदयाच्या गर्भांत उतरला पाहिजे. जगण्याचा आनंद लुटावयाचा असेल तर जगण्याचा मोह सोडला पाहिजे आपला तो स्वभावच बनून गेला पाहिजे.

स्त्रीनें काय करावें याचें विवेचन येथवर केलें. पण अशा प्रसंगीं हजर असणाऱ्या पुरुषानें काय करावें? वर जें सांगितलें त्यांतच त्या प्रश्नाचें उत्तर आलें. त्यानें निव्वळ प्रेक्षक न राहातां स्त्रीचें रक्षण करण्याला धावलें पाहिजे पोलिसाच्या मदतीसाठीं धांवाधांव न करतां किंवा आगगाडींत धोक्याची सांखळी ओढूनच फक्त न थांबता त्यानें आपला जीव धोक्यांत घालून स्त्रीला सोडविलें पाहिजे. अहिंसेवर त्याची श्रद्धा नसेल किंवा ती उपयोगांत आणणें त्याला शक्य नसेल तर आपल्या अंगीं असेल नसेल तें बळ वापरून त्यानें स्त्रीला वांचविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हिंसेचा व अहिंसेचा कोणताहि मार्ग पत्करा; त्यांत जीव देण्याची तयारी असली पाहिजे.

मी म्हातारा, जराग्रस्त, दंतहीन बनलों असल्यामुळें जर अहिंसेचें नांव घेऊन एखाद्या भगिनीची माझ्या डोळ्यांदेखत चाललेली विटंबना असहायपणें पहात राहीन तर माझ्या 'महात्मेपणा' (?) ची ती थट्टा होईल, आणि तें नष्ट होईल. जर मी किंवा माझ्यासारखी इतर मंडळी, हिंसेनें काय किंवा अहिंसेनें काय, मध्यें पडून स्वतःचें बलिदान देतील तर त्या स्त्रीची सुटका होईल, निदान तिची बेअब्रू आम्ही जिवंत असतांना तरी पाहाणार नाहीं.

ज्यांच्या डोळ्यापुढें असा प्रसंग घडत असेल त्याच्याविषयीं हें लिहिलें. पण आपल्या देशाचें सबंध वातावरणच जर अशा धैर्य-भावनेनें भरून गेलें आणि स्त्रीवर अत्याचार झालेला कोणाहि हिंदी माणसाला सहन होणार नाहीं हें जर कळून आलें तर एकहि शिपाई स्त्रियांना स्पर्श करण्याचें धाडस करणार नाहीं हे मी निःशंकपणें म्हणतों. अशा तऱ्हेची धैर्यवृत्ति आज नाहीं ही शरमेची गोष्ट आहे. हा कलंक धुऊन काढण्यासाठीं कांहीं लोक जर पुढें आले तरच कांहीं आशा आहे.

सरकारदरबारीं ज्याचें वजन आहे त्यांनीं अधिकाऱ्याकडून अवश्य ते उपाय योजण्यासंबंधीं व्यवस्था करावी. पण, स्वावलंबना-सारखा दुसरा उत्कृष्ट उपाय नाहीं आजच्या परिस्थितीत आपण आपल्या स्वतःच्या बळावर व ईश्वराच्या साह्यावरच अवलंबून रहावें हें बरें.



# महाराष्ट्र ग्रंथ-भांडार, कोल्हापूर.

## —: प्रकाशन :—



| | | | |
|---|---|---|---|
| १ | उमज पडेल तर | ना. ह. आपटे | २-० |
| २ | बाल सुहृद् | गो. रा चोळकर | ०-१२ |
| ३ | जांवई | ग. ल. देवधर | १-४ |
| ४ | मातृमंदीर | सौ. मालतीबाई दाडेकर | २-८ |
| ५ | पद्यमीमांसा | वि. ज. सहस्त्रबुद्धे | १-४ |
| ६ | आघाडीवर | व्य. रा खडाळीकर | २-० |
| ७ | धर्मवीर संभाजी | गणपतराव बोडस | १-० |
| ८ | पहिलें पाऊल | कामत | ०-५ |
| ९ | प्रतिमा | सौ. मालतीबाई दाडेकर | २-० |
| १० | इच्छा | श्री. वर्टीकर | २-८ |
| ११ | अग्नियान | कुमारी प्रेमा कंटक | ३-० |
| १२ | माझी जमीन | कै. फाटकशास्त्री | १-८ |
| १३ | विवाहितांचें नंदनवन | राजरत्न वा. वि. जोशी | ३-०-० |
| १४ | राष्ट्रधर्म | साने गुरूजी | २-० |
| १५ | रमण प्रस्थानयत्री | ना. वा. गुणाजी | १-४ |
| १६ | आव्हान | प.जवाहरलाल नेहरू,दु.आ छापत आहे | |
| १७ | विद्यार्थ्यांशी हिजगुज | महात्मा गांधी | २-० |
| १८ | महागाई कां ? | श्री. रा. पोतनीस | १-८ |
| १९ | तेजस्विनी | सौ. मालतीबाई दाडेकर | ४-० |
| २० | मावळता चंद्र | बोरकर | २-० |
| २१ | जीवन संस्कृति | काका कालेलकर | १-२ |
| २२ | पाकिस्तानची छाया | आय. सी. शेख | २-८ |
| २३ | तोंडचा घास | शांतिलाल रा. भंडारी | १-१२ |
| २४ | स्त्रियांशीं हितगुज | महात्मा गांधी | २-८ |

# स्त्रियांचें स्थान : ३

आतापर्यंत विवाहाच्या मोहाला ज्यांनी यशस्वीपणे तोंड दिले आहे अशा एक बाई लिहितात.—

" काल मलबारी हॉल [ मुंबई ] मध्ये एक स्त्रियांची परिषद झाली त्या परिषदेत पुष्कळ चांगलीं भाषणें झालीं, चांगले ठराव पास झाले. शारदा बिल हा त्या दिवशीं परिषदेपुढील मुख्य प्रश्न होता. आपण मुलींचें लग्नाचें वय १८ वर्षें धरतां याबद्दल आम्हांला कितीतरी आनंद वाटतो. दुसरा एक महत्त्वाचा ठराव वारसाकायद्यासंबंधीं होता. आपण ' नवजीवन ' किंवा ' यंग इंडिया ' मध्यें याविषयीं जर एखादा सणसणीत लेख लिहिलात तर त्याची किती मदत होईल ! आपला जन्मजात हक्क व मान मिळविण्याकरीतां स्त्रियांना भिक्षा मागायला कां लागावी किंवा झगडायला तरी कां लागावें ? स्त्रीच्याच पोटीं जन्माला आलेल्या पुरुषानें मोठ्या दिमाखानें स्त्रीला ' अबला ' म्हणावें आणि आम्हांला जे त्यानें दिलेंच पाहिजे तें ' देतो ' म्हणून थोर तोंडानें आश्वासन द्यावें, हें किती विचित्र आणि त्याचबरोबर किती करुणाजनक, हास्यास्पद आहे ! ' देतो ' म्हणे ! कसली ही मूर्खपणाची भाषा ? ज्याच्या हातीं पाशवी बळ आहे त्यांनीं दांडगाव्यानें लोकांकडून जें हिसकून घेतलें तें त्यांना परत करण्यांत ' थोरपणा ' कसला, ? ' दाक्षिण्य ' तरी कसलें ? स्त्रिया पुरुषांपेक्षां कोणत्या बाबतींत कमी ठरतात ? वारसाच्या वाटणींत पुरुषांपेक्षां त्यांचा हिस्सा कमी कां असावा ? तो समसमान कां असू नये ? दोन दिवसांपूर्वीं कांहीं मंडळींशीं आम्ही या बाबतींत खूप कडाक्यानें वाद करीत होतों. एक बाई म्हणाल्या, ' आम्हांला नको बाई कायद्यांत बदल व्हायला. आहे त्यांत आम्हांला समाधान आहे. विचार केला तर, कुळाचं